टागोर यांच्या लघुकथा

( कथाकदंब )

लेखकः

रवींद्रनाथ टागोर ( ठाकूर ).

# कथाकदंब

अनुवादकः

श्री. रा. मराठे, बी. ए.

अध्यापक, ना. वाडिया कॉलेज.

# प्रस्तावना.

मनुष्यस्वभावाचें असामान्य ज्ञान, निसर्गाचें काव्यमय वर्णन, कल्पकतेचें अप्रतिहत साम्राज्य, मार्मिक सूचकता, शब्दसौष्ठव, तसेंच अकल्प्य पण स्वाभाविक अशी अपूर्व घटना अचानक रीतीनें घडवून आणण्याची लोकोत्तर शैली ह्या सर्वांचा अनुभव वाचकांना प्रतीत करून देणारी शब्दपंक्ति रचण्याचें सामर्थ्य एकट्या रवींद्रनाथ ठाकूर ह्यांच्यांतच आहे. अशा ह्या विदग्ध वागीशाच्या लघुकथा श्री. मराठे ह्यांनीं मराठींत उपलब्ध करून दिल्या ह्याचा आनंद कोणास होणार नाहीं ?

ह्या वीस कथा खरोखरच लघुकथा आहेत. लघुकथांच्या नांवाखालीं आगगाडीच्या रस्त्याप्रमाणें लांबचलांब वळलेल्या दीर्घ कथांच्या लेखकांनीं ह्यांपासून बोध घेण्यासारखा आहे. श्रीमंतीच्या विलासांत वाढलेले रवीन्द्रबाबू दारिद्र्याग्नीनें नितांतदग्ध झालेल्या भस्मशेषांचें स्वभावचित्र हुबेहूब रंगवितात ही गोष्ट त्यांची व्यापक बुद्धिमत्ता व्यक्त करते. व्यवहारांत हरहमेश घडत असलेल्या गोष्टी आधारास घेऊन त्यांना कल्पकतेचें लेणें चढवून सजविल्या म्हणजे त्या किती चित्ताकर्षक होतात हें ह्या पुस्तकांतील गोष्टींवरून समजण्यासारखें आहे. लोभ, दर्प, मत्सर, संशय, कामांधता इत्यादि विकारांच्या पगड्यामुळें मनुष्याच्या हातून होणारा मूर्खपणा लोकांच्या नजरेंत भरेल व मनावर बिंबेल अशा रीतीनें ह्या गोष्टींत खुलवलेला आपल्या प्रत्ययास येतो. आपल्या निकटवर्ती माणसाचें वैगुण्य व त्याचे दुष्परिणाम आपल्या अनुभवास नेहमीं येतात; परंतु रवीन्द्रबाबूंचें अनुकरण करून लहान गोष्टी लिहून असले दोष समाजांतून कमी करण्याचा प्रयत्न कोणी करीत नाहीं. समाजधुरीण म्हणून नांवाजलेल्या सुशिक्षितांनीं परस्त्रियांच्या नादीं लागून स्वतःच्या सुशील

पत्नीला मारहाण केल्याचे दाखले आपल्या समाजांत नाहींत असें नाहीं. संशयी वृत्तीमुळें गृहसुख न लाभून आयुष्याचें मातेरें करून घेतल्याचीं उदाहरणें अनेक आहेत. भोळसट व बिनशिस्तीच्या कारभारानें कंगाल झालेले श्रीमंत आपणांमध्यें असंख्य आहेत. मोठेपणाच्या हावेनें अविद्य सधन धुळीला मिळालेले आपणांस अपरिचित नाहींत. हीनवर्ण गौरकाय रमणीला अर्धांगी बनवून मातापितरांना यमलोकाला पाठविणारे सुपुत्र महाराष्ट्रांत एकामागून एक निघत आहेत. वर्तमानपत्रांत आपलें नांव येण्याकरतां हापापलेले, पोकळ पदव्यांकरतां धडपड करणारे, सन्मानाच्या जागा मिळाव्या म्हणून लांडे कारभार करणारे नीतिदुर्बळ व विद्यादुर्बळ सर्व अधोगामी समाजांत असतात तसे आपल्या समाजांतहि असतील. अशा लोकांविषयीं अनादर बुद्धि उत्पन्न करण्याच्या कामीं लघुकथाच फलप्रद होतात. रवीन्द्रबाबू पृथ्वीवर वापरतात म्हणून त्यांस असें कार्य करतां आलें.

समस्यापूरण, प्रायश्चित्त, हुंडा, उद्धार, सुट्टी, फळ तेंच, यज्ञेश्वर शास्त्र्यांचा यज्ञ, विचारक, कांद्याचा नायटा ह्या गोष्टींनीं समाजांतील दोष चव्हाट्यावर आणले आहेत. "घोर रात्रीं" त प्रेमासक्त हृदयाची खळबळ अनुपम घटनेनें आविष्कृत केली आहे. पोष्टमास्तरासारख्या दीनाचें हृद्गत, त्याच्या संवेदना इतक्या सूक्ष्मतेनें चितारणें हें रवींद्रबाबूंशिवाय दुसऱ्या कोणास साधणें कठीण आहे. रवींद्रनाथ दीनाचें हृद्गत ओळखतात तसेंच मुलांमुलींचें ओळखतात; एवढेंच नव्हे तर परस्थाचेंहि ओळखतात, ह्याचा प्रत्यय सुट्टी व काबुलीवाला ह्या गोष्टींवरून येण्यासारखा आहे. स्त्रीस्वभावाची पारख करण्यांत तर त्यांचा हातखंडा आहे. "प्रायश्चित्त ह्या गोष्टींत पतिनिष्ठ साध्वीचें काढलेलें चित्र कोणाच्याहि अंतःकरणाला द्रव आणील. नवऱ्यानें केलेली चोरी आपल्या अंगावर ओढून घेणारी स्त्री हिंदुसमाजांतच आढळेल.

स्त्रियांची आकुंचित दृष्टि, अनुदारता, स्वार्थपरायणता वगैरे दोष सुद्धां, प्रायश्चित्त इ. गोष्टींत खुबीदार रीतीनें प्रगट केले आहेत. अशा कांहीं स्त्रिया असतात कीं त्यांचें समाधान ब्रह्मदेवाच्यानेंहि होणार नाहीं. मामीच्या संतोषासाठीं मन लावून तिनें सांगितलेलें काम करणाऱ्या फटिकाला कोणत्या शब्दांत बक्षीस मिळालें तें पाहा. "बाबा पुरे झालें तुझें करणें ! पुनः म्हणून तुला सांगावयाची सोय नाहीं. जा; बाबा तूं आपला उद्योग कर कसा. जा, आपला अभ्यास कर म्हणजे झालें. " (पा. ११२). " त्या ठिकाणीं (रात्रीं शयनगृहांत) स्नेह्याचे घरीं लग्नानिमित्त आहेर पाठविणें, नवीन ठेवलेली मोलकरीण काम ऐकत नाहीं म्हणून तक्रार, मिसळीच्या भाजींत फोडणीच्या विशेष प्रकारच्या मसाल्याची उपयुक्तता वगैरे विषयांची चर्चा चालत असे." (पा. ७४) " अशिक्षित बायकांचा हा थकून आलेल्या नवऱ्याला त्रस्त करून सोडण्याचा नेहमींचा व्यवसाय ! ज्यांनीं (त्यांनीं) आपापली काळजी करावी, पण सगळयांनीं मात्र तिच्या सुखाची काळजी वहावी " (पा. ८६) अशा अहंमन्य स्त्रिया काय कमी असतात ?

मनुष्यस्वभावाचा किती खोल विचार केलेला आहे, हें खालील वाक्यांवरून समजेल. " स्त्रीजातीला रहस्य सहन होत नाहीं; कारण ——अनिश्चित घेऊन प्रपंच करतां येत नाहीं——" (पा. ४२). " रतननें आपल्या मालकाचें रागें भरणें अनेकदां निमुटपणें सोसलें होतें; पण तिला हे कोमल शब्द सहन झाले नाहींत." (पा. १६९). जातां जातां सहज एखादें वाक्य रवींद्रनाथांच्या लेखनांतून निघून जातें पण तें अनेकांना जन्मभर विचार करण्यास लावील इतक्या योग्यतेचें असतें. उ. " ईश्वरी न्याय नीतिबोधपाठावलीच्या प्रथम भागाप्रमाणें सोप्या भाषेंत लिहिलेली उपदेशावली नव्हे" (पा. १२२). "पाटलोन चढवून वडिलांना नमस्कार करायचें बिपिनबाबूंना मोठें

कठिण गेलें." ( पा. १४७ ). जुन्या चालीरीतींचें संरक्षण नवीन तऱ्हेच्या पोषाखानें होणें दुरापास्त हें येथें ध्वनित केलें आहे. हेंच खरें ध्वनिकाव्य. "सूर्योऽस्तं गतः" हें नव्हे.

"आज हा रामलोचन कोठून तरी एकाएकीं येऊन उपस्थित झाला, कांहीं ठराविक मंत्र म्हटले व झडप घातल्यासारखी सुरबालेला ज्ञातिबांधवांपासून विभक्त करून एका क्षणांत निघून गेला." ( पा. ५८ ). "समाजांत कोणताहि कायदा किंवा स्मृतिवचन असें नाहीं कीं, ज्याच्या योगानें ममतेला आपला हक्क शाबीत करतां येईल." ( पा. ३८ ).

रवीन्द्रनाथ नुसते गुलजार गोष्टी लिहिणारे नाहींत. ते तत्त्वज्ञानीहि आहेत.

"त्या बिचाऱ्याला कधींच ठाऊक नाहीं कीं मनुष्यांमध्यें अशा प्रकारचा उपद्रवजनक पदार्थ असतो व त्याची अशी दुर्दम्य विलक्षण शक्ति असते कीं ज्यामुळें बुद्धिमत्ता, विचार, बंधनें, सामंजस्य सर्वतोपरी विस्खलित होऊन जातात." ( पा. ८२ )

"नदीनें समुद्राकडे वहात जाऊन समुद्रामध्यें आत्मविसर्जन करण्यांत नदीच्या जीवनाचें साफल्य आहे ही गोष्ट खरी, परंतु समुद्र जर भरतीच्या जोरानें नदीमुखानें आकृष्ट होऊन राहील तर नदी केवळ आपल्या ठिकाणीं फुगून राहील. संसार आपला समस्त आदर-सौभाग्य घेऊन रात्रंदिवस शैलबालेकडे वाहूं लागल्यामुळें शैलबालेचा अभिमान अत्यंत उत्तुंग होऊं लागला. त्यामुळें संसाराकडे तिचें प्रेम आकृष्ट होईना. तिला वाटूं लागलें कीं माझ्याकरितां हें समस्त व मी मात्र कोणाकरितां नाहीं. ह्या अवस्थेमध्यें अहंकार यथेष्ट असतो पण परितृप्ति मात्र नसते." ( पा. ८३ )

न्यायाधिशांत आपआपसांत द्वेष व मत्सर असतात आणि त्याचा परिणाम बिचाऱ्या पक्षकारांना सोसावा लागतो ही अगदींच क्वचित्

न घडणारी गोष्ट रवीन्द्रबाबूंच्या अवलोकनांतून सुटली नाहीं. त्यांनीं त्याच्यावर सुंदर गोष्ट रचली ( गो. २ ). आमच्या इकडील लेखकांचें लक्ष कोर्टाकडे कधीं गेलें आहे काय ? " समस्यापूरण " ह्या गोष्टीचा शेवटला परिच्छेद किती सूचक आहे; न बोलतांहि त्यांत किती अर्थ सांठलेला आहे हें पाहिलें म्हणजे लेखनकला कशाला म्हणतात हें आपणांस समजतें. ह्या पुस्तकांतील सर्वच गोष्टी अप्रतिम आहेत. एकीला बरी म्हणून दुसरीस वाईट म्हणणें अशक्यप्राय होय. " मध्यवर्तिनी " ह्या गोष्टींत निवारणबाबूचा अधःपात फारच कुशलतेनें वर्णिला आहे. असो.

श्री. मराठे ह्यांचें प्रस्तुत पुस्तक वाचून परभाषेंतील नामांकित ग्रंथकारांच्या कृतींचें भाषांतर स्वाभाषेंत करणें हें मराठी वाङ्मयाच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें अत्यंत हितावह आणि म्हणून अवश्य आहे, हा विचार मनामध्यें प्रामुख्यानें उभा रहातो. अखिल जगाला आदर्शभूत असलेलें वाङ्मय आपल्यापुढें आल्यानें आपल्या स्वतःच्या कृतीला नमुनेदार वळण लागतें, आपल्या अपरिपक्व कृतीची वास्तविक योग्यता किती आहे ह्याची जाणीव उत्पन्न होते आणि आपल्याविषयीं अंतर्यामीं सदैव प्रज्वलित असलेला दर्प उपशम पावतो. लघुकथांचा नूतन वाङ्मयप्रकार महाराष्ट्रांत प्रचलित करण्याचें काम होतकरू लेखकांनीं आपल्या अंगावर घेतलें आहे, अशावेळीं हा मराठ्यांचा रवीन्द्रबाबू फारच उपयुक्त कार्य करील ह्यांत संशय नाहीं. श्री. मराठे ह्यांची भाषा मुळाला अनुरूप अशीच आहे. आपण भाषांतर वाचीत आहों असें वाटत नाहीं. श्री. मराठे ह्यांच्या कृतीचा गौरव करण्यास ह्यापेक्षां अधिक शब्दांची आवश्यकता नाहीं. रवीन्द्रबाबूंची चर्चा जशी गंभीर व भारदस्त तशीच त्यांची भाषा असते. श्री. मराठे ह्यांनीं आपल्या भाषांतरांत हा गुण साधला आहे.

**ना. गो. चाफेकर.**

# – भाषांतरकाराचे चार शब्द –

डॉ. रवींद्रनाथ ठाकूर ( टागोर ) यांच्या कल्पगुच्छ नामक लघु-कथांतील कांहीं निवडक कथांचें मराठी भाषांतर प्रसिद्ध करण्याची वेळ आली असतां आमच्या प्रकाशकांनीं भाषांतरकार म्हणून चार शब्द प्रस्तावनेदाखल लिहून मागितले, तेव्हां मनांत आलें कीं, याच्याइतकें सोपें काम मला कधींच कोणी सांगितलें नाहीं. पुन्हां विचार आला कीं, याच्याइतकें अवघड काम मला कधींच करावें लागलें नाहीं. हें अवघड काम स्वतंत्र रीतीनें करण्याचें योजिलें आहे, असें मीं शेवटीं म्हटलेंच आहे.

मिल्टनच्या " पॅराडाइज लॉस्ट " नामक काव्यांत एका प्रसंगीं सैतानाची व नंदनवनांतील देवदूताची गांठ पडली असतां देव-दूतानें "तूं कोण " म्हणून विचारतां सैतानानें तिरस्कारानें उत्तर दिलें, " मी कोण हें ज्याला माहीत नाहीं तो स्वतः कोणीतरी क्षुद्र प्राणी असला पाहिजे. "

डॉ. टागोर ज्यांना माहीत नाहींत त्यांच्याबद्दल सैतानानें काढ-लेले उद्गार योग्य ठरतील असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं.

ही गोष्ट कबूल केली पाहिजे कीं आज काल मूल्यवान रत्नाची परीक्षा जशी पॅरिसच्या बाजारांत करावी लागते तशीच आमच्या कविरत्नांची परीक्षा युरोपच्या बाजारांत प्रथम होते.

डॉ. टागोर यांचे आयुष्यक्रमांत वैलक्षण्य किंवा वैचित्र्य असें कांहींच नाहीं. त्यांची कीर्ति त्यांच्या लेखनव्यवसायावर.

युरोपमध्यें व इतरत्र त्यांच्याबद्दल किती आदर आहे हें ज्यांनीं ज्यांनीं त्यांच्या सफरींचा वृत्तांत वाचला असेल त्यांनाच कळण्याजोगें

आहे. इतकें म्हटलें म्हणजे पुरे आहे कीं, इतिहासाच्या आरंभापासून तों आतांपर्यंत कोणत्याही राजाचा, योद्धयाचा किंवा महापुरुषाचा सन्मान डॉ. टागोर यांच्याइतका झाला नाहीं.

हल्लींच्या यंत्रयुगांत, शास्त्रप्रगतीच्या काळांत देहात्मवादाची छाया सर्वत्र पसरून धर्म किंवा नीतीचा विचार केवळ उपयुक्ततेच्या तत्त्वावर होत असतां, सर्वत्र विचारक्रांती, राजक्रांती चालू असतां, एखाद्या पौर्वात्य कवीचा न भूतो न भविष्यति असा सन्मान पाश्चिमात्य देशांत व्हावा हा गौरव त्या व्यक्तीचा तर खराच, पण विशेषतः मनुष्यजातीच्या तरणोपायाचें रहस्य म्हणून जें डॉ. टागोर व्याख्यानद्वारा व ग्रंथद्वारा उपदेशीत आहेत त्या तत्त्वांचा हा गौरव आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

काव्याचें लक्षण सांगतांना शास्त्रकारांनीं "काव्यं यशसेर्थकृते" वगैरे जें लक्षण केलें आहे तें डॉ. टागोर यांच्या काव्याचे बाबतींत समग्रतः लागू पडतें असें कोण म्हणणार नाहीं?

डॉ. टागोर यांच्या ग्रंथाशीं प्रत्यक्ष परिचय झाल्यावांचून त्यांची योग्यता कळणें कठीण आहे. वास्तविक बंगाली भाषा महाराष्ट्रीयांना किंवा ज्यांची मातृभाषा संस्कृत भाषेशीं संलग्न आहे, त्या सर्वांना अल्पश्रमानें समजण्याजोगी आहे. तथापि ज्यांना तें अव्यवहार्य आहे त्यांना बंगाली वाङ्मयाचा व विशेषतः डॉ. टागोर यांच्या ग्रंथाचा परिचय व्हावा म्हणून आम्ही प्रथम त्यांच्या लघुकथांतील कांहीं कथांचा मराठी अनुवाद करण्याचें योजिलें त्याला आज सुमारें दहा वर्षें होत आलीं.

बंगाली भाषेचा अभ्यास म्हणून प्रथम भाषांतर करण्याचा उपक्रम केला. कांहीं मित्रांनीं तें प्रसिद्ध करावें म्हणून सुचविलें. आमचे मित्र कै. शंभूराव नरहर दातार, कॉंट्रॅक्टर व प्रकाशक यांनीं तो अनुवाद

प्रकाशित करण्याचें कबूल करून **समर्थ भारत छापखान्यांत** छापण्यास दिला.

डॉ. टागोर यांची परवानगी मिळवावयाची म्हणजे विश्वभारतीची परवानगी. विश्वभारतीच्या चालकांनीं आपल्या तज्ज्ञांच्या अभिप्रायावर परवानगी देण्याचें ठरविलें व त्यांच्या अभिप्रायावरून परवानगी दिली.

कांहीं स्नेह्यांनीं विशेषतः प्रो. व्ही. के. राजवाडे यांनीं कांहीं स्थळीं क्लिष्ट झालेली भाषा सोपी करण्याची सूचना केली होती व ती योग्यही होती. पण विश्वभारतीच्या तज्ज्ञांनीं फरक करण्याचें नाकारल्यावरून जसेंच्या तसेंच भाषांतर प्रसिद्ध करण्याचें ठरलें. रा. शंभूराव दातार भाषांतर ग्रंथ छापून तयार झाल्यावर पण प्रस्तावनेसह प्रसिद्ध होण्यापूर्वीं निवर्तल्यामुळें छापून झालेलें पुस्तक तसेंच पडून राहिलें.

तथापि कै. शंभूराव दातार यांचे चुलतबंधू प्रसिद्ध कॉंट्रॅक्टर रा. महादेव रामचंद्र दातार यांनीं आपल्या नव्या स्वतःच्या छापखान्यांत प्रस्तावना वगैरे राहिलेला भाग छापून प्रसिद्ध करण्याचें ठरविल्यामुळें आज कथाकदंब प्रसिद्ध होण्याचा योग आला.

रा. ना. गो. चाफेकर बी. ए., एल्एल् बी. यांनीं माझा अल्प परिचय असूनही केवळ कार्याकडे लक्ष देऊन प्रस्तावना लिहिली.

प्रथम परवानगी दिल्याबद्दल विश्वभारती, मग क्रमाक्रमानें रा. शंभूराव दातार, प्रो. राजवाडे, रा. ना. गो. चाफेकर, समर्थ भारत व विशेषतः रा. महादेव रामचंद्र दातार या सर्वांचा मी ऋणी आहें.

डॉ. टागोर यांचें अल्पचरित्र व त्यांच्या ग्रंथांतील विशेष स्वतंत्रपणें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचें अभिवचन देऊन वाचकांची रजा घेतों.

ता. १ सप्टेंबर १९३५
**नौ. वाडिया कॉलेज.**

**श्री. रा. मराठे.**

# १. सावधान



कांतिचंद्राचें वय फार नव्हतें, तथापि बायको मेल्यावर दुसरें लग्न करण्याचें मनांत येईना. पशुपक्षांची शिकार करण्यांतच मन रममाण होई. त्याचा बांधा उंच व सडपातळ, वर्ण श्याम, शरीर कांटक व चपळ, दृष्टी तीव्र व नेम अचुक. त्याचा पोषाख पाश्चात्यांप्रमाणें. बरोबर हिरासिंग पहिलवान, चख्खनलाल, संगीतविशारद खानसाहेब, मियानसाहेब, आणखी कांहीं मंडळी. अकर्मण्य अनुचर-परिचरांची कांहीं कमतरता नव्हती !

दोनचार शिकारी बंधुबांधव बरोबर घेऊन आश्विनमासीं नैदिघीच्या तलावर शिकारीकरितां कांतिचंद्र गेला. त्यांचा मुक्काम नदीवर दोन मोठ्या बोटींत होता. नोकरांचाकरांचें दल व त्यांच्या बोटींनीं सर्व घाट व्यापून टाकिला. ग्रामबंधूंचा पाणी नेणें, स्नान वगैरे व्यापार जवळजवळ बंद पडल्यासारखा झाला, बंदुकींच्या अवाजांनीं सर्व जल, स्थल कंपायमान झालें. रात्रीं गवयांच्या तानांनीं शेजाऱ्यांपाजाऱ्यांना स्वस्थ झोंप देखील येत नव्हती.

एके दिवशीं सकाळीं कांतिचंद्र बोटींत आपली बंदूक आपणच साफ करीत बसला होता. अशा समयीं जवळ हंसाचा शब्द ऐकूं आला म्हणून तो पाहूं लागला; तों एक बालिका दोन हंसांचीं पिल्लें दोन्ही हातांनीं छातीशीं धरून घाटाकडे जात होती. नदीचें पात्र लहान, पाणी वाहणें जवळजवळ बंदच झालेलें, नानाप्रकारच्या शेवाळांनीं भरून गेलेलें ! मुलीनें दोन्ही हंस पाण्यांत सोडून दिले व आपण, ते आटोक्याच्या बाहेर जातील म्हणून, भीतभीत प्रेमपूर्वक त्यांच्याकडे बघत होती. इतर दिवशीं हंसांना पाण्यांत सोडून ती जात असे पण, आज शिकाऱ्यांच्या भयानें निश्चिंत मनानें त्यांना सोडून तिला जातां येईना !

मुलीचें लावण्य फारच अप्रतिम. जणूं काय विश्वकर्म्यानें तिला आतांच निर्माण करून आणून सोडिलें होतें. तिचें वय चटकन् ओळखूं येण्यासारखें नव्हतें. शरीर विकास पावलेलें, पण चेहऱ्यावरील ऋजुता व मुग्धता स्पष्ट दर्शि-

वीत होती कीं, जगाचा अनुभव अणुमात्र आलेला नाहीं. आपण यौवनावस्थेंत पाऊल टाकिलें आहे याची जाणीव तिला मुळींच आलेली दिसली नाहीं.

कांतिचंद्रानें क्षणभर बंदूक साफ करणें ठेऊन दिलें; त्याचें मन चकित होऊन गेलें! अशा ठिकाणीं असें मुख दृष्टीस पडेल अशी आशा देखील नव्हती! हें मुख राजाच्या अंतःपुरापेक्षां ह्याच जागेला अधिक शोभा देत होतें. सुवर्णपात्रापेक्षां फूल झाडावरच अधिक शोभतें. ते दिवशीं शरद्-ऋतूच्या हिमकणांनीं व प्रभात-प्रभेनें नदीतीरावरील विकसित काश-वनाला विशेषच शोभा आणिली होती. त्यामुळें हें सरल मुग्ध मुखकमल कांतिचंद्राच्या मोहितचक्षूंना आश्विनांतील पूर्णचंद्राप्रमाणें भासलें! पर्वतराजपुत्री अशीच मंदाकिनीतटीं हंसशिशूंना वक्षस्थलीं धरून कधीं कधीं येत असे ही गोष्ट कालिदास विसरलासें दिसतें.

इतक्यांत, एकाएकीं ती भयत्रस्तबाला खिन्नवदन होऊन अव्यक्त आर्तस्वरानें हंसांना उचलून घेऊन त्वरेनें घाट सोडून गेली. कांतिचंद्र बाहेर येऊन पहातो तों, त्या बालिकेला भय दाखविण्याकरितां आपल्याच परिजनांपैकीं एकजण तिच्या हंसाकडे बंदुकीनें नेम धरीत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. कांतिचंद्रानें तत्क्षणीं त्याजपाशीं जाऊन हातांतील बंदूक हिसकावून घेऊन त्याच्या श्रीमुखांत एक चपराक दिली! तो भयचकित सेवक धाडदिशीं जमिनीवर पडला; कांतिचंद्र पुन्हां स्वस्थानीं येऊन बंदूक साफ करूं लागला.

कांतीच्यानें आतां राहवेना! तो पक्षांच्या अनुसंधानानें झुडपांतून आंत गेला. तों एका सुखवस्तू गृहस्थाचें आंगण लागलें. एका बाजूला साळींची रास, दुसऱ्या बाजूस एक स्वच्छ गाईचा गोठा व त्याला लागूनच एक लहानसें झाड; त्याच्याच खालीं सकाळीं पाहिलेली ती मुलगी एका घायाळ झालेल्या पांखराला उराशीं धरून रडत आहे; व एकीकडे त्या पांखराच्या चोंचीत आपल्या ओल्या पदरानें पाणी पिळीत आहे; एक पाळीव मांजर तिच्या गुडघ्यावर दोन पाय देऊन तोंड वर करून त्या बदकांकडे उत्सुकतेनें बघत आहे. मधून मधून मांजर जास्त धीटपणा करी तेव्हां, त्याच्या नाकावर बोटानें चापट मारून त्याला ती

मंडळींच्या कलरवाची जोड मिळाल्यानें त्या गोंधळाला समुद्र-मंथनाची शोभा आली. गांवकरी, सधन, वृद्ध गृहस्थ वगैरे स्वागताचा दुसरा कांहीं उपाय न सुचून ती ज्याच्या त्याच्या भोंवतीं हात जोडून फिरूं लागली.

नवरदेवांना अंतःपुरांत नेलेसें पाहून वऱ्हाडी मंडळींनीं भूक लागल्याची ओरड सुरूं केली. *नेसलेल्या धोतराचा एक पदर गळ्याभोंवतीं गुंडाळून यज्ञेश्वरपंतांनीं हात जोडून सर्वांची प्रार्थना केली—" आम्हीं यथाशक्ती केलेली तयारी पाण्यामुळें फुकट गेली."

शिधासामग्री वांईहून आणतांना कांहीं वाटेंत, तर कांहीं गळत्या स्वयंपाकघरांत भिजून चिंब झाली, चुली विझून गेल्या, सर्व जलमय झालें. लिंब असें गांव नाहीं कीं, इतक्या मंडळीला पुरेसें आयत्यावेळीं कांहीं फराळाला द्यायला आणतां येईल.

यज्ञेश्वरशास्त्र्यांची ही दुर्दशा पाहून अण्णासाहेबांना समाधान वाटलें. अण्णासाहेब म्हणाले—"इतक्या मंडळींना उपाशी तर ठेवायचें नाहीं ? कांहीं-तरी उपाय केलाच पाहिजे."

वऱ्हाडी मंडळी उठून गडबड करूं लागली. " आम्हीं आपले परत जातों," म्हणून म्हणूं लागली.

यज्ञेश्वरपंतांनीं हात जोडून प्रार्थना केली—"आपल्याला अगदींच उपवास पडूं देत नाहीं. लिंबचा खवा प्रसिद्ध आहे. थोड्याबहुत प्रमाणानें खवा, दूध मिळेल. आमच्या अंतःकरणांत काय दुःख होत असेल तें आमच्या आत्म्यालाच ठाऊक."

यज्ञेश्वरपंतांची दुर्गति पाहून, लिंबचे गवळी आले होते, त्यांना दया आली. " भितां कां शास्त्रीबुवा ? खवा, दूध जितकें खातील तितकें आम्ही पुरवतों " म्हणून गवळ्यांनीं सांगितलें. परगांवची वऱ्हाडी मंडळी उपाशी गेली तर, आपल्या गांवचा अपमान समजून गवळ्यांनीं दूध, खव्याचा उत्तम बंदोबस्त केला.

---

* बंगाली लोकांत ही नम्रता समजली जाते.

" पुरेसा दूध खवा मिळेल कां पण?" म्हणून वऱ्हाडी मंडळींनीं चौकशी केली. यज्ञेश्वरपंतांना आशा उत्पन्न झाली होती. ते म्हणाले–" हो, मिळेल." " बरं तर आणा " म्हणून वऱ्हाडी मंडळी बसली. अण्णासाहेब एका बाजूला मुकाट्यानें उभे राहून गम्मत पहात होते.

फराळाला बसायच्या जागेच्या सभोंवार एक तलावच बनला होता. शास्त्रीबुवा खवा जसजसा पानावर वाढीत गेले तसतसा मंडळींनीं खांद्यावरून मागच्या बाजूला चिखलांत टाकून द्यायला सुरवात केली!

बापड्या यज्ञेश्वरपंतांचे डोळे पाण्यानें भरून आले. वारंवार प्रत्येकाच्या पुढें शास्त्रीबुवांनीं हात जोडले व म्हणाले–" मी अत्यंत सामान्य मनुष्य, आपल्याशीं संबंध करायला योग्य नाहीं."

एकजण हंसत हंसत म्हणाले–" मुलीचे वडील खरेना आपण? तो अपराध कुठें जाईल?" यज्ञेश्वरपंतांच्या गांवची वृद्ध मंडळी पुनः पुनः धिःकार करून म्हणूं लागली–" आपली स्थिती ओळखून आपल्या योग्य स्थळीं मुलगी दिली असती तर अशी फजिती नसती झाली!"

इकडे अंतःपुरांत मुलीच्या आजीला, मंगलकालीं डोळ्यांत पाणी आणणें अशुभ हें ठाऊक असूनहि तिला रडूं आवरेना. तिचें पाहून मुलगीही रडूं लागली. यज्ञेश्वरपंतांच्या काकीनें येऊन माधवाला म्हटलें, " बाबा, जो अपराध व्हायचा तो तर होऊन गेला; आतां क्षमा करा, आजचें येवढें शुभ कार्य संपूर्ण होऊं द्या."

इकडे गांवच्या गवळ्यांनीं खव्याचा असा अपव्यय होतांना पाहून गडबड करण्यास सुरुवात केली. वऱ्हाडी मंडळींशीं अशा वेळीं त्यांचें भांडण जुंपेल या भयानें यज्ञेश्वरपंतांनीं त्यांना शांत करण्याकरितां पराकाष्ठा केली. नवरा मुलगा एकाएकीं भोजनगृहांत आला. मंडळींनीं ओळखलें कीं, नवरा मुलगा रागानें आंतून बाहेर आला आहे. मग तर वऱ्हाडी मंडळींना अधिकच उत्साह आला.

माधव सद्गदित कंठानें म्हणाला—" बाबा! आपल्या मंडळींचें हें काय वागणें?" इतकें म्हणून खव्याचें एक ताट आपल्या हातांत घेऊन स्वतः वाढण्यास

सुरुवात केली. गवळ्यांना सांगितलें कीं, "तुम्हीं मागें उभे रहा, कोणाचा खवा चिखलांत पडला तर तोच पुन्हां त्यांना घ्यावा लागेल."

एकदोन गृहस्थ उठून जावें कीं कसें म्हणून विचार करीत अण्णासाहेबांच्या तोंडाकडे पाहूं लागले. माधव म्हणाला—"बाबा तुम्हीं बसा कसे, आधींच पुष्कळ उशीर झाला आहे."

अण्णासाहेब बसतांच खवा जिथल्यातिथें पोहोंचला.

  

*** मोठमोठ्या शहरांत कांहीं सुधारणा झाली असली तरी, जुन्या घराण्यांमधून आजमितीसही वधूकडील पक्षाला वरपक्षाकडून कसा त्रास पोंचत असतो याचें हें लहानसें शब्दचित्र आहे. सामाजिक सुधारणा घडवून आणण्यास निबंधांपेक्षां अशा साहित्याचा विशेष उपयोग होण्यासारखा आहे.



# दालिया



[ डॉक्टर टागोर यांच्या इतर कथांप्रमाणेंच या कथेंतही मनोरंजकता गोष्टींतील कथानकाच्या अद्भुतपणावर नसून त्यांतील स्वभावोक्ती, नैसर्गिकपणा, त्यांच्या उपमा, स्वभाव व स्थलवर्णन-चातुर्य या गुणांवर अवलंबून आहे.

आमिनेचें प्रेम दालियावर कसें बसलें, व दालियानेंही जी भूमिका तिला वश करण्याकरितां घेतली होती ती शेवटपर्यंत कशी चातुर्यानें कायम ठेविली हें मनन करण्याजोगें आहे. दोघी बहिणींच्या स्वभावांतील साम्य व भेद फार मार्मिकपणानें दाखविलीं आहेत. स्त्रीस्वभाव, यौवनावस्थेंतील मनाची स्थिती, सहवासाचा परिणाम वगैरे प्रसंग फार कुशलतेनें वर्णिले गेले आहेत.

जुलीखेचा मानीपणा शहाजादीला शोभेल असाच आहे.

आमीनेचे शब्द " तुझ्या पायां पडतें, तूं त्याला कांहीं बोलूं नकोस " व त्यावर ग्रंथकाराचे उद्गार-" जणूं काय हा युवक म्हणजे तिचें पाळलेलें एक हरीणच " वगैरे शब्दांनीं आमीनेचा स्वभाव, निष्कपटपणा जितका उत्कृष्ट दाखविला गेला आहे तितका पुस्तकांचीं दहा पृष्ठें वर्णन करण्यांत घालविलीं असतीं तरी झाला नसता. रवींद्रांच्या काव्यांतील हा विशेष गुण त्यांच्या प्रत्येक लेखांत दिसून येण्याजोगा आहे.

गोष्टीचा शेवटही फार बहारीचा आहे.]

## भूमिका

शहासुजा पराभव पावून औरंगजेबाच्या भयानें पळाला व आराकानच्या राजाचा त्यानें आश्रय घेतला. त्याच्याबरोबर तीन रूपवती कन्या होत्या. आपल्या कुमारांचा त्यांच्याशीं विवाह करावा अशी राजास इच्छा झाली. ही गोष्ट ऐकून शहासुजा फारच रागावला. हें राजाला सहन न होऊन त्यानें हुकूम केला कीं, कपटानें त्याला नावेंत बसवून सहपरिवार बुडविण्यांत यावें. ह्या विपत्समयीं आपली कनिष्ठ कन्या जी आमीना तिचें बापानें स्वतःच नदीमध्यें विसर्जन केलें. ज्येष्ठ कन्येनें आत्महत्या करून प्राण दिला. सुजाचा एक विश्वासू नोकर रहमतअली जुलीखेला घेऊन पळाला व सुजा लढतां लढतां मरण पावला.

इस्पितळांत पाठविल्यावर क्षीरोदा बरी झाली ! आत्महत्येच्या गुन्ह्याकरितां मॅजिस्ट्रेटनें खटला सेशन-कमिट केला.

## द्वितीय परिच्छेद

जज्जसाहेबांचें नांव मोहितमोहन दत्त. हे स्टॅट्यूटरी सिव्हीलियन ! त्यांच्या कठोरतेमुळें क्षीरोदेला फांशीची शिक्षा झाली. त्या हतभागिनीच्या अनुकंपनीय अवस्थेबद्दल दया येऊन वकील मंडळींनीं तिला वांचविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्यांना यश आलें नाहीं. जज्जसाहेबांना ती दयेला पात्र आहे असें मुळींच वाटेना.

त्यांना तसें वाटण्याचें कारण होतें. एकीकडे हे हिंदु महिलांना देवींची उपमा देत ! पण स्त्रीजातीविषयीं यांचा आंतरिक अविश्वास ! त्यांच्या मतें, जो रमणीगण मर्यादा छेदून टाकण्यास उन्मुख झाला आहे त्यांना शासन तिळमात्र जरी शिथिल झालें तरी ह्या समाजकारागृहांत एकही कुलस्त्री अवशिष्ट राहणार नाहीं.

त्यांना असें वाटण्याला कारणें होतीं हें वर सांगितलें आहेच; तीं आपणांस समजण्याकरितां त्यांच्या चरित्रांतील युवावस्थेची थोडी आलोचना केली पाहिजे.

मोहितमोहन कॉलेजच्या दुसऱ्या वर्षीच्या वर्गांत असतांना हिंदु या दृष्टीनें आचार-विचारांत संपूर्ण स्वतंत्र प्रकृतीचे गणले जात. पुढें टक्कल, मागें शेंडी, प्रतिदिन प्रातःकाळीं अधरोष्ठप्रांतावरील रोमांकुरांचा तीक्ष्ण क्षुराधारेनें उच्छेद, सोनेरी चष्मा, नासिकाग्रमात्रवर्ती मिशा, साहेबी थाटाचा केशविन्यास, जणूं काय विसाव्या शतकांतील दुष्यंताची अगदीं ताजी आवृत्ति ! यांचें शरीरशोभेकडे विशेष लक्ष. मद्यमांसाबद्दल अरुची नाहीं, व आनुषंगिक आणखी एक दोन उपसर्ग यांच्यामागें होतेच.

यांच्या घरापासून जवळच एक गृहस्थ रहात असत. त्यांची हेमशशी नांवाची एक विधवा कन्या होती. तिचें वय फार नव्हतें, चौदावें संपून पंधरावें लागलेलें.

समुद्रावरून वनराजिनीला तरभूमी जशी रमणीय स्वप्नाप्रमाणें सुंदर भासते तशी तीरावरून पहातां दिसत नाहीं. वैधव्याच्या वेष्टनांतरालमुळें

संसारापासून दूर अंतरावर असल्यामुळें संसार तिला रहस्यमय प्रमोदवनाप्रमाणें भासत असे. तिला बिचारीला कसें समजणार कीं ही, जगयंत्रघटना अत्यंत जटिल, लोहकठिण, सुखदुःख, संपत्ति-विपत्ति, संशय, आशानिराशा, परिताप यांनीं भरलेली. तिला वाटे ही संसारयात्रा कलनादयुत निर्झरणीच्या स्वच्छ जलप्रवाहाप्रमाणें सुगम, सन्मुखवर्ती, पृथिवीवरील सर्व मार्ग प्रशस्त व सरल, सुख केवळ तिच्या वातायनाबाहेर व असंतृप्त आशा, आकांक्षा तिच्या वक्षपंजरवर्ती स्पंदमान, परितप्त कोमल हृदयाभ्यंतरीं. विशेषतः या समयीं तिच्या अंतराकाशांतील दूर दिगंतापासून यौवनसमीरणानें उद्भव पावून विश्वसंसाराला वसंतऋतूंतील विलक्षण सौंदर्यानें सुशोभित केलें होतें. समस्त नीलांबर यौवनसमीरणाच्याच हृदयांदोलनानें पूर्ण शोभेप्रत नेलें होतें व त्याचाच सुगंध चारी दिशांना रक्तपद्माच्या कोमलदलांतरित रागाप्रमाणें विकसित करीत होता.

घरांत आईबाप व दोघे धाकटे भाऊ यांखेरीज कोणी नव्हतें. हे दोघे सकाळच्या प्रहरीं खाऊन शाळेंत जात. शाळेंतून आल्यावर जेवण झाल्यावर पुन्हां शाळेंत जात. बापाला पगार फारच थोडा, त्यामुळें घरीं शिक्षक ठेवण्याचें सामर्थ्य नव्हतें.

काम आटपून अवसर मिळाला म्हणजे "हेम" तिच्या घरांतल्या खिडकींत बसून रस्त्यांतील जाणाऱ्या येणाऱ्यांकडे लक्ष लावून बघत बसे; तिला वाटे पथिक सुखी, भिकारी स्वतंत्र, फेरीवाल्यांनाही उदरनिर्वाहाकरितां विशेष श्रम पडत नसून हेही राजपथरूपी रंगभूमीवरील नटच !

शिवाय, सकाळीं दुपारीं, वेळीं अवेळीं नटवेशधारी, गर्वोद्धत, स्फीतवक्ष मोहितमोहन तिच्या नजरेस पडे. तो तिला सर्वसौभाग्यसंपन्न नरश्रेष्ठ महेंद्राप्रमाणें भासे. मनांत येई कीं, ह्या सुवेशधारी सुंदर तरुणापाशीं सर्व कांहीं आहे. हा आपलें सर्वस्व अर्पण करण्याला योग्य. मुली ज्याप्रमाणें आपल्या बाहुलीला सजीव मनुष्य समजून तिच्याशीं खेळतात त्याप्रमाणें ही विधवा बालिका मनांतल्यामनांत मोहितला सर्वालंकारांनीं सज्जित करून त्याला देवता समजून त्याच्याशीं खेळे.

एखाद दिवशीं संध्याकाळीं मोहितच्या घरीं जिकडे तिकडे दिव्यांचा चकचकाट, नर्तकीच्या नूपुरांचा आवाज व सर्व घर गायिकेच्या संगीत ध्वनीनें मुखरित असें तिच्या दृष्टीस पडे. अशा दिवशीं भिंतीवरील चंचल छायेकडे पहात विनिद्र सतृष्ण नेत्रांनीं रात्रीच्या रात्र हेम जागून काढी. तिचें व्यथित-पीडित—हृदय पिंजऱ्यांतील पक्ष्याप्रमाणें वक्षपंजरावर वेगानें आघात करी.

ती आपल्या कृत्रिम दैवताची विलासमत्तेबद्दल निंदाभर्त्सना करी ? मुळींच नाहीं. अग्नी ज्याप्रमाणें पतंगाला नक्षत्रलोकचें प्रलोभन दाखवून आकर्षण करितो त्याप्रमाणें मोहितचें प्रज्वलित, गीतवाद्यध्वनिपूरित, प्रमोदमदिरोच्छ्वसित निवासस्थान हेमशशीला स्वर्गमरीचिकेप्रमाणें आकर्षित करी.

गंभीर रात्रीं एकाकिनी जागत बसून त्या अदूरवर्ति वातायनांतर्गत उजेड, छाया, संगीत व आपल्या आकांक्षा, कल्पना यांच्या साहाय्यानें ती मनोराज्य निर्माण करी व त्या मायापुरींत मनोनिर्मित मूर्ती प्रस्थापित करून विस्मित मुग्ध नेत्रांनीं निरीक्षण करीत बसे व आपलें जीवन, यौवन, सुख व दुःख, ऐहिक व पारलौकिक ध्येयाची वासनारूपी अग्नीमध्यें धूपाप्रमाणें आहुती देऊन त्या निर्जन निस्तब्ध मंदिरामध्यें पूजा करीत बसे. त्या सन्मुख-वर्ती वातायनाच्या अभ्यंतरांतील प्रमोदप्रवाहामध्यें क्लांती, ग्लानी, पंक, बीभत्स क्षुधा भरलेली असून प्राणक्षयकारी दाहशक्ती आहे ह्याचें ज्ञान तिला नव्हतें. त्या वीतनिद्र-निशाचर-आलोकामध्यें हृदयहीन निष्ठुरतेचें कुटिल हास्य प्रलय-क्रीडा करीत आहे हें विधवा बालिकेला दुरून कसें दिसणार ? हेमशशीला आपल्या निर्जन वातायनामध्यें बसून तो मायास्वर्ग व ती कल्पित देवता घेऊन आपलें आयुष्य दीर्घकालीन स्वप्नाप्रमाणें कंठितां आलें असतें. पण दुर्दैवानें देवतेनें अनुग्रह केला व स्वर्ग निकटवर्ती होऊं लागला. स्वर्ग ज्या वेळीं भूलोकावर अवतरला त्या वेळीं स्वर्ग तर नष्ट झालाच पण जिनें असहाय स्वर्ग-रचना केली तीही धुळीला मिळाली.

या वातायनवासिनी मुग्ध बाल-विधवेवर मोहितबाबूंची लोल-दृष्टि केव्हां पडली, विनोदचंद्र ह्या धारण केलेल्या खोट्या नांवानें वारंवार पत्रें केव्हां लिहिलीं,

शेवटीं एक साशंक, उत्कंठित, अशुद्ध, हृदयावेगभरित उत्तर कधीं आलें, नंतर कांहीं दिवस, घात, प्रतिघात, उल्हास, संकोच, संदेह, संभ्रम, आशा यांचा ओघ कसा वाहूं लागला, तदनंतर प्रलयसुखोन्मत्ततेमध्यें समस्त विश्व त्या विधवेच्या चोहों बाजूंनीं कसें घूर्णमान होऊं लागलें व घूर्णनवेगानें समस्त जगत् छायावत् अदृश्य कसें झालें, व शेवटीं एके दिवशीं अकस्मात् त्या घूर्णमान संसारचक्रापासून वेगानें विच्छिन्न होऊन ती रमणी दूर जाऊन कशी पडली हें सकळ वर्तमान विस्तारानें वर्णन करण्याची आवश्यकता दिसत नाहीं.

एके दिवशीं मध्यरात्रीचे सुमारास आईबाप, भाऊ, घर सोडून हेमशशी विनोदचंद्र ह्या छद्मनामधारी मोहितमोहनबाबूंचेबरोबर गाडींत जाऊन बसली. देवप्रतिमा ज्या वेळेस मृत्तिका, खडे, रंगांच्या दागिन्यांनिशीं तिच्या पार्श्वभागीं संलग्न झाली तेव्हां ती लज्जेनें, धिःक्कारानें मातीला मिळाल्यासारखी झाली.

शेवटीं गाडी चालूं झाली तेव्हां ती रडूं लागली. मोहितचे तिनें पाय धरले आणि म्हणाली—" अहो, तुमच्या पाया पडत, मला घरीं पोंचवा. " मोहितनें तिचें मुख आवळून धरिलें, गाडी जोरानें चालूं लागली.

जलनिमग्न आसन्नमरण व्यक्तीच्या मनांत आयुष्यांतील समग्र घटना क्षणार्धांत जशी उदय पावते तद्वत् गाडीचें दार बंद केल्यावर त्या गाढ अंधकारामध्यें हेमशशीच्या मनामध्यें आयुष्यांतील सर्व घटना उद्भूत झाली. प्रतिदिवशीं बाप आपल्याला बरोबर घेतल्यावांचून जेवीत नाहीं. कनिष्ठ भाऊ शाळेंतून आल्यावर दिदीनें वाढण्याबद्दल हट्ट धरतो, त्याची आठवण झाली, सकाळीं आपण आईबरोबर विडे करीत बसतों, आई आपली वेणी पहाटेस घालते इत्यादि सर्व गोष्टी तिच्या मनांत उभ्या राहिल्या. घरांतील कोपरान्कोपरा व दिवसांतील एकंदर व्यवहार तिच्या डोळ्यांसमोर स्पष्ट उभा राहिला. या वेळीं तिचें निभृत जीवन व तिचा क्षुद्र प्रपंच तिला स्वर्गवत् वाटूं लागला. ते विडे करणें, वेणीफणी, वडिलांना भोजनसमयीं वारा घालणें, भावांच्या खोडया हें समस्त तिला परम शांतिपूर्ण दुर्लभ सुखवत् भासूं लागलें. हें सर्व असल्यावर संसारांत आणखी कांहीं सुखाची आवश्यकता आहेसें वाटेना.

" तुझा नसेल पण आमचा तर आहेना ? आम्ही परक्याच्या घरच्या स्त्रीला कोणत्या निमित्तानें ठेऊन घ्यावें ? "

कादंबिनी म्हणाली—" माझें सासर कोणतें ? "

योगमाया मनांत म्हणाली—" मरण आपलें ! कपाळकरंटे, बोलतेस काय ? "

कादंबिनी हळुंहळूं बोलली—" मी तुमची कोण ? मी का इहलोकची ? तुम्ही हसतां, रडतां, प्रीति करितां, सर्वजण आपापलें घेऊन आहांत, मी तर बघतें आहें ! तुम्ही मनुष्य, मी छाया मात्र. परमेश्वराला ठाऊक त्यानें मला तुमच्या ह्या प्रपंचांत कां ठेविलें ! "

हें बोलतांना कादंबिनी अशा रीतीनें बोलत होती कीं योगमायेला सरासरी तिच्या म्हणण्याचा गोळाबेरीज अर्थ लक्षांत आला, पण खरी गोष्ट ती समजली नाहीं कां तिला उत्तरही देतां आलें नाहीं. पुनः विचारावेंसेंही वाटेना. ती अत्यंत कष्टी होऊन गंभीर मुद्रेनें निघून गेली.

## चतुर्थ परिच्छेद

दहाच्या सुमारास राणीहाटहून श्रीपतिबाबू परत आले. पाऊस मुसळधार पडत होता. पावसाचा सो सो शब्द एकसारखा होत असल्यामुळें मनाला वाटे कीं, पाऊस थांबत नाहीं व रात्रही संपत नाहीं.

योगमायेनें विचारलें—" काय झालें ?"

श्रीपति म्हणाले—" ती एक लांबलचक कथा आहे. मग बोलूं. " इतकें म्हणून कपडे बदलून जेऊन घेतलें. तंबाखू खाऊन निजायला गेले, पण मन अत्यंत सचिंत.

योगमायेनें इतका वेळ धीर धरला होता. आंथरुणावर पडतांच विचारलें— " काय ऐकलेंत सांगा तरी ?"

श्रीपति म्हणाले—" खास तूं कांहीं तरी चूक करते आहेस. "

हे ऐकतांच योगमाया मनांतल्या मनांत थोडी रागावली. बायका कधीं चुका करीत नाहींत, केल्या तर त्याचा उल्लेख करणें शहाण्या माणसाचें काम

नाहीं. सर्व मूर्खपणा आपल्या पदरांत घेण्यांत शहाणपण. योगमाया किंचित् उत्तेजित होऊन म्हणाली—" काय ? ऐकलेंत तरी काय ?"

श्रीपति म्हणाले—" ज्या स्त्रीला तूं आपली सोबतीण म्हणून घरांत जागा दिलीस ती तुझी मैत्रीण कादंबिनी नाहीं."

असें कोणी सांगितलें तर साहजिकच राग येण्याजोगें आहे—विशेषतः स्वतःच्या नवऱ्याच्या तोंडून ऐकल्यावर तर बोलायलाच नको. योगमाया म्हणाली "आमची मैत्रीण आम्हांला ओळखतां येत नाहीं. तुमच्याकडून ओळख पटवून घ्यायला हवी. काय पण बोलणें शोभतें !"

श्रीपति म्हणाले—" ह्या ठिकाणीं बोलणें शोभतें न शोभतें म्हणून वाद घालण्यांत अर्थ नाहीं. कांहीं तरी प्रमाण पाहिजे. तुमची कादंबिनी मैत्रीण मरून गेली आहे ह्यांत संदेह नाहीं."

योगमाया म्हणाली—" माझें ऐकाल ? तुम्हीं खास कांहीं तरी गोंधळ माजवून आलां आहांत. कुठें जायचें न् कुठें गेलात, काय ऐकायचें न् तें काय ऐकलेंत त्याचा कांहींच मेळ नाहीं. आधीं स्वतः जायला सांगितलें होतें कुणी ? एक पत्र लिहिलें असतें तर सगळा खुलासा नसता झाला ?"

आपल्या कार्यक्षमतेसंबंधीं आपल्या स्त्रीचा इतका अविश्वास पाहून श्रीपतिबाबू अत्यंत क्षुण्ण झाले; मोठा विस्तार करून एकंदर प्रमाणपुरावा देऊं लागले. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. उभयपक्षीं हो ना करतां करतां मध्यान्ह रात्र उजाडली. जरी कदंबिनीला त्या क्षणीं घरांतून बाहेर घालवून देण्यासंबंधीं नवरा-बायकोमध्यें मतभेद नव्हता—कारण श्रीपतिबाबूंना वाटलें कीं कादंबिनीनें परिचयाच्या मिषानें इतके दिवस आपल्या स्त्रीशीं प्रतारणा केली व योगमायेला वाटत होतें ती घरांतून निघून आली—तथापि उपस्थित वादांत कोणी कोणाला हार जाईना.

दोघांचाही स्वर क्रमाक्रमानें वाढत गेला; शेजारच्या खोलींत कादंबिनी निजली आहे हें दोघेंही विसरलीं.

एकानें म्हटलें–"चांगलेच विपत्तींत पडलों ! मी आपल्या कानांनीं ऐकून आलों आहें."

दुसऱ्यानें दृढस्वरानें म्हटलें–" तें सांगितलेलें कोण ऐकेल ? मी आपल्या डोळ्यांनीं बघतें आहें !"

शेवटीं योगमायेनें विचारलें–" ठीक आहे. कादंबिनी केव्हां मेली बोला बघूं ? "

तिच्या मनांत कादंबिनीच्या एखाद्या पत्राच्या तारखेशीं विसंगतता दाखवून श्रीपतिबाबूंचा भ्रम सप्रमाण सिद्ध करून दाखवावा.

श्रीपतिबाबूंनीं जी तारीख सांगितली ती, दोघांनींही हिशोब करून पहातां, जे दिवशीं संध्याकाळीं कादंबिनी त्यांच्या घरीं आली त्याच्याबरोबरच आदले दिवशीं पडूं लागली. तें ऐकतांच योगमायेची छाती धडधडूं लागली, श्रीपतिबाबूंनाही कसेंसेंच झालें.

इतक्यांत त्यांच्या खोलीचें दार उघडलें गेलें, एक वाऱ्याची झुळूक येऊन दिवा विझला. बाहेरच्या अंधकारानें येऊन सर्व खोली भरून टाकली. कादंबिनी एकाएकीं खोलींत येऊन उभी राहिली. यावेळीं रात्र अडीच प्रहर होऊन गेली होती. बाहेर वृष्टी एकसारखी चालू होती.

कादंबिनी म्हणाली–" अग, तीच मी तुझी कादंबिनी, पण आतां मी जिवंत नाहीं, मी मरून गेलें आहें."

योगमाया भयानें ओरडली– श्रीपतिबाबूंच्या तोंडून शब्द उमटेना !

"मी मेलें आहें एवढें सोडून दिलें तर मी तुमचा काय अपराध केला आहे? मला जर इहलोकीं स्थान नाहीं आन् परलोकीं स्थान नाहीं तर, हाय रे! मी जाऊं तरी कुठें ? "

जणूं काय त्या गंभीर वर्षानिशीथ समयीं सुप्त विधात्याला जागृत करण्याकरितां उच्च स्वरानें चीत्कार करून कादंबिनी म्हणाली–" हायरे ! मी कुठें जाऊं ? "

इतकें म्हणून त्या मूर्च्छित दंपतीला अंधकारांत सोडून कादंबिनी आपल्याला कुठें स्थान मिळेल का म्हणून शोधार्थ निघाली.

## पंचम परिच्छेद

कादंबिनी राणीहाटला परत कशी गेली हें सांगणें कठीण. परंतु प्रथम कोणाच्याही दृष्टीस पडली नाहीं. सारा दिवस एका पडक्या देवळांत उपाशी काढला.

वर्षाऋतूंतील अकालसंध्या जसजशी अत्यंत निबिड होऊं लागली व आसन्न-दृष्टीच्या आशंकेनें गांवांतले लोक व्यस्त होऊन आपापल्या घराचा आश्रय करूं लागले अशा वेळीं कादंबिनी बाहेर रस्त्यावर आली. श्वशुरगृहद्वारीं जातांच तिची छाती धडधड करूं लागली, पण तोंडापर्यंत पदर ओढून घेऊन जेव्हां आंत प्रवेश केला तेव्हां दासी समजून दारावर कोणी अडिवलें नाहीं. या सुमारास पाऊस खूप जोरानें पडूं लागला होता, व वाराही जोरानें वाहूं लागला.

त्या समयीं गृहिणी—शारदाशंकरबाबूंची स्त्री—आपल्या विधवा नणंदेशीं पत्ते खेळत बसली होती. मोलकरीण स्वयंपाकघरांत होती, व दुखणाईत मुलगा ताप कमी झाल्यामुळें निजायच्या खोलींत बिछान्यावर झोंप येऊन पडला होता. कादंबिनी सगळ्यांची नजर चुकवून त्याच खोलींत शिरली. ती काय मनांत येऊन श्वशुरघरीं आली तें सांगतां येत नाहीं, तिला स्वतःला देखील सांगतां आलें नसतें. केवळ एकदां मुलाला आपल्या डोळ्यांनीं पाहून यावें येवढी इच्छा. त्यानंतर कुठें जावें, काय होईल, ही गोष्ट तिच्या मनांतही आली नाहीं.

रुग्ण, शीर्ण मुलगा हाताच्या मुठी मिटून निजला आहे असें दिव्याच्या उजेडांत तिला दिसलें. मुलाला पाहून तिचें उत्तप्त हृदय जणूं काय तृषाकुल झालें. त्याच्या विपत्तीचा भार आपल्यावर घेऊन, त्याला उराशीं कवटाळून धरल्यावांचून तिच्यानें थोडेंच राहवणार! पुन्हां तिच्या मनांत आलें, "माझ्या पश्चात् त्याला पहायला कोण आहे? त्याच्या आईला मैत्रिणींत बसणें, गप्पागोष्टी सांगणें, खेळणें यांची आवड; इतके दिवस माझ्यावर भार टाकून ती निश्चिंत होती. तिला कधीं मूल वाढवायचें वर्तवायचें ठाऊक नाहीं, आज ती ह्याचें कसें करणार!"

बंधन अधिकच दृढ झालें. बापाच्या त्रासानें इतक्या गंभीर प्रकृतीच्या फकीरला देखील नोकरीच्या उमेदवारीकरितां ऑफिसा–ऑफिसांतून जावें लागलें. तरी नोकरीचा योग जुळेना.

तेव्हां बुद्धाप्रमाणें आपण संसारत्याग करावा, असें मनांत आणून एके दिवशीं काळोख्या रात्रीं स्वारी घरांतून बाहेर पडली.

२

मध्यंतरीं आणखी एक इतिहास सांगणें जरूर आहे.

नवग्रामवासी यष्टीचरणाला एक मुलगा होता. त्याचें नांव माखनलाल. विवाहानंतर थोड्याच दिसांत पुत्रसंतान न झाल्यामुळें, बापाच्या आग्रहावरून व कांहीं नावीन्यप्रलोभनामुळें आणखी एक लग्न केलें. ह्या विवाहानंतर माखनला दोघी स्त्रियांच्या पोटीं मिळून सात मुली व एक मुलगा झाला.

माखन मोठा हौसी व चंचल प्रकृतीचा. कोणत्याही कामांत पडून आपल्याला बांधून घेणें त्याला मुळींच पसंत नव्हतें. एकतर मुलाबाळांचा भार, त्यांतच जेव्हां दोन कर्णधार दोहींकडे ओढाताण करूं लागले तेव्हां असह्य होऊन तोही एक दिवस मध्यरात्रीं दिसेनासा झाला. पुष्कळ दिवस झाले तरी त्याचा पत्ता नाहीं. कधीं कधीं ऐकण्यांत येत असे कीं, एका लग्नांत किती सुख असतें याचा अनुभव घेण्याकरितां काशीस जाऊन त्यानें गुप्तरूपानें आणखी एक लग्न केलें आहे; ऐकूं येई कीं तो ह्या लग्नापासून सुखांत आहे. एवढेंच कीं गांवीं जावें म्हणून मधून मधून मन उतावीळ होत असतें. पण पकडले जाऊं या भीतीनें तो येत नाहीं.

३

कांहीं दिवस भटकतां भटकतां विरक्त फकीरचंद नवग्रामीं प्राप्त झाले. पथ-पार्श्ववर्ती एका वटवृक्षाच्या छायेखालीं बसून दीर्घश्वास सोडून म्हणूं लागले— अहो ! " वैराग्यमेवाभयम् । " दारा, पुत्र, धन, जन कोणी कुणाचें नाहीं. "का ते कांता कस्ते पुत्रः " एक गाणें जुळविलें.

वेड्या मना उगिच तळमळसी ।
करि उपाय जोडी मुक्ती, सोडि विषयासक्ती ॥

ऐके साधुची उक्ती, व्यर्थ कां हळहळसी ॥ भेदि भव शुक्ति, त्याजि गृह दारापत्ती । भोळ्या मना अजुनि कां भवकर्दमीं रुतसी ॥

एकाएकीं गाणें बंद पडलें " हो रे हो, वडिलच दिसताहेत ! पत्ता लागला वाटतें ! पुन्हां मला संसारकूपांत खेंचून नेतील ! पळालेंच पाहिजे. "

४

फकीरनें घाबऱ्या घाबऱ्या जवळच्या एका घरांत प्रवेश केला. घराचा वृद्ध मालक तमाखु ओढीत होता. फकीरला घरांत डोकावतांना पाहून प्रश्न केला— "कोण हो तुम्ही ?"

फकीर—" बाबा आम्ही संन्यासी. "

वृद्ध—" संन्यासी ? पाहूं पाहूं, जरा उजेडांत या बरें."

इतकें म्हणून उजेडांत ओढून नेऊन वृद्ध मनुष्य ज्याप्रमाणें मोठ्या संकटानें पुस्तक वाचतो तद्वत् वांकून फकीरच्या तोंडाकडे बघत बघत आपल्याशींच बडबड करूं लागला. " हा तर आमचा माखनलाल दिसतो. तस्सेंच नाक, तस्सेच डोळे, केवळ कपाळांत फरक दिसत आहे. उज्वल मुख दाढीमिशानीं कसें अगदीं झांकून टाकलें आहे. " असें म्हणून त्या वृद्धानें फकीरच्या श्मश्रुल मुखावरून हात फिरवून म्हटलें—" बाबा माखन."

त्या वृद्धाचें नांव यष्टीचरण.

फकीर ( विस्मयानें )—माझें नांव तर माखन नाहीं. पूर्वाश्रमीं या देहाचें नांव कांहीं कां असेना, सांप्रत आमचें नामाभिधान चिदानंदस्वामी. वाटल्यास परमानंदही म्हटल्यास हरकत नाहीं.

यष्टीः——तूं आतां आपल्याला चित्रान्न नाहीं तर परमान्न म्हण. तूं तर आमचा माखन. बाबा, तें तर आम्ही विसरलों नाहीं. तुला असें कोणतें दुःख होतें तर तूं संसार सोडून गेलास ? तुला काय कमी होतें ? तुझ्या दोन बायका.

थोरली आवडत नसली तर धाकटी आहे. संततीलाही कमी नाहीं. परमेश्वर-कृपेनें सात मुली एक मुलगा ! मी तुझा वृद्ध बाप. मी किती दिवस जगणार? सारें तुझेंच आहे.

फकीर एकाएकीं क्षुब्ध होऊन म्हणाला––काय हा प्रलाप! ऐकूनच आंगावर कांटा उभा राहतो !

आतां, यावेळीं त्याला काय चाललें आहे याचा खुलासा झाला.

फकीरनें विचार केला–काय बिघडलें ? दोन दिवस या वृद्धाचेच घरीं त्याचा मुलगा म्हणून लपून रहावें. बाप निराश होऊन गेल्यावर संधी साधून येथून पलायन करावें म्हणजे झालें.

फकीरला निरुत्तर पाहून वृद्धाच्या मनांत मुळींच संशय उरला नाहीं. नोकराला बोलावून सांगितलें– " अरे केष्टा, तूं सगळ्यांना खबर दे कीं, आमचा माखन परत आला आहे. "

५

पहातां पहातां सगळ गांव गोळा झालें. गांवांतील अधिकांश लोकांनीं तोच हा म्हणून म्हटलें. कोणी कोणी संदेहही प्रगट केला. पण विश्वास ठेवण्याला लोक इतके उतावीळ झाले होते कीं, न ठेवणारांवर ते रागावूं लागले, जणूं काय ते बुद्धिपुरस्सर रसभंग करूं पहात होते. जे भोळे होते व ज्यांनीं हें खरें मानलें त्यांना वाटे हे लोक भूत मानीत नाहींत तर न मानोत ! कांहीं आश्चर्यकारक गोष्ट ऐकून जेव्हां सर्व लोक स्तब्ध होऊन जातात तेव्हां हे प्रश्नावर प्रश्न विचारीत असतात. एका दृष्टीनें हे नास्तिकच खरे. तें असो, भुतांवर विश्वास न ठेविल्यानें कांहीं हानी होत नाहीं, पण वृद्ध बापाच्या हरवलेल्या मुलावर विश्वास न ठेवणें म्हणजे किती अधमपणाचें कृत्य आहे ! सर्वांकडून निर्भर्त्सना झाल्यामुळें संशयी मंडळींचीं तोंडें बंद पडलीं.

फकीरच्या अतिभीषण अचल गांभीर्याला न जुमानतां गांवच्या लोकांनीं त्याला घेरून म्हटलें––अरे वा! आमचा माखन तर मोठा ऋषी बनला आहे,

मोठा तपस्वी झाला आहे. इतके दिवस टवाळ्या करण्यांत घालवून आज महा-मुनी जमदग्नी होऊन आले आहेत.

उन्नतचित्त फकीरचंदाला हीं बोलणीं फारच झोंबूं लागलीं, पण निरुपायानें सहन करावीं लागलीं.

एकानें आंगाशीं येऊन विचारिलें—अरे माखन, तूं तर थोडा काळा होतास, आपला रंग कसा बदललास ?

फकीरनें उत्तर दिलें—योगाभ्यासानें.

सर्वजण म्हणाले—योगाचा काय प्रभाव हा !

एकानें उत्तर दिलें—त्यांत कसलें आश्चर्य ? शास्त्रांत सांगितलेंच आहे. भीम जेव्हां हनुमानाचें पुच्छ धरून उचलूं लागला तेव्हां तें कांहीं केल्या उचलेना. हा कशाचा परिणाम ? योगाचाच.—ही गोष्ट सगळ्यांना कबूल करावी लागली.

साच वेळीं यष्टीचरणानें येऊन म्हटलें—बाबा, एकादां घरांत जायचें होतेंस.

ह्या गोष्टीचा विचार फकीरच्या मनांत अद्यापपर्यंत आला नव्हता. हे शब्द वज्राघाताप्रमाणें त्याच्या मनाला लागले. बराच वेळ तो गप्प बसला. गांवच्या लोकांच्या कुचाळ्या कुचेष्टा पचवून शेवटीं म्हणाला—बाबा, आम्हीं पडलों संन्याशी झनान्यांत आम्हांला पाऊल टाकतां येत नाहीं.

यष्टीचरण गांवच्या लोकांकडे बघून म्हणाला—तर मग आपल्याला येथून उठलें पाहिजे. बायका स्वतःच इकडे येतील म्हणजे झालें. दोघीजणी बिचाऱ्या व्याकुळ होऊन गेल्या आहेत.

सर्वजण उठून गेले. फकीरनें विचार केला, ही संधी बरी आहे पलायन करायला; पण पुन्हां विचार आला कीं, बाहेर पडलों रे पडलों कीं, गांवचे लोक कुत्र्यासारखे मागें लागतील; म्हणून तसाच स्वस्थ बसून राहिला.

माखनलालच्या दोन्ही स्त्रिया येतांच फकीरानें त्यांना प्रणाम केला. म्हणाला "मातुश्रींनो, मी तुम्हांला मुलासारखा." लगेच एकीनें आपला चूडामंडित हात तलवारीसारखा फकीरच्या नाकासमोर उगारून काशाच्या नादाप्रमाणें खणखणीत आवाजानें विचारिलें—" कां रे कपाळकरंट्या, तूं आई कोणाला म्हणालास ? "

धाकांत ठेवी. माध्यान्हसमयींच्या शांत वेळीं त्या गृहस्थाच्या आंगणांतील तिची करुणामय मूर्ति कांतिचंद्राच्या मनांत फारच ठसली; त्या विरलपल्लवतरूंची छाया व ऊन त्या बालेच्या मांडीवर पडलेलें; जवळच एक पुष्ट गाय, खाण्याला कंटाळून मातींत बसलेली, शिंगें व शेंपूट हालवून पाठीवरच्या माशा उडवून लावीत आहे, मधून मधून वंश-कुंजांतर्गत औदीच्यसह्याहून वायू मंदमंद वाहतांना जणूं काय कानगोष्टीच करीत आहेसा भासत होता. ते दिवशीं सकाळीं जी नवयुवती नदी-तीरावर वनामध्यें वनश्रीप्रमाणें दृष्टीस पडली तीच, ह्या माध्यान्हकाळच्या शांत समयीं गोठ्याजवळ आंगण्यांत छायेखालीं गृहलक्ष्मी-प्रमाणें शोभत होती. कांतिचंद्र, हातांत बंदूक घेतलेला अकस्मात् त्या मुलीच्या समोर येऊन थबकला.तो मनांत फारच लज्जित झाला; जणूं काय मुद्देमालासहित चोर पकडला गेला ! पक्षी गोळीनें घायाळ झाला नाहीं हें कसेंतरी करून तिला सांगून आपला संशय दूर करावा अशी त्याला उत्कंठा लागून राहिली होती. कशा रीतीनें सुरुवात करावी म्हणून विचार करीत आहे इतक्यांत, कोणी ‘सुधा’ अशी हांक मारली. बालिका एकाएकीं चमकल्यासारखी झाली; ‘ सुधा ’ म्हणून पुन्हां हांक ऐकूं आली; ती मुलगी पक्षी घेऊन घराकडे निघून गेली. कांतीला वाटलें, नांव तरी किती यथार्थ ! कांतिचंद्र आपल्या माणसाच्या हातांत बंदूक देऊन घराच्या पुढच्या दाराजवळ आला. तेथें बघितलें तों एक प्रौढवय, क्षौर केलेला, शांत-मूर्ति ब्राम्हण बांकावर बसून भक्तिविजयाचा पाठ करीत होता. त्याच्या भक्तिमंडित, शांत, गंभीर मुखाशीं, कांती तुलना करूं लागला.

कांतीनें नमस्कार करून त्याला म्हटलें, “ तहान फार लागली आहे, थोडें पाणी मिळेल का ? ” त्याला मोठ्या आदरानें बसण्यास सांगून घरांतून एक पितळेच्या ताम्हनांत थोडे बत्तासे व काशाच्या तांब्यांत पाणी आणून त्या अभ्यागतापुढें त्यानें ठेविलें.

कांतिचंद्राचें पाणी पिऊन झाल्यावर त्यानें “ आपण कोण ” असें कांतिचंद्रास विचारलें. कांतीनें आपलें नांव गांव सांगून म्हटलें—“ माझ्या हातून आपली कांहीं सेवा घडली तर, मी स्वतःला मोठा कृतार्थ समजेन.”

नवीनचंद्र म्हणाला--" बाबा, तूं आमच्यावर काय उपकार करणार? सुधा म्हणून माझी एक मुलगी आहे, तिचें वय होऊन गेलें आहे. तिला एखादें योग्य स्थळ मिळालें म्हणजे या संसाराच्या ऋणांतून मी मुक्त होईन! आसपास कोठें योग्य वर दिसत नाहीं. दूर जाईन म्हटलें तर सामर्थ्य नाहीं; घरीं गोपाळ-कृष्णाची मूर्ति आहे तीहि सोडून जातां येत नाहीं."

कांतिचंद्र म्हणाला, " आमच्या नौकेवर या, म्हणजे आपण स्थळासंबंधीं बोलूं!" इकडे कांतिचंद्रानें पाठविलेल्या माणसांनीं बंद्योपाध्यायांच्या सुधेबद्दल ज्याला त्याला विचारावें; त्यांनीं म्हणावें " सुधेसारखी सुशील मुलगी मिळणें कठीण."

दुसरे दिवशीं नवीनचंद्र बोटीवर येतांच कांतिचंद्रानें प्रणाम केला व आपणच तिच्याशीं विवाह करण्यास तयार आहोंत असें सुचविलें. ह्या अतर्कित भाग्योदयानें ब्राह्मणाचा कंठ दाटून आला. क्षणभर त्याच्यानें बोलविलेंही नाहीं. त्याच्या मनांत आलें, कांहीं चूक तर होत नाहींना? त्यानें खोदून विचारलें, " आमच्या कन्येशीं तुम्हीं विवाह करणार?"

कांतिचंद्र म्हणाला, " आपली मर्जी असेल तर माझी तयारी आहे."

नवीन०:--" सुधेशीं?" कांतिचंद्रानें " होय" म्हणून उत्तर दिलें.

नवीन०:--" तिला एकदां पाहिली असती तर बरें झालें असतें."

आपण जशी कांहीं तिला पाहिली नाहीं अशी बतावणी करून कांति म्हणाला--

" सावधानाचे वेळीं दृष्टीस पडेलच."

नवीन सद्गदित होऊन म्हणाला-- " आमची सुधा फारच सुशील, घर-कामांत तर तरबेज! तुम्हीं तिला न पाहतां जरी विवाह करण्यास तयार झालांत, तशीच तीहि पण तुमच्या मर्जीप्रमाणें वागून चिरकाल तुम्हांला सुख देईल. क्षणभर देखील तुम्हांला पश्चात्तापाला कारण घडूं देणार नाहीं."

कांतीला विलंब करणें इष्ट वाटलें नाहीं. माघमासींच लग्न करण्याचें ठरलें!

गांवांतील मुजुमदारांच्या जुन्या वाड्यांत लग्नसमारंभ होण्याचें ठरलें. वराची स्वारी हत्तीवर बसून ताशे, वाजंत्री, मशाली लावून वाजतगाजत वेळे-

वर येऊन दाखल झाली. अंतरपट काढल्यावर वरानें वधूकडे पाहिलें. पण, अष्टपुत्री नेसलेली, मळवट भरलेली, नतशीर्षा वधू " सुधाच " म्हणून त्याला ओळखेना! जणूं काय आनंदानें डोळे भरून आले होते म्हणून नीट रीतीनें त्यानें पाहिलेंच नाहीं!

माजघरांत आल्यावर गांवांतील एका वृद्ध स्त्रीनें वरानेंच अवगुंठन दूर केलें पाहिजे असा आग्रह धरल्यावरून, कांतिचंद्रानें मुलीच्या तोंडावरील पदर दूर केला तसें तो एकाएकीं चमकला. " अरे ! ही ती मुलगी नाहीं !" एकाएकीं हृदय उन्मळून आल्यासारखें त्याला वाटलें; मस्तक शून्य झालें! क्षणभर दिवे मालवल्यासारखेंही भासलें. त्या अंधकारानें जणूं काय वधूचें मुख कालिमालिप्त करून टाकिलें.

कांतिचंद्रानें दुसरें लग्न करावयाचें नाहीं म्हणून मनांत निश्चय केला होता. त्याला वाटलें दुर्दैवानें अशी माझी विटंबना करून एका क्षणांत प्रतिज्ञा मोडावयाला लावावें ना ! किती चांगल्या चांगल्या मुली आलेल्या नाकारल्या ! बंधु-बांधवांच्या विनवण्या आपण कशा झिडकारल्या ! श्रीमान् घराण्यांशीं संबंध, हुंड्याचें आमिष, सौन्दर्य हीं सर्व सोडून शेवटीं एका खेडेगांवांत एका अप्रसिद्ध दरिद्री भिक्षुकाच्या घरीं अशी विटंबना करून घ्यावी ना !

प्रथम त्याला सासऱ्याबद्दल फारच राग आला. त्याला वाटलें लबाडानें एक मुलगी दाखवून भलतीच लग्नाला उभी केली! पण लगेच विचार आला कीं, नवीनचंद्रानें तर विवाहापूर्वी मुलगी आपल्याला दाखविलेली नाहीं. आपण स्वतःच पहाण्याचें नाकारिलें होतें ! आपल्या बुद्धिदोषानेंच आपण असे फसलों गेलों, ही लाजिरवाणी गोष्ट कोणापाशीं प्रकट न करणें हाच शहाणपणा असा विचार कांतीच्या मनांत लगेच आला. बायकांची थट्टा, मस्करी वगैरे सोहळे त्याला मुळींच रुचले नाहींत; तो रागानें अगदीं लाल झाला.

इतक्यांत जवळच बसलेली नववधू दचकल्यासारखी झाली, तिनें किंचित् ओरडल्यासारखें केलें. एकाएकीं एक सशाचें पिल्लू तिच्या मांडीजवळून पळत गेलें. त्याच्या मागोमाग त्या दिवशींची ती मुलगी धांवत येऊन तिनें त्याला धरलें,

गालपाशीं त्याचें तोंड नेऊन त्याचे लाड करूं लागली. "वेडी आली रे आली" असें म्हणून सर्वजण तिला खुणेनें जाण्यास सांगूं लागले. तिनें तिकडे मुळींच लक्ष न देतां काय चाललें आहे म्हणून ती लहान मुलाप्रमाणें न्याहाळून पाहूं लागली. घरांतील एक वृद्ध स्त्री तिच्या दंडाला धरून नेऊं लागली. तेव्हां कांती किंचित् विस्मित होऊन म्हणाला, "राहीना बसून." नंतर त्यानें मुलीला विचारलें— "मुली ! तुझें नांव काय ?"

ती उत्तर न देतां डोलूं लागली; घरांतल्या सगळ्या बायका हंसू लागल्या. कांतीनें विचारलें "तुझीं तीं बदकें आतां वाढलीं असतील ?"

मुलगी त्याच्याकडे न्याहाळून पाहूं लागली. तिला मुळींच संकोच वाटत नव्हता. कांतीला फारच आश्चर्य वाटलें व पुन्हां धैर्य धरून विचारलें—"तुझें तें कबुतर बरें झालें का ?" पण व्यर्थ. वर अगदींच फसला आहे या भावनेनें बायका हसूं लागल्या ! शेवटीं कांतीला समजलें कीं, मुलगी बहिरी व मुकी !!



# २. कांट्याचा नायटा



गिरीश बसू एका जमीनदाराचे कारभारी. यांच्या घरीं प्यारी म्हणून एक बाई नुक्तीच घरकामाकरितां ठेविली होती. तिचें वय लहान, चरित्र चांगलें; दूरच्या प्रांतांतून आल्यावर व कांहीं दिवस कामकाज करूं लागल्यावर एके दिवशीं ती वृद्ध कारभाऱ्याच्या अनुरागदृष्टीपासून माझें रक्षण करा म्हणून मालकिणी-जवळ जाऊन रडूं लागली ! गृहिणी म्हणाली—" मुली, तूं दुसरीकडे कुठें तरी जा. तूं चांगल्या घराण्यांतली मुलगी, इथें राहून तुझी सद्गत होणार नाहीं." इतकें म्हणून गुप्तपणें तिला थोडे पैसे देऊन निरोप दिला.

पण पळून जाणें तरी सोपें नव्हतें! हातीं वाटखर्ची अगदीं बेताची, म्हणून प्यारीनें गांवांतच हरीहर भट्टाचार्यांकडे जाऊन त्यांच्या आश्रयाला राहिली. त्यांचीं मुलें हुशार, तीं लगेच म्हणालीं—" बाबा ! कशाला ही विपत्ति घरांत आणतां ? " हरीहर म्हणाले—" विपत्ति स्वतः येऊन आश्रय मागूं लागली तर, तिला कशी परतवितां येईल ? "

गिरीशबाबूंनीं साष्टांग प्रणाम करून म्हटलें "भट्टाचार्य महाशय, आमची बाई कां काढून आणलीत ? घरीं कामाकाजाची फार अडचण आहे." ह्याचें उत्तर हरीहरपंतांनीं चार दोन खऱ्या खऱ्या गोष्टी चांगल्या झोंबतील अशा शब्दांनीं सांगितल्या. ते मोठे मानी असत; कोणाच्या मुरवतीखातर कोणतीही गोष्ट पर्यायानें सांगणें त्यांना माहीत नव्हतें. कारभारीसाहेब मनांतल्या मनांत एखाद्या किड्या-मुंगीशीं त्यांची तुलना करून निघून गेले. जातांना नम्रतेचा मोठा देखावा दाखवून प्रणिपात केला! दोन चार दिवसांतच भट्टाचार्यांच्या घरीं पोलिसांचें आगमन झालें. त्यांच्या पत्नीच्या उशीखालीं कारभाऱ्यांच्या बायकोच्या कानांतल्या कुड्यांचा जोड निघाला! बिचारी प्यारी मोठी दुःखित होऊन तुरुंगांत गेली. भट्टाचार्य महाशय त्यांच्या देशविख्यात प्रतिष्ठेच्या जोरावर चोरीचा माल ठेवून घेण्याच्या आरोपापासून मुक्त झाले. कारभारीसाहेब पुन्हां एकदां येऊन

प्रणाम करून गेले. बिचाऱ्या ब्राह्मणाला वाटलें आपण त्या हतभागिनीला आश्रय दिल्यामुळेंच तिचा घात झाला. त्यांच्या मनाला ही गोष्ट लागून राहिली. मुलें म्हणालीं—"आतां जमीनजुमला विकून कलकत्त्याला जावें हें बरें, येथें राहणें अवघड दिसतें." हरिहर म्हणाले—"वडिलोपार्जित घर सोडून कुठें जावयाचें? नशिबीं असेल तें कुठें गेलें तरी टळावयाचें नाहीं."

इकडे कारभारीसाहेबांनीं वसूल अतिशय वाढविल्यामुळें गांवचे लोक अगदीं उलटले होते. हरिहरपंतांचें सर्व इनाम धर्मादाय, जमीदारांशीं कांहीं एक संबंध नाहीं. कारभारीसाहेबांनीं इनामदाराला भासविलें कीं, हरिहरपंतांनीं प्रजेला आश्रय देऊन विद्रोही करून ठेविलें आहे. इनामदारांनीं सांगितलें कीं, कसेंहि करून हरिहरपंतांना शासन करा. कारभारीसाहेब भट्टाचार्यांना प्रणाम करून म्हणाले, "समोरची जमीन इनामदारांच्या हद्दींतली आहे ती आपल्याला सोडून दिली पाहिजे." हरीहरपंत म्हणाले, "हें कसें काय? ती आज कित्येक वर्षें आमच्याकडे धर्मादाय म्हणून चालत आली आहे." हरीहरपंतांच्या आंगण्यालगतची जमीन जमीदारांच्या हिश्शापैकीं असल्याबद्दल फिर्याद दाखल झाली. हरिहरपंत म्हणाले—"तर मग ही जमीन सोडून दिली पाहिजे, आमच्या या वृद्धापकाळीं कोर्टांत जाऊन साक्ष देणें होणार नाहीं." मुलें म्हणालीं—"घरालगतची जमीन जर सोडून दिली तर, घर तरी कसें राहणार?" प्राणाहून प्रिय, वडिलोपार्जित जामिनीच्या मोहानें म्हातारा पाय कांपत कांपत कोर्टांत साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत जाऊन उभा राहिला. नवगोपाळबाबू मुन्सबांनीं त्यांच्या साक्षीवर विश्वास ठेवून दावा काढून टाकला! भट्टाचार्यांच्या बाजूच्या मंडळींनीं ह्या निमित्तानें गांवांत मोठा उत्सव सुरू केला. हरिहरपंतांनीं लगेच तो थांबविला. कारभारीसाहेब येऊन मोठ्या आदरानें त्यांचा पादस्पर्श करून त्यांची पायधूळ कपाळाला लावली व इकडे अपील दाखल केलें. वकिलांनीं हरीहरपंतांपासून पैसे घेतले नाहींत. त्यांनीं ब्राह्मणाला वारंवार आश्वासन दिलें कीं, हा खटला हरण्याचा संभव नाहीं. दिवसाची कां कधीं रात्र झाली आहे? हें ऐकून हरीहरपंत निश्चिंत मनानें घरीं बसून राहिले.

एके दिवशीं इनामदारांच्या घरीं वाजंत्रीं वाजूं लागलीं; * बोकड कापून कारभारीसाहेबांच्या घरीं कालीपूजा व्हावयाची होती. हा काय प्रकार ?

भट्टाचार्य्यांना बातमी कळली कीं, अपिलांत ते हरले.

भट्टाचार्यांनीं कपाळावर हात मारून वकिलाला विचारलें, " वसंतबाबू ! काय केलेंत ! आतां आमची काय दशा होणार ? "

दिवसाची रात्र कशी झाली तो गुप्त वृत्तांत वसंतबाबू सांगूं लागले—" हल्लीं जे नवीन अॅडशिनल जज्ज होऊन आले आहेत ते मुनसफ असतांना नवगोपाळबाबूंचें व त्यांचें वितुष्ट होतें. त्यावेळीं त्यांना कांहीं करितां येत नव्हतें. आज जज्जांच्या आसनावर बसतांच नवगोपाळबाबूंचें जजमेंट पाहतांच फिरवून टाकितात, म्हणून तर आपण हरलांत !" हरिहरपंतानीं व्याकुळ होऊन विचारिलें, " ह्यावर हायकोर्टांत अपील नाहीं ? " वसंतबाबू म्हणाले—" अपीलांत कांहीं होण्याला मार्गच ठेविला नाहीं. त्यांनीं आपल्या साक्षीवर गैरविश्वास करून विरुद्ध बाजूच्या साक्षिदारांवर विश्वास ठेविला आहे. हायकोर्टांत साक्षींचा विचार होत नाहीं."

म्हाताऱ्यानें डोळ्यांत पाणी आणून विचारलें—" तर मग आम्हांला उपाय ?"

वकील म्हणाले—" उपाय तर कांहींच दिसत नाहीं."

गिरीश बसूंनीं दुसरे दिवशीं चार मंडळी बरोबर घेऊन येऊन भट्टाचार्यांना मोठ्या आदरानें प्रणाम केला. निरोप घेतांना दीर्घश्वास टाकून म्हणाले—" प्रभू, तुझी इच्छा ! "

---

* बंगाल्यांत ब्राह्मणांमध्यें मासे खाण्याची प्रथा असून कालीला नैवेद्याच्या निमित्तानें सणावारीं बोकड मारण्याची चाल आहे. अर्थात् त्या दिवशीं तें सर्वांच्या खाण्यांत येतें. केवळ विधवा स्त्रियांनीं निरामिष भोजन करण्याची रीत आजमितीस आहे.

# ३. यज्ञेश्वरशास्त्र्यांचा यज्ञ

एके समयीं यज्ञेश्वरपंतांची स्थिति खरोखरच चांगली होती. ते सांप्रत आपला प्राचीन मोडकळीस आलेला वाडा सर्प, मूषक, पाकोळ्या यांच्या हातीं समर्पण करून तृणाच्छादित घरांत गीता घेऊन कालक्षेप करीत असत! अकरा वर्षांपूर्वी यज्ञेश्वरपंतांची स्त्री कन्यारत्न प्रसवली; त्यावेळीं कुलसौभाग्यरूपी शशीकृष्णपक्षांतील अंतिम कलावशिष्ट झाला होता! लक्ष्मी प्रसन्न व्हावी म्हणूनच जणूं काय मुलीचें नांव "कमला" असें ठेविलें. यज्ञेश्वरपंतांनीं विचार केला कीं, चंचल लक्ष्मीला फसवून कन्यारूपानें तरी स्वगृहीं स्थिर करावी. लक्ष्मी यज्ञेश्वरपंतांच्या ह्या कपटपाशांत न सांपडतां तिरोधान पावली; पण आपली शोभा कन्येच्या मुखकमलीं ठेऊन गेली. मुलगी खरोखरच लावण्यवती निपजली!

मुलीच्या विवाहाच्या बाबतींत यज्ञेश्वरपंतांची आशा-आकांक्षा दुरारोही नव्हती! शेजारींपाजारीं एखादें नीटसें स्थळ मिळाल्यास यज्ञेश्वरपंतांची लग्न करण्याची तयारी होती. पण कमलेला चांगलें ठिकाण मिळाल्यावांचून न देण्याचा यज्ञेश्वरपंतांच्या काकीनें निश्चय केला होता! तिच्या स्वतःजवळ जें काय धन होतें तें, कमळेला चांगलें स्थळ मिळाल्यास खर्च करण्याचा तिचा संकल्प होता.

हो, ना, करितां करितां काकींच्या आग्रहास्तव वेदघोषपूरित, शांत ग्रामनिवास सोडून यज्ञेश्वरपंतांची स्वारी मुलीला स्थळ शोधण्याकरितां निघाली. पुण्यास यांच्या नात्यांतले एक वकील राहात असत त्यांचे घरीं यज्ञेश्वरपंत जाऊन उतरले.

ह्या वकिलांचें, अण्णासाहेब पटवर्धन म्हणून एक जहागिरदार कूळ होतें. ह्यांचे माधवराव हे एकुलते एक चिरंजीव, वकील साहेबांच्याच पालकत्वाखालीं कॉलेजांत शिकत असत. मुलानें येऊन मुलीला केव्हां पाहिली असेल तें एका परमेश्वराला ठाऊक; पण परमेश्वराची अगाध लीला यज्ञेश्वरपंतांना कोठून समजणार? म्हणूनच यज्ञेश्वरपंतांचे मनांत ह्या स्थळासंबंधीं विचारच आला नाहीं; यज्ञेश्वर-

पंत निरिच्छ! त्यांना महत्त्वाकांक्षा नाहीं व साहसही नाहीं. माधवासारखा मुलगा आपला जांवई होण्याचा संभव आहे हें कधीं यज्ञेश्वरपंतांच्या मनांतही आलें नाहीं.

वकीलसाहेबांच्या यत्नानें एक चालचलाऊ स्थळ त्यांना सांपडलें. मुलगा मोठा विद्वान्, बुद्धिवान् नसला तरी, घरीं पैसाअडका होता. जवळ रोकड नसली तरी ३२७९ रु. वसूल येत असे.

मुलाकडील मंडळी एक दिवस येऊन शिक्रण, करंज्या, मोदक खाऊन मुलगी पसंत करून गेली. यानंतर थोडक्याच दिवसांत माधव आला तेव्हां त्याला ही खबर समजली! यज्ञेश्वरपंतांनीं त्याच्याकरितांही मोठ्या आनंदानें मोदक आणले, पण मुळींच भूक नाहीं म्हणून सांगून माधवानें कांहींच खाल्लें नाहीं; कोणाशीं विशेष न बोलतां परत घरीं निघून गेला.

त्याच दिवशीं संध्याकाळीं वकीलसाहेबांना माधवाकडून एक पत्र आलें. पत्राचा सारांश इतकाच कीं, "यज्ञेश्वरपंतांची मुलगी आपल्याला फार पसंत आहे व आपण तिच्याशीं लग्न करायला उत्सुक आहोंत."

वकीलसाहेबांना मोठें संकट पडलें. ते मनांत म्हणाले कीं, "अण्णासाहेबांच्या मुलाला आपली मुलगी द्यावयाची म्हणून मी कधींपासून योजिलें आहे."

वकीलसाहेब मनांतले मनांत फारच संतापले. पूर्वीं पाहिलेल्या स्थळाबद्दल निश्चय करून, मुहूर्त जितका जवळचा ठरवितां येईल तितका ठरवून यज्ञेश्वरपंतांना आपल्या गांवीं रवाना केलें. ह्या पालकांनीं माधवाला बोलावून, आपला अभ्यास सोडून दुसरीकडे मन घालूं नये म्हणून बजावलें. हें ऐकून माधवाची इच्छा चौपट वाढली.

लग्नासंबंधीं तयारी जारीनें चालली आहे अशा समयीं एके दिवशीं माधवाची स्वारी यज्ञेश्वरपंतांच्या केंबळाच्या घरांत येऊन दाखल झाली! यज्ञेश्वरपंत मोठ्या गडबडीनें ह्मणाले—"ये, बाबा ये." पण कुठें बसायला सांगावें, काय खायला द्यावें, हें त्यांना कांहीं सुचेना. अशा ठिकाणीं, बरफी, दुधिया कोठून मिळणार?

माधव स्नानापूर्वी अंगाला तेल लावण्याकरितां ओट्यावर बसला असतां काकी त्याचा गौरवर्ण व तुळतुळीत शरीर पाहून फारच मोहित झाल्या. यज्ञेश्वरपंतांना हाक मारून त्या म्हणाल्या—"ह्या मुलाशीं आपल्या कमळेचा विवाह नाहीं कां होऊं शकत ?" भित्र्या यज्ञेश्वरपंतांनीं आश्चर्यचकित मुद्रेनें विचारिलें— " हें कसें होणार ? "

काकी म्हणाल्या " कां नाहीं होणार ? प्रयत्न केला तर होईल. "

यज्ञेश्वरपंत गवळ्याच्या घरून खवा आणून लाडू, करंज्या वगैरे करविण्याच्या उद्योगाला लागले.

स्नान-भोजन झाल्यावर माधवानें मोठ्या संकोचानें, लाजत लाजत स्वतःच्या लग्नाच्या बाबतींत प्रस्तावना केली ! यज्ञेश्वरपंत आनंदानें सद्गदित होऊन त्यांनीं काकींना ही आनंदाची बातमी सांगितली.

काकी मोठ्या शांतपणानें म्हणाल्या, " तें ठीक आहे, पण तूं इतका सद्गदित कां झालास ? ही कांहीं आशातीत गोष्ट घडली असें नाहीं. कमळाला मागणी घालायला इकडे काबूलचा अमीर नाहींतर चीनचा बादशाहा जरी घरीं चालून आला तरी मला आश्चर्य वाटणार नाहीं ! "

यज्ञेश्वरपंत माधवाचा हात धरून म्हणाले—" पाहा बाबा ! माझा सर्वस्वीं नाश न होवो म्हणजे झालें ! "

अण्णासाहेब स्वतः निरक्षर असल्यामुळें आपल्या शिक्षित मुलाबद्दल मनांतल्या मनांत त्यांना फार आदर वाटत असे. आपल्या मतांमुळें किंवा आचरणानें आपला अशिक्षितपणा अथवा ग्राम्यपणा आपल्या मुलाच्या नजरेस येऊन त्यानें लज्जित होऊं नये म्हणून ते फार झटत असत. त्यांचा हा एकुलता एक मुलगा, प्राणाहून प्रिय ! मुलानें आपला अपमान करूं नये ही त्यांना अहर्निश चिंता ! तथापि मुलगा एका दारिद्र्याच्या मुलीशीं लग्न करायला तयार झाला आहे असें जेव्हां ऐकिलें तेव्हां त्यांना राग आल्यावांचून राहिलें नाहीं. माधव खालीं मान घालून स्तब्ध उभा राहिलासें पाहून अण्णासाहेब थोडे शांत

झाले व विचार करून म्हणाले—" मी तुला हुंड्याच्या आशेनें लग्नाच्या बाबतींत बोलतों आहें असें मनांतसुद्धां आणूं नकोस. आपल्या मुलाच्या बाबतींत व्याह्याशीं पैशासंबंधीं घासाघीस करीन इतका क्षुद्र मी नाहीं. मला चांगल्या घराण्यांतली मुलगी असली म्हणजे पुरे !"

यज्ञेश्वरपंतांची हल्लीं गरीबी असली तरी, ते फार कुलीन घराण्यांतले आहेत, म्हणून माधवानें अण्णासाहेबांना समजावून सांगितलें.

अण्णासाहेबांनीं नाइलाजानें अनुमोदन दिलें. पण मनांतल्या मनांत यज्ञेश्वर-पंतांबद्दल त्यांना फार राग आला.

दोन्हीं पक्षांमध्यें लग्नासंबंधीं बोलणें सुरू झालें. बाकी सर्व गोष्टी ठरल्या, पण लग्न कोठें करावयाचें याचा निश्चय होईना. अण्णासाहेबांचा एकुलता एक मुलगा, लग्नसमारंभ थाटानें करावा अशी त्यांची इच्छा, पण लिंबासारख्या खेडेगांवीं, त्या केंबळाच्या घरांत तसें होणें अशक्य. आपल्या गांवीं लग्न झालें पाहिजे म्हणून अण्णासाहेबांनीं आग्रह धरिला.

हें ऐकतांच मुलीच्या आजीला वाईट वाटलें; तिनें रडण्यास सुरुवात केली, " आम्हींही एका काळीं संपन्नच होतों. आज लक्ष्मी पराङ्मुख झाली म्हणून, मानापमान सोडून कां द्यायचा ? घराण्याचें नांव तर घालवितां येत नाहीं ? आमचें घर केंबळाचें असो नाहीं तर कसेंही असो, लग्न इथेंच झालें पाहिजे" म्हणून आजीनें हट्ट धरला !

बिचारा यज्ञेश्वरपंत मोठ्या पंचायतींत पडला. शेवटीं माधव मध्यें पडून लग्नसमारंभ कन्यागृहीं होण्याचें ठरलें.

ह्यामुळें अण्णासाहेब व त्यांच्या पक्षाची मंडळी मुलीकडल्यांवर फार रागावली.

दरिद्री यज्ञेश्वरपंतांची फजिती केली पाहिजे म्हणून सगळ्यांनीं ठरविलें. वराकडील मंडळी म्हणजे एका पलटणीची भरती. ह्या बाबतींत अण्णासाहेबांनीं मुलाचा मुळींच सल्ला घेतला नाहीं.

लग्नाचा मुहूर्त वैशाखांत ठरला. यज्ञेश्वरपंतांनीं आपल्यापाशीं होतें नव्हतें त्याची वाट लावून लग्नाची तयारी केली. एक नवा मांडव उभारला. वांईहून

तूप, दूध, साखर वैगरे साहित्य आणविलें. काकींनीं ज्या गुप्त पुंजीच्या जोरावर आपल्या घरीं लग्न करण्याचा आग्रह धरला त्यांतली पैन् पै बाहेर काढली.

यावेळीं दुर्दैवाच्या विचित्र गतीनें विवाहाच्या दोन दिवसपूर्वींपासून प्रचंड वादळ सुरू झालें. वारा क्षणभर थांबला तर, वृष्टी थांबू नये; वृष्टी थोडा वेळ कमी पडली तर, पुन्हां दुप्पट जोरानें सुरू व्हावी; असें वादळ व वृष्टी पांचपंचवीस वर्षांत कोणीं बघितली नव्हती.

अण्णासाहेबांनीं दोन हत्ती आणि पालखी स्टेशनवर तयार ठेवण्याची व्यवस्था पहिल्यापासून करून ठेविली होती. आसपासच्या गांवांतून छपराच्या बैलगाड्या गोळा करण्याच्या खटापटीला यज्ञेश्वरपंत लागले. पावसाच्या भयानें गाडीवान येण्याचें कबूल करीनात. शेवटीं हातींपायीं पडून दुप्पट पैसे कबूल करून यज्ञेश्वरपंतांनीं त्यांना तयार केलें. वरपक्षाकडील ज्या मंडळींना बैलगाडींत बसण्याचा प्रसंग आला ते रागानें लाल झाले.

गांवच्या वाटेवर पाणी सांठून राहिलेलें, त्यांत हत्तींचे पाय रुतूं लागले, गाड्यांचीं चाकें चिखलांत रुतलीं म्हणजे हातांनीं ढकलावीं लागत. पावसाला खळ पडेना, वऱ्हाडी मंडळी भिजून चिंब झाली, चिखलानें माखली, ह्याचा वचपा व्याह्यांवर काढण्याचा त्यांचा निश्चय झाला. हतभागी यज्ञेश्वरपंताला ह्या अकालवृष्टीबद्दल भूर्दंड भरावा लागला.

नवरदेव आपल्या परिवारासह वधूच्या झोंपडीजवळ येऊन पोहोंचले. वऱ्हाडी मंडळींचा हा अकल्पित समूह पाहून शास्त्रीबुवांची छाती दडपली ! बिचाऱ्या यज्ञेश्वरशास्त्र्याला कोणाला कुठें बसवावें हेंच कांहीं सुचेना.

कपाळाला हात लावून “ आपल्याला फार कष्ट दिले, आपल्याला फार क्लेश झाले ” येवढेंच काय तें यज्ञेश्वरपंत बोलले. जो मांडव दिला होता त्याच्या चारी बाजूंनीं पाणी येत होतें. वैशाखाच्या महिन्यांत असा मुसळधार पाऊस पडेल हें यज्ञेश्वरशास्त्र्यांच्या स्वप्नांत देखील आलें नाहीं. त्या खेडेगांवची श्रीमंतगरीब मंडळी शास्त्रीबुवांना मदत करावयाला आली. जागा आधींच संकुचित, त्यांत ह्या मंडळींनीं येऊन आणखी गर्दी करून सोडली. वृष्टीच्या ध्वनीला ह्या

आमीना जोराच्या प्रवाहाबरोबर वहात जाऊन दैवगतीनें एका कोळ्याच्या जाळ्यांत अडकून त्याच्या हातीं लागली. पुढें त्याच्याच येथें ती वाढून मोठी झाली. दरम्यान आराकानचा वृद्ध राजा मरण पावला.

## प्रथम परिच्छेद

एके दिवशीं सकाळीं वृद्ध धीवर येऊन त्यानें रागानें हांक मारिली, "तिन्नी" —कोळ्यानें आराकानी भाषेंत आमीनेचें नवें नांव 'तिन्नी' असें ठेविलें होतें— "आज सकाळच्या प्रहरींच तुला काय झालें आहे ? कामाला हातसुद्धां लावला नाहींस ? नव्या जाळ्याला आटी द्यावयालासुद्धां फावलें नाहीं ? माझी नांव ?"—

आमीना धीवराजवळ येऊन गरिबीनें म्हणाली—"म्हातारबा, आज माझी थोरली बहीण आली आहे म्हणून सुट्टी."

म्हाताऱ्यानें आश्चर्यानें विचारलें—"तुझी कोण ग बहीण ?"

जुलीखा कोठूनशी येऊन म्हणाली—"मी."

म्हातारा स्तब्ध झाला, पण जुलीखेच्या अगदीं जवळ जाऊन त्यानें तिचा चेहरा निरखून पाहिला.

प्रथम त्यानें विचारिलें, "तुला कांहीं कामकाज येतें कां ?" आमीनेनें उत्तर दिलें, "म्हातारबा, दिदीच्या बदली मी कामकाज करीन."

म्हाताऱ्यानें क्षणभर विचार करून म्हटलें "तूं ! पण राहशील कोठें ?"

जुलीखा बोलली, "आमीनेच्याजवळ." म्हाताऱ्याला मोठें संकट वाटलें.

त्यानें विचारिलें, "खाशील काय ?"

जुलीखा म्हणाली "त्याचें साधन मजजवळ आहे." असें म्हणून तिनें बेफिकीरपणानें धीवरासमोर एक मोहोर टाकिली. आमीनेनें ती मोहोर उचलून धीवराच्या हातीं दिली व हळुंहळू सांगितलें, "म्हातारबा, आणखी कांहीं बोलूं नकोस. तूं आपल्या कामाला जा. वेळ होऊन गेली आहे."

जुलीखा कपटवेशानें नाना ठिकाणीं भ्रमण करून शेवटीं आमीनेचा पत्ता लावून धीवराच्या झोंपडींत कशी आली हें सांगूं गेल्यास आणखी एक कथा होईल. तिचा रक्षक रहमतशेख यानें नांव बदलून आराकानच्या राजवाड्यांत नोकरी पत्करिली होती.

## द्वितीय परिच्छेद

एक लहानशी नदी वहात होती. ग्रीष्मारंभींच्या प्रभात-शीतल-वायूनें कैलूंचीं फुलें रक्तवर्ण पुष्पमंजरीपासून गळून पडत होतीं.

झाडाखालीं बसल्याबसल्या जुलीखा आमीनेला म्हणाली, " ईश्वरानें आपणां दोघींना मृत्युमुखांतून वांचविलें आहे, तें केवळ आपल्या बापाच्या हत्येचा सूड घेण्याकरितां. ह्याशिवाय मला तर दुसरें कारणच दिसत नाहीं."

आमीनेचें सर्व लक्ष पलीकडच्या तीरावरील दूरच्या दाट वृक्षांकडे लागलेलें होतें. ती म्हणाली, " दिदी, राहूं दे त्या गोष्टी; माझें तर मन येथेंच रममाण होत आहे. वाटलें तर पुरुषांनीं लढून मरावें, मला तरी या धरणीवर कांहीं दुःख नाहीं."

जुलीखा म्हणाली " छे, छे! तूं शहाजाद्याची मुलगी! कुठें दिल्लीचें सिंहासन, कुठें कोळ्याची झोंपडी!"

आमीना हंसून म्हणाली, " दिदी, दिल्लीच्या सिंहासनापेक्षां आमच्या म्हाताऱ्याची झोंपडी व ह्या कैलूवृक्षाची छाया जर एखाद्या बालिकेला अधिक पसंत पडली, तर मला नाहीं वाटत ती दिल्लीचे तक्ताकरितां अश्रू ढाळील!"

जुलीखा थोडी खिन्न होऊन आमीनेला म्हणाली " ह्यांत तुझा तरी काय दोष! तूं त्यावेळीं फारच लहान होतीस. पण विचार तर करून बघ, वडील सर्वांपेक्षां तुजवर प्रेम अधिक करीत. म्हणून तुलाच आपल्या हातांनीं त्यांनीं गंगार्पण केलें. ह्या जीविताला पितृदत्त मृत्युपेक्षां अधिक प्रिय समजूं नकोस. सूड घेतलास तरच जीविताचें सार्थक केलेंस असें होईल."

आमीना दुसरीकडे पहात गप्प बसली. ती बाहेरील हवा, ती वृक्षच्छाया, तें नवयौवन, ती सुखस्मृति ह्यांमध्येंच ती निमग्न आहे व जुलीखेच्या सांगण्याकडे तिचें फारसें लक्ष नव्हतें हें स्पष्ट दिसत होतें.

कांहीं वेळानें एक दीर्घ श्वास टाकून ती म्हणाली " जरा थांब बाई! माझ्या घरचें काम तसेंच पडलें आहे; मीं नाहीं केलें तर म्हातारा उपाशी राहील."

## तृतीय परिच्छेद

जुलीखेला आमीनेच्या स्थितीबद्दल विचार करितां, फारच दुःख झालें. ती उदासीन होऊन स्तब्ध बसून राहिली होती. इतक्यांत धप्दिशीं कोणी उडी मारल्याचा आवाज ऐकूं आला. व मागून येऊन कोणी तरी जुलीखेचे डोळे मिटून धरिले. जुलीखेनें दचकून विचारिलें "कोण आहे ?"

स्वर ऐकल्याबरोबर त्या युवकानें हात सोडिले व पुढें येऊन उभा राहिला.

तिच्या तोंडाकडे बघत बघत तो धीटपणानें म्हणाला—"तूं तिन्नी नाहींस!" जणूं काय जुलीखा तिन्नी होऊन बसलेली होती व केवळ या युवकाच्या असामान्य बुद्धिचातुर्यानें तें उघडकीस आलें होतें.

जुलीखेनें पदर सांवरला, व रागारागानें उठून उभी राहिली व डोळे लाल करून बोलली—–

"तूं कोण ?"

युवक म्हणाला "तूं मला ओळखीत नाहींस; तिन्नी ओळखते. तिन्नी कुठें आहे ?"

ही गडबड ऐकून तिन्नी आंतून बाहेर आली. जुलीखा रागावलेली व तो युवक, किंकर्तव्यमूढ स्थितींत उभा पाहून तिन्नी मोठ्यानें हांसली व म्हणाली— "दिदी, तूं कांहीं मनांत आणूं नकोस. तो मनुष्य कां आहे ? तें एक जंगलांतलें जनावर आहे. त्यानें जर कांहीं बेअदबी केली असेल तर त्याला मी शिक्षा करीन. दालिया, तूं काय केलेंस ?"

युवक लगेच म्हणाला "मी डोळे मिटून धरले, मला वाटलें तिन्नी आहे; पण ती तर तिन्नी नाहीं." तिन्नी फारच रागावली; म्हणाली "पुनः लहान तोंडीं मोठा घांस! तूं तिन्नीचे डोळे धरले होतेस ना ? हें तुझें धाडस कांहीं कमी नाहीं !"

युवक म्हणाला, "डोळे मिटून धरायला फारसें धैर्य लागत नाहीं, विशेषतः पहिला अभ्यास असला तर. पण स्पष्ट सांगतों, तिन्नी, मी आज अगदीं भिऊन गेलों होतों." इतकें म्हणून जुलीखेकडे बोट दाखवून आमीनेकडे पाहून तो हसूं लागला.

आमीना म्हणाली, "नाहीं, तूं अगदीं जंगली आहेस. शहाजादीच्यासमोर उभा रहायला देखील योग्य नाहींस. तुला तालीम दिली पाहिजे. बघ, असा सलाम कर."

इतकें म्हणून आमीनानें आपली यौवनोल्लसित तनुलता लीलेनें लववून जुलीखेला सलाम केला. तो युवक मोठ्या प्रयासानें तिचें अनुकरण करून पाहूं लागला. पण तें मुळींच साधलें नाहीं.

यानंतर आमीना म्हणाली, "याप्रमाणें तीन पावलें मागें हटून उभा रहा." युवक मागें सरकून उभा राहिला.

"आतां पुन्हां सलाम कर." त्यानें पुन्हां सलाम केला.

अशा रीतीनें मागें हटवून सलाम करायला लावून आमीना त्या तरुणाला झोंपडीच्या दारापाशीं घेऊन गेली व म्हणाली "आंत हो." तो तरुण आंत गेला.

आमीनेनें बाहेरून दार लावून घेतलें व म्हणाली—"घरांतलें काम करीत बैस. विस्तव पेटवून ठेव." इतकें झाल्यावर ती दिदीपाशीं येऊन बसली व म्हणाली "दिदी, रागावूं नकोस बाई; येथील माणसें अशाच तऱ्हेचीं. मी तर कंटाळून गेलें आहें." पण त्याचा खरेपणा तिच्या तोंडावर किंवा वागण्यांत कुठेंच दिसत नव्हता. येवढेंच नव्हे तर अनेक बाबतींत येथील माणसांबद्दल तिचा अनुचित पक्षपात दिसून येत होता.

जुलीखा थोडेंबहुत रागावूनच म्हणाली "खरोखर आमीना! तुझा व्यवहार पाहून मला तर आश्चर्यच वाटतें. एक परकी तरुण पुरुष येऊन तुझ्या शरीराला स्पर्श करण्याचें त्याचें धाडस होतें!"

आमीना आपल्या बहिणीला पसंत पडेल असें बोलली—"हें पहा, दिदी, एकादा बादशहा किंवा नबाबाचा मुलगा येऊन असा व्यवहार करता तर, त्याचा अपमान करून त्याला हांकून लाविलें असतें!"

जुलीखेला हंसूं आवरेना. ती म्हणाली "खरें सांग बघूं! आमीना, तूं जें म्हणतेस 'माझें मन इथें चांगलें रमतें' तें का ह्या जंगली युवकाकरितां?"

आमीना म्हणाली " खरेंच सांगतें दिदी ! तो माझ्या फार उपयोगी पडतो. फुलें फळें तोडून आणितो, शिकार करून आणितो, कांहीं काम सांगितलें कीं, कसा धांवत येतो. पुष्कळदां मनांत येतें कीं त्याला शिक्षा करीन, पण व्यर्थ. खूप डोळे वटारून बोललें कीं, 'दालिया, मी तुझ्यावर फार रागावलें आहें,' म्हणजे मोठ्या कौतुकानें तोंडाकडे बघून हांसतो. मला वाटतें त्याच्या मुलुखांत थट्टा मस्करी करितात. दोन ठोसे मारले तर अधिकच खूष होतो, तेंही करून पाहिलें आहे. हेंच पहाना, त्या खोलींत कोंडून ठेवला आहे तरी कसा आनंदांत आहे. दार उघडून बघ म्हणजे दिसेल ! डोळे, तोंड लाल करून घेऊन आनंदानें कसा चूल फुंकीत बसला आहे. तूंच सांग बरें, ह्याला आतां काय करूं तें. मी तर हात टेकले. "

जुलीखा म्हणाली " मी पहातें बरें ! "

आमीना हांसून विनवणी करून म्हणाली " तुझ्या पायां पडतें बघ, तूं आतां त्याला कांहीं बोलूं नकोस. " ती अशा रीतीनें बोलली कीं जणूं काय हा युवक म्हणजे तिचें पाळलेलें एक हरिणच ! त्याचा अजून वन्य स्वभाव गेलेला नाहीं. दुसरें कोणी माणूस पाहून भिऊन पळून तर नाहीं जाणार ? अशी शंका तिला वाटत होती.

इतक्यांत धीवर आला. तो विचारूं लागला—" आज दालिया नाहीं आला, तिन्नी ? "

आमीना—" आला आहे."

धीवर—" कुठें गेला आहे ? "

आमीना—" तो मोठा उपद्रव करीत होता म्हणून त्याला त्या खोलींत कोंडून ठेविला आहे."

म्हातारा थोडा सचिंत होऊन म्हणाला " तो थोडा त्रास देईल तरी सोस; लहान वयांत सगळींच अशीं असतात. फारशी कडक शिक्षा करूं नकोस हो ! दालियानें काल माझ्यापासून तीन मासे घेऊन मला काल एक 'खलू' (एक सोन्याची मोहोर ) दिला आहेन."

आमीना म्हणाली " तूं कांहीं मनांत आणूं नकोस, मी आज त्याच्यापासून दोन खलू आणवून देईन. तुला एकही मासा द्यायला नको."

आपल्या पाळलेल्या मुलीची इतक्या लहान वयांत इतकी बुद्धि व हुशारी पाहून म्हाताऱ्याला फार कौतुक वाटलें; मोठ्या प्रेमानें तिच्या डोक्यावरून हात फिरवून तो निघून गेला.

## चतुर्थ परिच्छेद

आश्चर्य हें कीं, दालियाच्या येण्याजाण्याबद्दल जुलीखेला राग येत नाहींसा झाला. पण विचार करून पाहतां यांत आश्चर्य तरी कसलें ! कारण ज्याप्रमाणें नदीचा प्रवाह तटानें मर्यादित, त्याप्रमाणें स्त्रीचा हृदयावेग लोकलज्जेनें बद्ध ! वास्तविक पाहतां सभ्यसमाजाच्या बाहेरच्या आराकानप्रांतांत लोक तरी सभ्य कोठून असणार ?

याठिकाणीं केवळ ऋतुक्रमानें तरु प्रफुल्लित होत; निकटवर्ती नीलनदी वर्षाऋतूंत गुरु, शरदृतूंत स्वच्छ, ग्रीष्मऋतूंत क्षीण. पक्षांच्या उछ्वसित कंठध्वनींत समालोचनेचा लेशमात्रही नाहीं. तसेंच दक्षिणानिल मधूनमधून परतीरावरील ग्रामवासी जनांचा मधुरध्वनी वाहून आणी, पण कोणाची वृथा निंदा—स्तुति करीत नसे.

पडक्या घरावर जसें तृण उगवूं लागतें, त्याप्रमाणें या ठिकाणीं कांहीं दिवस राहिल्यामुळें निसर्गाच्या गुप्त आक्रमणामुळें लौकिकाची मानवनिर्मित भिंत अलक्षितभावें पडून जाऊन चोहोंकडून प्राकृतिक जगताशीं समस्त एकाकार होऊन जातें. स्त्रीपुरुषांचा योग्य जोडा स्त्रियांच्या नेत्रांना जसा आनंद देतो तसें दुसरें कोणतेंही दृश्य देऊं शकत नाहीं. इतकें रहस्य, इतकें सुख, इतक्या कौतुकाचा विषय स्त्रीजातीला दुसरा कोणताही नाहीं. म्हणूनच ह्या निर्जन वनांत कोळ्याच्या झोंपडींत दारिद्र्याच्या छायेखालीं जेव्हां जुलीखेचा कुलाभिमान, लोकमर्यादेची कल्पना आपोआप शिथिल झाली, तेव्हां पुष्पित केळूच्या छायेखालीं आमिना व दालियाची मनोहर संम्मेलनलीला पाहून तिला मोठा आनंद होऊं लागला.

बहुधा तिच्या तरुण हृदयामध्यें अनिर्वाच्य अपरितृप्त आकांक्षा जागृत झाली असावी व सुखदुःखाच्या लहरीनें तिचें हृदय चंचल होत असावें. शेवटीं तर असें होऊं लागलें कीं, एखादे दिवशीं युवकाला येण्यास विलंब झाला म्हणजे आमीना उत्कंठित होत असे व जुलीखाही उतावीळ होई. आमीना व दालिया एकमेकांजवळ आलीं म्हणजे चित्रकार ज्याप्रमाणें आपल्या सद्यःसमाप्त चित्राकडे दुरून पाहून आनंदित होतो तद्वत् जुलीखेनें त्यांच्याकडे स्नेहपूर्ण हास्यमुखानें पहावें. कधीं कधीं त्यांच्याशीं भांडावें, त्यांच्यावर खोटेंच रागवावें, त्यांना भेटतां येऊं नये म्हणून आमीनेला कोंडून ठेवावें.

सम्राट् व आरण्यक यांमध्यें एक प्रकारचें सादृश्य असतें. दोघेही स्वतंत्र वृत्तीचे, दोघेही आपापल्या राज्यांत एकाधिपति ! दोघेही नियम-बंधन-रहित ! दोघांमध्येंही नैसर्गिक सरळता व महत्त्व. जे कोणी मध्यम कोटींतील, जे कोणी आपला जीवनक्रम व्यवहारशास्त्रांतील अक्षरांबरहुकूम आंखतात त्यांची गोष्टच निराळी. ते थोरांचे दासानुदास तर लहानांचे राजे व बिकट प्रसंगीं नितांत किंकर्तव्यमूढ ! वन्य दालिया, प्रकृति-सम्राज्ञीचा लाडका मुलगा असल्यामुळें, त्याला शहाजाद्यांपाशीं कांहींच संकोच वाटत नसे व शहाजाद्याही त्याला समान दर्जाचा समजत. तो हंसतमुख, सरळ, कौतुकप्रिय, सर्वदा निर्भय, व संकोचहीन ! त्याच्या वागणुकींत दारिद्र्याचें एकही लक्षण नव्हतें.

तथापि या क्रीडाकौतुकांमध्येंही जुलीखेचें मन कधीं कधीं खिन्न खिन्न होत असे. ती मनांत म्हणे, शहाजादीचें आयुष्य असेंच का जायचें !

एके दिवशीं सकाळीं दालिया येतांच जुलीखेनें त्याचा हात धरून विचारलें—
"दालिया ! तूं इथला राजा दाखविशील ?"

दालिया—"हो दाखवीन, पण कशाला ?"

जुलीखा—"माझ्यापाशीं एक सुरी आहे ती त्याच्या छातींत भोंसकायची आहे."

प्रथम दालियाला थोडें आश्चर्यच वाटलें. नंतर हिंसेच्या कल्पनेनें उत्तेजित झालेल्या जुलीखेच्या चेहऱ्याकडे बघून त्याला हंसूं आलें; जणूं काय इतकी

गमतीची गोष्ट त्यानें पूर्वी कधीं ऐकिली नव्हती. परिहास म्हणावें तरी खरोखर राजपुत्रीला शोभण्याजोगाच होता. न चालतां न बोलतां गुपचिप एक सुरी जिवंत राजाच्या छातींत भोंसकली असतां ह्या अकल्पित व्यवहारामुळें राजा कसा आश्चर्यचकित होऊन जाईल हें चित्र त्याच्या डोळ्यासमोर उभें राहून त्यांला अनिर्वाच्य कौतुक वाटलें. त्याचें मुख उच्चहास्यानें परिणत होऊन तें प्रकाशित झालें.

## पंचम परिच्छेद

त्याच्या दुसरेच दिवशीं रहमतशेखनें जुलीखेला एक गुप्त पत्र लिहून कळविलें कीं "आराकानच्या नव्या राजाला दोन्ही शहाजाद्या कोळ्याच्या घरीं आहेत अशी खबर लागली आहे. तो त्यांच्यावर आसक्त झाला आहे व त्यांच्याशीं विवाह करण्याकरितां लवकरच त्यांना वाड्यांत आणण्याची तयारी चालली आहे. सूड घेण्यास ह्याहून चांगला अवसर मिळणें कठीण आहे."

जुलीखेनें आमीनेचा हात घट्ट धरून म्हटलें—"ईश्वराची इच्छा स्पष्ट दिसून येत आहे. आमीना, तुझ्या जीविताचें सार्थक होण्याची वेळ आली आहे. आतां या नाचण्याबागडण्यांत मग्न होऊन रहाणें योग्य नाहीं."

दालिया तेथें हजरच होता. आमीनेनें त्याच्याकडे पाहिलें तों तो कौतुकानें हांसत होता.

आमीना त्याला हंसतांना पाहून विव्हल होऊन म्हणाली—"समजलास दालिया! मी राजपत्नी व्हायला जातें आहें."

दालिया हंसत म्हणाला—"फार वेळ नाहींना लागणार?"

आमीना खिन्न व विस्मित होऊन मनांतले मनांत म्हणाली—"खरोखरच हा वन्यमृग! ह्याच्याशीं माणसासारखा व्यवहार करणें म्हणजे आमचाच मूर्खपणा."

त्याला आणखी जागें करण्याकरितां म्हणाली—"राजाला मारून मी परत येईनसें वाटतें?"

दालिया आमीनेची गोष्ट समजलीसें दाखवून म्हणाला—"परत येणें कठीण तर खरेंच!" आमीनेचें अंतःकरण एकाएकीं उद्विग्न झालें.

जुलीखेकडे बघून दीर्घ सुस्कारा टाकून आमीना म्हणाली—" दिदी, मी तयार आहें." दालियाकडे पुन्हां वळून विद्ध अंतःकरणानें चेष्टेचा बहाणा करून म्हणाली—"मी राणी होतांच, राजाच्या विरुद्ध कटांत सामील झाल्याबद्दल तुला प्रथम शिक्षा देईन, त्याच्यापुढें मग जें करायचें असेल तें कर."

हें ऐकून दालियाला विशेषच कौतुक वाटलें. जणूं काय हें घडून आल्यास विशेषच गम्मत होईल.

## षष्ठ परिच्छेद

घोडेस्वार, पदाति, निशाण, हत्ती, वाजंत्री, मशालजी यांची कोळ्याच्या घरीं एकच गर्दी झाली. जणूं काय त्याचें घर आतां ठिकाणीं राहत नाहीं. राजवाड्यांतून दोन सुवर्णमंडित शिबिकाही आल्या.

आमीनेनें जुलीखेचे हातून कट्यार घेतली; क्षणभर तीवरील हस्तिदंती नक्षीकडे पाहिलें; नंतर पदर सारून आपल्या वक्षस्थळावर धारेची परीक्षा करून पाहिली. जीवनकमलाच्या वृंतभागीं एकवेळ कट्यारीनें स्पर्श करून बघितला, पुन्हां म्यानांत घातली व आपल्या परिधृत वस्त्रांत लपवून ठेविली.

ह्या मरणयात्रेपूर्वीं दालियाची एकवेळ गांठ घ्यावी म्हणून आमीनेची अति उत्कट इच्छा होती, पण कालपासूनच तो नाहींसा झाला होता; तर मग दालिया जो हांसत होता, त्यांत अभिमानाची ज्वाला प्रच्छन्न होती कीं काय नकळे.

पालखींत बसणापूर्वीं बाल्यावस्थेंतील आश्रयभूत त्या झोंपडीकडे एकवार अश्रुपूर्ण नयनांनीं तिनें बघितलें, तसेंच तें झाड, ती नदी ह्यांच्याकडेही बघितलें; धीवराचा हात धरून बाष्परुद्ध अशा कंपित स्वरानें ती म्हणाली—" म्हातारबा, मी आतां जातें. तिन्ही गेल्यावर तुझें घर कोण संभाळील ? "

म्हातारा एखाद्या पोराप्रमाणें रडूं लागला !

आमीना म्हणाली—"म्हातारदादा, दालिया पुन्हां इथें आला तर त्याला ही आंगठी दे. त्याला म्हणावें तिन्हीनें जातांना दिली आहे."

इतकें बोलून आमीना झटकन् पालखींत बसली. मोठ्या समारंभानें दोन्ही पालख्या राजवाड्याकडे निघून गेल्या. आमीनेची झोंपडी, नदीतीर, कैलूवृक्ष हीं अंधकार व शांततेमुळें शून्य व भयानक दिसूं लागलीं.

यथासमय दोन्ही पालख्या फाटक ओलांडून अंतःपुराच्या दारापाशीं आल्या. दोघी बहिणी पालखींतून खालीं उतरल्या.

आमीनेच्या तोंडावर हंसें नव्हतें किंवा डोळ्यांत अश्रूही नव्हते. जुलीखेचा चेहरा फिका पडला होता. कार्य जोंपर्यंत दूर होतें तोंपर्यंत तिचा उत्साह तीव्र होता. पण यावेळीं तिची छाती धडधड करूं लागली. स्नेहानें व्याकुल होऊन आमीनेला तिनें पोटाशीं धरिलें. ती मनांत म्हणाली, यौवनवृंत्तापासून तोडून या विकचोन्मुख कुसुमाला कोणत्या रक्तप्रवाहामध्यें मी सोडून देत आहें ?

पण आतां विचार करण्याची वेळ नव्हती. परिचारक-दर्शित मार्गांनें शत-सहस्र प्रदीपांच्या अनिमीलित नेत्रपंक्तीमधून स्वप्नाहतभावानें दोघी बहिणी पुढें चालूं लागल्या. शेवटीं महालाच्या द्वाराजवळ आल्यावर आमीना क्षणभर थांबून जुलीखेला म्हणाली " दिदी ! " जुलीखेनें गाढ आलिंगन देऊन चुंबन घेतलें.

दोघींनीं हळुंहळूं रंगमहालांत प्रवेश केला. राजवेष धारण करून महालांत एका बहुमूल्य पलंगावर राजा बसला होता. आमीना मोठ्या संकोचानें दाराच्या जवळच उभी राहिली. जुलीखा पुढें होऊन राजाच्याजवळ जाऊन त्याजकडे पाहिलें. राजा कौतुकानें हंसत होता.

जुलीखा म्हणाली–" दालिया ! " आमीना मूर्च्छित होऊन पडली.

दालिया उठून घायाळ झालेल्या पक्षाप्रमाणें पडलेल्या आमीनेला उचलून पलंगावर घेऊन गेला. आमीना सावध झाली, तिनें छातीशीं धरलेली कट्यार बाहेर काढिली व दिदीच्या मुखाकडे बघितलें. दिदीनें दालियाच्या मुखाकडे बघितलें व दालिया कांहीं न बोलतां दोघींच्या तोंडांकडे बघत राहिला. कट्यारही म्यानांतून तोंड बाहेर काढून हा रंग पाहून टकमकां बघत हंसूं लागली.

# विचारक

## प्रथम परिच्छेद

अनेक स्थित्यंतरांनंतर जीर्ण गतयौवन क्षीरोदेला, शेवटीं ज्या पुरुषाचा आश्रय मिळाला, त्यानेंही जीर्णवस्त्रन्यायानें तिचा परित्याग केल्यानंतर मूठभर अन्नाकरितां दुसऱ्याचा आश्रय शोधण्याची पाळी आली, तेव्हां तिनें आपल्या जीविताचा अत्यंत धिःकार केला !

यौवनानंतर स्वच्छ शरदृतुप्रमाणें जी एक गंभीर, प्रशांत, प्रगाध, सुंदर अवस्था मनुष्यमात्राला प्राप्त होते, तीच जीवितवृक्षाचें फल, तोच पिकें तयार होण्याचा समय. त्यावेळीं दुर्दांत यौवनाची वसंतचंचलता शोभा देत नाहीं. तत्समयीं संसारसुखरूपी गृहरचना एक प्रकारें संपूर्ण झालेली असते. प्रपंचांतील सुखदुःख, बरेंवाईटाचा अनुभव मनाला परिपक्वता आणीत असतो. आपल्या शक्तीच्या बाहेर असणाऱ्या प्रपंचक दुराशेच्या कल्पना लोकांमधून आपण आपल्या समस्त उद्भ्रांत वासनांना संहृत करून जेव्हां आपल्या अल्पक्षमता, गृह-प्राकारांमध्यें प्रस्थापित करितों तो समय हाच ! तत्समयीं नूतन प्रणयाचे मुग्ध नेत्रकटाक्ष आकर्षित केले जात नाहींत, परंतु पूर्वस्नेह अधिक प्रिय होऊं लागतो. या कालीं यौवनलावण्य हळुंहळूं शीर्ण होऊं लागतें; तथापि जराहीन स्थायीं प्रकृती जणूं काय चिरकालीन साहचर्यामुळें मुखकमलीं, नेत्रस्थलीं अधिक स्पष्टपणें उमटलेली दिसूं लागते. हास्य, कटाक्ष, कंठध्वनि, अभ्यंतर-स्थितपरिपक्व अंतःकरणानें प्रतिबिंबित झालेले असतात. ह्याच अवस्थेमध्यें जें अप्राप्य त्याची आशा सोडून, जे त्याग करून गेले त्यांच्याबद्दलचा शोक समाप्त करून, ज्यांनीं वंचना केली त्यांना क्षमा करून, जें आपल्या संन्निध त्याच्यावर प्रेम करूं लागून, संसारांतील समस्त आपद्-विपद् शोकताप-विच्छेदांमध्यें जे कोणी आपल्या निकट अवशिष्ट राहिले असतील त्यांस अधिक जवळ करून, जे कांहीं सुनिश्चित, सुपरिक्षित, चिरपरिचित अशांच्या प्रीतिपरिवेष्टनामध्यें निरामय स्थान कल्पून आपण आपल्या आकांक्षांच्या परितृप्तीचा लाभ

करितों व आपल्या सर्व चेष्टाही तन्निमित्त होऊं लागतात. युवावस्थेच्या ह्या स्निग्धसंध्यासमयीं, जीविताच्या ह्या शांतिपर्वांतही, ज्यांना नूतन संचय, नूतन परिचय, नूतन स्नेहाच्या वृथा आशेनें नूतन चेष्टा कराव्या लागत असतील, अजूनही ज्यांना विश्रांतीकरितां स्थान नाहीं, ज्यांच्या गृहप्रत्यावर्तनानिमित्त संध्यादीप प्रज्वलित होत नाहीं, त्यांच्याइतके अनुकंपनीय आणखी कोणी नाहींत.

क्षीरोदा आपल्या यौवनाच्या प्रांत-सीमेवर असतांना एके दिवशीं प्रातःकाळीं उठून पहाते तों तिचा प्रणयी पूर्वरात्रीं तिचें समस्त द्रव्य, अलंकार अपहरण करून पलायन करून गेलेला! घरभाडें द्यायला नाहीं, तिच्या तीन वर्षांच्या मुलाला दूध आणीन म्हटलें तर पैसा नाहीं. तिनें विचार करून पाहिलें, तिच्या वयाच्या अडतीस वर्षांत तिला एकही माणूस आपलासा करतां आला नाहीं. एखाद्या खोलीच्या कोपऱ्यांत बसून राहीन कां मरेन म्हटलें तर ती सुद्धां नाहीं. तेव्हां क्षीरोदेच्या मनांत विचार आला कीं, आज अश्रू पुसून डोळ्यांत काजळ घातलें पाहिजे, ओंठाला, कपाळाला आलक्तांनीं चित्रित केलें पाहिजे, हास्यमुखानें धैर्य धरून नवीन हृदय हरण करण्याकरितां नवा मायापाश रचला पाहिजे. तेव्हां ती खोलीचें दार बंद करून जमिनीवर लोळून वारंवार डोकें फोडून घेऊं लागली. सारा दिवस उपाशी मुमुर्षूप्रमाणें पडून राहिली. संध्याकाळ झाली, त्या दीपहीन घरांत अंधःकार अधिकाधिक वाढूं लागला. दैवगतीनें एकजण पुरातन प्रणयी येऊन "क्षीरा, क्षीरा" म्हणून हांका मारून दारावर धक्के देऊं लागला. क्षीरोदा दार उघडून हातांत केरसुणी घेऊन वाघिणीसारखी धाऊन जातांच त्या रस-पिपासू युवकानें अनतिविलंबें पलायनाचा मार्ग स्वीकारला.

मूल भुकेनें व्याकुळ होऊन रडत रडत खाटेखालीं जाऊन निजलें होतें; तें ह्या गोंधळानें जागें होऊन कातर स्वरानें "आई, आई" म्हणून रडूं लागलें!

क्षीरोदेनें मुलाला उचलून घेऊन छातीशीं कवटाळून धरून विद्युद्वेगानें धांवत जाऊन शेजारच्या विहिरींत उडी टाकली!!

आवाज ऐकून शेजारी-पाजारी दिवा घेऊन विहिरीजवळ आले. क्षीरोदा व तिचें मूल काढायला विलंब लागला नाहीं; क्षीरोदा बेशुद्ध व मूल मेलेलें सांपडलें.

तिच्या मनांत आलें कीं, पृथ्वीवर घरोघरीं समस्त कुलशीलवान् कन्या यासमयीं गाढ झोपेंत निमग्न असतील; आपल्या घरीं आपल्या शय्येवर निस्तब्ध रात्रीं निश्चिंत निद्रा किती सुखाची असते हें ह्यापूर्वी कसें समजलें नाहीं? गृहवधू उद्यां प्रातःकाळीं आपापल्या घरीं झोपेंतून उठून निःसंकुचितमनानें नित्यकर्माला प्रवृत्त होतील व या गृहच्युता हेमशशीची निद्राहीन रात्र संपून कोणत्या स्थळीं प्रभात होईल ? व त्या दुःखमय प्रभातकालीं आपल्या लहानशा घरावर सकाळचे शांतिमय हास्यपूर्ण रविकिरण पडतील तेव्हां केवढी घोर लज्जा, केवढी लांछना, केवढा हाहाःकार होईल !

हेमला वाटे आक्रोशानें आपलें हृदय विदीर्ण होऊन मरण येईल तर बरें; ती करुणामय विनम्र स्वरानें म्हणाली " अजून रात्र आहे ! माझी आई, माझे माऊ अजून जागे झाले नसतील, मला परत नेऊन सोडा." पण तिच्या देवतेनें तिकडे लक्ष दिलें नाहीं. एका दुसऱ्या श्रेणीच्या नेमिमुखरित रथामध्यें बसवून तिच्या बहुकाल आकांक्षित स्वर्गलोकाकडे मोहितबाबू प्रयाण करते झाले !

नंतर थोड्याच वेळानें देवता तिच्यासह आणखी एकदां द्वितीय श्रेणीच्या जीर्ण रथावर आरूढ होऊन एका नव्या रस्त्यानें गमन करिती झाली. रमणी पंकामध्यें आकंठ निमाज्जित होऊन राहिली.

## तृतीय परिच्छेद

मोहितमोहनबाबूंच्या पूर्व चरित्रांतील एकाच घटनेचा उल्लेख केला म्हणजे पुरे आहे. पुढील रचना एकसारखीच असल्यामुळें वर्णन करणें अनावश्यक !

ह्या ठिकाणीं पुरातन कथेचा निर्देश करण्याचें कारण नाहीं. सांप्रत त्या विनोदचंद्र नांवाचें स्मरण असलेला कोणी प्राणी जगांत आहे कीं नाहीं याचाही संशय आहे. हल्लीं मोहितमोहन आचारसंपन्न ब्राह्मण, ब्रह्मयज्ञादि आन्हिक, शास्त्रावलोकन, लहान मुलांच्याकडून योगाभ्यास व घरांतील स्त्रियांना सूर्यचंद्र, मरुद्गण यांना दुष्प्रवेश्य अशा अंतःपुरामध्यें मोठ्या दक्षतेनें ठेवून प्रपंच करीत होते. तथापि एकाकाळीं त्यांनीं एकाधिक रमणींचा अपराध केला असल्यामुळें

आज एखाद्या स्त्रीनें सामाजिक अपराध केल्यास अत्यंत घोर शिक्षा देण्याकडे त्यांची प्रवृत्ती असे.

क्षीरोदेला फांशीची शिक्षा सांगितल्यावर दोन एक दिवसांनीं भोग्यविलासी मोहित तुरुंगाच्या बगीचांतून मनाजोगी भाजी आणावी म्हणून जेलखान्याच्या आवारांत गेले. क्षीरोदेला आपल्या पापमय जीवितांतील समस्त अपराधांची आठवण होऊन ती अनुतप्त झाली कीं नाहीं हें जाणण्याची त्यांना इच्छा होऊन बंदिनीशाळेंत त्यांनीं प्रवेश केला.

दुरून भांडणाचा आवाज त्यांना ऐकूं आला. खोलींत डोकावून पहातात तों रक्षकिणीबरोबर क्षीरोदेचें भांडण जुंपलेलें ! 'काय हा स्त्रीजातीचा स्वभाव!' म्हणून मोहित मनांतल्या मनांत हंसले. 'मृत्यु इतका संनिध आला असतां देखील भांडण करण्याचें सोडीत नाहींत ! मला वाटतें ह्या यमलोकीं गेल्या तरी यमदूतांशीं भांडायला सोडणार नाहींत. '

मोहितबाबूंच्या मनांत आलें कीं यथोचित भर्त्सना व उपदेशद्वारा हिच्या हृदयांत अनुताप उत्पन्न केल्यास अनुचित होणार नाहीं. ह्या साधु उद्देशानें ते क्षीरोदेच्या नजीक जातांच ती हात जोडून करुणस्वरानें म्हणाली—

" जज्जसाहेब, ईश्वर तुमचें कल्याण करो ! तिला तेवढी आंगठी परत द्यायला सांगा हो !" विचारपूस करितां समजलें कीं क्षीरोदेनें आपल्या केसांत एक आंगठी लपवून ठेविली होती व अकस्मित त्या रक्षाकिणीच्या नजरे पडतांच तिनें ती काढून घेतली.

मोहित यावेळीं मनांतल्या मनांत हसूं लागले ! उद्यां फांसावरच चढणार तरी आंगठीची माया सुटत नाहीं ! दागिना हेंच बायकांचें सर्वस्व ! नंतर ते रक्षयित्रीला म्हणाले—" बघूं ती अंगठी." तिनें आंगठी दिली.

जणूं काय जळता निखारा हातांत घेतला आहे याप्रमाणें ते दचकले. आंगठीच्या एका बाजूला हस्तिदंतावर तेलाच्या रंगांत काढलेली मिशास्मश्रूंनीं भूषित अशा युवकाची एक सूक्ष्म तसबीर बसविलेली होती व दुसऱ्या बाजूला सोन्यावर खोदलेलें " विनोदचंद्र."

अंगठीवरून दृष्टि काढून एकवेळ क्षीरोदेचे मुखाकडे मोहितबाबूंनीं न्याहा-ळून पाहिलें. चोवीस वर्षांपूर्वीच्या अश्रुपूर्ण नयन, कोमल, सलज्ज, शंकित मुखाशीं ह्याचें पूर्ण सादृश्य !

मोहितबाबूंनीं पुन्हां एकवेळ सोन्याचे आंगठीकडे पाहिलें व तीवरून हळुंहळूं जशी दृष्टी काढून घेतली तेव्हां समोर असलेली कलंकिनी, पतिता रमणी एका क्षुद्र स्वर्णांगुलीच्या प्रकाशामुळें स्वर्णमयी देवीच्या प्रतिमेप्रमाणें उद्भासित अशी दृष्टीस पडली.

  

*** ही कथा म्हणजे रविबाबूंच्या कवित्वाचा एक उत्तम नमुना असें समजण्यास हरकत नाहीं. मराठी वाङ्मयांत अशा तऱ्हेचें गद्य फारसें नाहीं. गोष्ट लहान मुलांमुलींनीं करमणुकीकरितां वाचण्याजोगी नसून प्रौढ, अनुभवी, विचारसंपन्न वाचकांनाच कथानक व भाषा रुचण्यासारखी आहे. टीका व टिपण्या देऊं म्हटल्यास विस्तार फार होईल म्हणून सहृदय वाचकांच्या अभिरुचीवरच अवलंबून राहिलें पाहिजे. गोष्ट तरुण स्त्रियांनीं वाचून मनन करण्याजोगी आहेच.



# जिवंत कीं मेली ?

शारदाशंकरबाबू हे राणीहाटचे जमीनदार होते. ह्यांच्या घरांतील विधवा सुनेच्या माहेरचें असें कोणीच नव्हतें. एकामागून एक सर्व काळाच्या मुखीं पडलीं. सासरींही ज्याला आपलें म्हणतां येईल असें एकही माणूस नव्हतें; नवरा नाहीं, मूल नाहीं. थोरल्या दिराचा धाकटा मुलगा तिच्या गळ्यांतील ताईत असे. त्याच्या जन्मानंतर आई पुष्कळ दिवस दुखणाईत होती, म्हणून मुलाच्या कादंबिनीकाकीनें म्हणजे या विधवेनें त्याचें पालनपोषण केलें होतें. जेव्हां एखादी स्त्री दुसऱ्याचें मूल वाढविते-वर्तविते तेव्हां त्याच्यावर तिचें प्रेम फारच दृढ असतें. कां तर त्याच्यावर सत्ता नाहीं, कोणत्याही सामाजिक बंधनानें तें ग्रथित नाहीं, प्रेम हाच काय तो हक्क. तथापि समाजांत कोणताही कायदा किंवा स्मृतिवचन असें नाहीं कीं, ज्याच्या योगानें ममतेला आपला हक्क शाबीत करितां येईल व तसें करण्याची ममतेची इच्छाही नसते. तें अनिश्चित प्राणधन ती मोठ्या कळकळीनें संभाळी.

त्या विधवेनें आपली समस्त प्रीति त्या मुलावर सिंचित करून टाकिली होती. श्रावणमासीं एके रात्रीं एकाएकीं कादंबिनीला मरण आलें. अकस्मात् हृदय-क्रिया बंद पडली. कालचक्राची गती सर्वत्र अबाधित चालू होती. केवळ ह्या स्नेहकातर क्षुद्र कोमल हृदयांतील कालचक्राची गती निरंतर थांबल्यासारखी झाली.

वेळेनें पोलिसांचा उपद्रव होईल म्हणून कांहीं अवडंबर न करितां तें मृत शरीर जमीनदाराच्या चार ब्राम्हणांनीं विलंब न करितां अंत्य संस्काराकरितां नेलें.

राणीहाटची स्मशानभूमी लोकवस्तीपासून फार लांब होती. तलावाच्या कांठीं एक लहानशी झोंपडी व शेजारींच एक प्रचंड वटवृक्ष. ह्यांशिवाय कांहीं एक नाहीं. पूर्वीं ह्या ठिकाणीं एक नदी वहात असे. अलीकडे ती शुष्क होऊन गेली होती. त्या नदीच्या शुष्क पात्रांतील कांहीं भाग खोदून काढून स्मशान-

पुष्करिणी बनविली होती. हल्लीं ह्या पुष्करिणीलाच त्या पुण्यनदीचें प्रतिनिधित्व लोकांनीं दिलें होतें.

मृतशरीर कुटीमध्यें ठेऊन चितेकरितां लांकडें येण्याची वाट पहात चारी-जण बसले. फार वेळ झालासें वाटून चौघांपैकीं निताई व गुरुचरण लांकडांला इतका वेळ कां लागला म्हणून पाहायला गेले. विधू व वनमाली शवाच्या रक्षणाकरितां बसले.

श्रावणांतील अंधेरी रात्र! ढग पाण्यानें थबथबलेले! आकाशांत एक ताराही दिसत नव्हता! अशा वेळीं अंधारांत दोघेजण गुपचूप बसून राहिले. एकाच्या उपरण्यांत काड्याची पेटी आणि मेणबत्ती बांधलेली होती पण सर्दीमुळें काडी पेटेना, व बरोबरचा कंदीलही विझून गेला.

बराच वेळ गप्प बसून राहिल्यावर एकजण म्हणाला, "गड्या, चिलीम-तंबाखूचा कुठें लग्गा लागला तर बरं होईल. घाइघाईमुळें कांहीं आणावयाला झालें नाहीं!"

दुसरा बोलला—"मी बघ धांवत जाऊन सगळें घेऊन येतों."

वनमालीचा पलायन करण्याचा अभिप्राय ओळखून विधू म्हणाला—"तर मग मी इथें ऐकटाच बसूं वाटतें?"

गप्पागोष्टी बंद पडल्यामुळें पांच मिनिटें एका तासाप्रमाणें भासूं लागलीं. जे लांकडें आणायला गेले होते त्यांना हे मनांतल्या मनांत शिव्या देऊं लागले. ते कुठें तरी तंबाखू ओढीत खुशाल गप्पा मारीत बसले असतील; हा संशय हलुंहलूं दृढ होऊं लागला.

जिकडे तिकडे सर्व सामसूम! केवळ पुष्करिणीच्या बाजूनें रातकिडा(झिल्ली) व बेडूक यांचा शब्द ऐकूं येत होता. अशा समयीं त्यांना भास झाली कीं, तिरडी हलली, जणूं काय प्रेतच या कुशीवरून त्या कुशीवर वळलें!

विधू व वनमालीला कांपरें सुटून ते मनांतल्या मनांत "राम राम" म्हणूं लागले. एकाएकीं दीर्घ निश्वास टाकल्याचा भास झाला. विधू आणि वनमाली उडी मारून झोपडीच्या बाहे पडून गांवाकडे पळत सुटले.

सुमारें दीड एक कोस गेल्यावर पहातात तों, त्यांचे दोघे जोडीहार हातांत कंदील घेऊन परत येत होते. ते खरोखर तंबाखू खायला गेले होते. लांकडाची खबर त्यांना मुळींच नव्हती तरी त्यांनीं थाप दिली कीं, "लांकडें फोडत आहेत, तीं लवकरच येतील." विधू-वनमालींनीं झोपडींत घडलेला सर्व प्रकार त्यांना सांगितला. निताई आणि गुरुचरण यांना विश्वास पटेना. त्यांनीं ती गोष्ट चेष्टेवारी उडवून दिली, व आपलें काम सोडून आल्याबद्दल त्यांच्यावर पुष्कळ रागावले व निर्भर्त्सना करूं लागले.

वेळ न घालवितां चौघेजण स्मशानांतल्या झोंपडींत गेले; डोका वून पहातात तों प्रेत नाहीं, रिकामी तिरडी पडलेली!

चौघे एकमेकांच्या तोंडाकडे बघूं लागले. कोल्ह्यांनीं तर नेलें नसेल? पण आच्छादन व वस्त्र देखील नाहीं. पाहतां पाहतां बाहेर जाऊन पाहूं लागले. झोपडीच्या बाहेर चिखलावर नुक्तींच उमटलेलीं स्त्रीचीं पावलें त्यांच्या नजरेस पडलीं.

भुताची गोष्ट सांगितली म्हणजे खरें मानतील इतके साधे शारदाशंकर नव्हते; तेवढ्यानें काम भागण्याचा संभव नाहीं, तेव्हां चौघांनीं मिळून विचार केला कीं, दहनविधीच संपवून आलों म्हणून सांगणें बरें.

पहाटेच्या सुमारास लाकडें घेऊन येणारांना बातमी समजली कीं, विलंब लागल्यामुळें झोपडींतल्या झोपडींत असलेल्या लांकडांवर कार्यभाग उरकून गेला. या बाबतींत कोणी सहज शंका घेण्याचा संभव नव्हता. कारण प्रेत म्हणजे कांहीं मूल्यवान् पदार्थ नाहीं कीं कोणी चोरी करून नेईल.

## द्वितीय परिच्छेद

सर्वांना ठाऊक आहे कीं, जिवंतपणाचीं बाह्य लक्षणें थांबलीं तरी, पुष्कळदां प्राण नष्ट झालेले नसतात व समयानुसार मृतवत् शरीर सचेतन होऊन पूर्ववत् कार्यक्षम होतें. कादंबिनी मेली नव्हती, कांहीं कारणानें एकाएकीं तिची हृदय-क्रिया बंद झाली येवढेंच.

कादंबिनी सचेतन होऊन पहाते तों, जिकडे तिकडे अंधकार. ज्या ठिकाणीं आपण नेहमीं निजत असूं ती जागा ही नाहीं असें मनांत येऊन तिनें " दिदी " म्हणून हांक मारली. त्या अंधेऱ्या झोंपडींत कोणी 'ओ' दिली नाहीं.

कादंबिनी भयभीत होऊन उठून बसली, मृत्युशय्येवर असल्यावेळची तिला आठवण झाली. एकाएकीं छाती भरून येऊन श्वास बंद होऊं लागला. थोरली जाऊ कोपऱ्यांत बसून शेगडीवर मुलाकरितां दूध तापवीत आहे: कादंबिनीच्यानें आणखी बसवेनासें होऊन आंथरुणावर कसें तरी आंग टाकून दिलें. व गळा दाटून येऊन म्हणाली--" दिदी, एकदां मुलाला आण बघूं. माझा जीव कसा घाबरल्यासारखा झाला आहे. " त्यानंतर एखाद्या लिहिलेल्या कागदावर शाईनें भरलेली दौत उपडी व्हावी तद्वत् सर्व काळोख पसरल्यासारखें कसें झालें वगैरे कादंबिनीचें स्मरण, चैतन्य, सर्व विश्व एका क्षणांत एकाकार झालें. मुलानें आपल्या मधुर प्रेमपूर्वक वाणीनें " काकू " म्हणून एकदां शेवटची हांक मारिली कीं नाहीं, अज्ञात अनंत यमसदनमार्गीं पाथेय म्हणून चिरपरिचित पृथ्वीमधून " स्नेह " संग्रह करून आपण आणिला कीं नाहीं ह्याची आठवण त्या विधवेला नव्हती.

प्रथम तिच्या मनांत आलें कीं, यमलोक म्हणजे असाच अत्यंत निर्जन, निरालोक. तिथें कांहीं पहावयाला नाहीं, ऐकायला नाहीं, काम करणें नाहीं, केवळ असेंच बसून बसून निरंतर जागत रहावयाचें.

नंतर दरवाजांतून जेव्हां एक गार वाऱ्याची झुळूक आली व वर्षाऋतूंतील बेडकांचा शब्द कानीं पडला तेव्हां क्षणभर तिच्या अल्प आयुष्यांतील आशैशव समस्त वर्षाऋतूसंबंधीं स्मरण घनीभूत होऊन तिच्य मनांत उदय पावलें व भूलोकाशीं असलेल्या निकट संबंधाचा अनुभव आल . इतक्यांत वीज चमकल्यामुळें सन्मुख असलेली पुष्करिणी, वटवृक्ष, विस्तीर्ण शेतें व दूरवर्ती तरुश्रेणी क्षणभर दृष्टिगोचर झाली. तिला आठवण झाली कीं तिथीपर्वणीला आपण स्नानार्थ येत असूं तीच ही पुष्करिणी, व प्रेताला पाहून मृत्यूचें आपल्याला किती भय वाटे !

घरीं परत गेल पाहिजे म्हणून प्रथम मनांत कल्पना आली. किंतु त्याचवेळीं विचार आला कीं आपण तर जगलों नाहीं, आपल्याला घरांत कोण घेणार? आपलें तिथें जाणें किती अमंगल ! आपण जीवलोक सोडून आलों !—आपण आपल्या देहाची छाया मात्र !

तसें नसतें तर ह्या अशा माध्यान्ह रात्रीं शारदाशंकरच्या सुरक्षित अंतःपुरांतून ह्या दुर्गम स्मशानांत आपण आलों असतों कशाला ? अजूनही त्या देहाची अन्त्येष्टिक्रिया समाप्त झाली नसती तर वाहक लोक कुठें गेले? शारदाशंकरच्या प्रज्वलित गृहांतील मृत्युसमयाची आठवण झाली; व नंतर ह्या दूरवर्ती, जनशून्य अंधःकारमय स्मशानांत आपल्याला एकटी पाहून तिचा निश्चय झाला कीं आपण ह्या पृथ्वीवरील जनसमाजांतील नाहीं. आपण अतिभीषण, अमंगल, आपण प्रेतात्मा !

ही कल्पना मनांत उदय पावतांच तिच्या मनानें घेतलें कीं, सृष्टि-नियमांचीं समस्त बंधनें तुटून आपण मोकळे झालों आहोंत; आपली अद्भुत शक्ती, असीम स्वाधीनता—आपण हवे तिकडे जाऊं शकूं, जें मनांत येईल तें आपल्याला करितां येईल. ह्या अभूतपूर्व नूतन भावनेच्या आविर्भावामुळें ती एखाद्या उन्मत्तपणानें वाऱ्यासारखी घरांतून बाहेर पडली व स्मशानाच्या दिशेनें जाऊं लागली. मनांत लज्जा, भय, भावना लेशमात्र नव्हतीं.

चालतां चालतां पाय थकले, क्षीणता अधिकाधिक भासूं लागली.

शेत जमीन संपतां संपेना; मधून मधून भातखाचरें, कुठें कुठें गुडघा गुडघा पाणी. जसजसा पहाटेचा प्रकाश पडूं लागला तसें शेजारच्या गांवांतील वेळूच्या बेटाच्या दिशेनें एखादंदुसऱ्या जाणाऱ्यायेणाऱ्याचा आवाज ऐकूं येऊं लागला.

कादंबिनीला कांहींसें भय वाटलें. भूलोकाशीं व माणसांशीं आपला नवीन संबंध कोणत्या प्रकारचा हें तिच्या मुळींच लक्षांत येईना. जोंपर्यंत ती शेतांत होती, स्मशानांत होती, श्रावणी रात्रीच्या अंधःकारांत होती तोंपर्यंत ती निर्भय होती, जणूं काय ती आपल्या राज्यांत होती. दिवसाच्य उजेडांत मनुष्य-वस्तीचें गाव तिला भयंकर स्थान वाटूं लागलें. मनुष्य भुताला भितें, तसेंच भूतही मनुष्याला भितें; मृत्युनदीच्या दोन तीरांवर दोघांचा वास.

## तृतीय परिच्छेद

चिखलानें माखलेले कपडे, तिचा तो अद्भुत वेश, रात्रीचें जागरण यां-मुळें तिचा चेहरा मनुष्यानें तिला पाहिलें असतां भय उत्पन्न करण्यासारखा झाला होता. वेळेनें मुलें दूर पळून जाऊन खडे सुद्धां मारावयाचीं. सुदैवानें सर्वांच्या आधीं एका पांथस्थ सद्गृहस्थानें ह्या अवस्थेंत तिला बघितलें.

तो येऊन म्हणाला–"बाई, तुम्ही चांगल्या कुलीन घराण्यांतल्या दिसता, तुम्ही ह्या स्थितींत एकट्या कुठें चाललात?"

कादंबिनीनें प्रथम कांहींच उत्तर दिलें नाहीं, ती बघत उभी राहिली. तिला कांहींच सुचेना. आपण जगांत आहोंत, भद्रकुलवधूप्रमाणें नजरेस येत आहोंत, ग्राममार्गी कोणी वाटसरू आपल्याला प्रश्न करीत आहे, हें सर्व तिला असंभवनीय वाटूं लागलें.

पांथस्थ तिला पुनश्च म्हणाला–"चला, बाई, मी तुम्हांला घरीं पोंचावितों. तुमचें घर कुठें आहे सांगा बरें?"

श्वशुरगृहीं परत जाण्याची गोष्ट मनांत आणतांच येईना, आईबाप तर नाहींतच, तेव्हां लहानपणच्या मैत्रिणीची आठवण झाली.

तिची मैत्रीण योगमाया! लहानपणापासून जरी दूर रहात होती तरी मधून मधून पत्रव्यवहार होता. कधीं कधीं प्रेमासंबंधीं वादही होत असे. कादंबिनीनें तिला म्हणावें कीं "माझ्या प्रेमाप्रमाणें तुझें प्रेम मजवर नाहीं." सुयोगानें एक-मेकींची कधीं गांठ पडली तर, कोणी कोणाला क्षणभर देखील दृष्टिआड होऊं देणार नाहीं याबद्दल दोन्हीं पक्षीं कोणालाच संदेह नव्हता.

कादंबिनीनें त्या सद्गृहस्थाला "निशिंदापूरच्या श्रीपतिचरणबाबूंच्या घरीं जायचें आहे" म्हणून सांगितलें.

त्या पांथस्थ सभ्य गृहस्थाला कलकत्त्यास जावयाचें होतें. निशिंदापूर जरी जवळ नव्हतें तरी त्यांच्या वाटेवरच होतें. त्यांनीं स्वतः कादंबिनीला श्रीपति-चरणबाबूंच्या घरीं पोहोचविलें.

दोघी मैत्रिणी भेटल्या! प्रथम ओळख पटण्यास थोडा विलंब झाला, तथापि बाल्यसादृश्य क्रमाक्रमानें उभयपक्षीं परिस्फुट झालें.

योगमाया म्हणाली—"अगबाई, आमचें केवढें भाग्य! तुझी गाठ पडेल हें माझ्या ध्यानीं मनीं देखील नव्हतें. पण गडे, तूं कशी आलीस ? तुझ्या सासरच्या माणसांनीं तुला टाकलें वाटतें ?"

कादंबिनी स्तब्ध राहिली व शेवटीं म्हणाली "सासरची गोष्ट किनै मला पुसूं नकोस. एखादी दासी म्हणून मला घरीं जागा दिलीस तर मी तुझें काम करीत जाईन."

योगमाया म्हणाली—"बाई! हें काय बोलणें हें ? दासीसारखी काय म्हणून! तूं माझी मैत्रीण—तूं माझी—"

या समयीं श्रीपतिबाबू घरीं आले! थोडा वेळ कादंबिनी त्यांच्या तोंडाकडे बघत राहिली. मग हळूंहळूं खोलींतून बाहेर पडली. डोक्यावर पदर घेणें किंवा कोणत्याही प्रकारें संकोचस्वाभिमानाचें लक्षण दिसलें नाहीं.

आपल्या सखीच्या विरुद्ध श्रीपतिबाबूंच्या मनांत कांहीं तरी येईल म्हणून योगेमायेला मनांत धास्ती वाटूं लागली होती, एतदर्थ योगमाया त्यांना नाना प्रकारें समजाविण्याचा प्रयत्न करूं लागली. पण इतक्या थोडक्या समजुतीनें व इतक्या सहज श्रीपतिबाबूंनीं तिच्या प्रस्तावाला अनुमोदन दिलें याबद्दल योगमायेला विशेषसा संतोष वाटला नाहीं.

कादंबिनी आपल्या मैत्रिणीच्या घरीं आली, पण तिच्याशीं मित्रभावानें वागणें तिला शक्य झालें नाहीं— मध्यें मृत्यूचें व्यवधान—स्वत:संबंधीं सर्वदा एक प्रकारें संदेह व जाणीव असल्यावर दुसऱ्याशीं मिळून मिसळून वागतां येणें अशक्य. कादंबिनी योगमायेच्या तोंडाकडे अशा प्रकारें बघे, जणूं काय तिला वाटत आहे कीं, योगमाया आपला पति व प्रपंच घेऊन जसें कांहीं दूर आणखी एका निराळ्या जगांत आहे. स्नेह, ममता एवं समस्त कर्तव्यसमवेत योगमाया जणूं ह्या भूलोकची व आपण शून्य छाया मात्र! ती ह्या विद्यमान लोकची व आपण अनंतामध्यें.

योगमायेलाही कसेंसेंच वाटूं लागलें; तिला कांहींच समजेना. स्त्रीजातीला रहस्य सहन होत नाहीं. कारण अनिश्चिताबद्दल कवित्व करितां येईल, पुरुषार्थ करितां येईल, पांडित्य करितां येईल, पण अनिश्चित घेऊन प्रपंच करतां येत नाहीं. म्हणूनच स्त्रिया जें आपल्याला समजत नाहीं त्याचें अस्तित्व नष्ट करून त्याच्याशीं एकतर कोणताही संपर्क ठेवीत नाहींत किंवा आपल्या हातानें त्याला नवीन स्वरूप देऊन आपल्या व्यवहाराला योग्य अशी वस्तु तयार करून घेतात—ह्या दोहोंपैकीं एकही करितां आलें नाहीं म्हणजे त्याच्यावर राग करूं लागतात.

कादंबिनी जितकी दुर्बोध होऊं लागली तितका योगमावा तिजवर राग करूं लागली. "ही पिडा आपल्या डोक्यावर कुठून येऊन बसली" म्हणून तिला वाटूं लागलें.

तशांत आणखी एक आपत्ति. कादंबिनी आपली आपल्याला भीत असे. ती स्वतः पासून सोडवून स्वतःला कुठें घेऊन जाणार ! जीं भुतांना भितात, तीं आपल्या अपरोक्ष वस्तूंना भितात—जें दृष्टिगोचर होत नाहीं त्याचें भय सर्वांपेक्षां कादंबिनीला स्वतःचेंच भय जास्त. बाह्य वस्तूंचें तिला भय नव्हतें. म्हणूनच कधीं कधीं खोलींत एकटी असतांना दोनप्रहरीं देखील ओरडत उठे. तसेंच संध्याकाळीं दिव्याच्या उजेडांत आपल्या सांवलीला पाहून तिचें आंग कांपे.

तिला अशी भितांना पाहून घरांतल्या माणसांना भय वाटूं लागलें. नोकर-चाकर व योगमाया यांना जिथें तिथें वरचेवर भूत दिसण्यास प्रारंभ झाला.

एके दिवशीं असें घडून आलें कीं, कादंबिनी मध्यरात्रीं आपल्या निजायच्या खोलींतून रडत रडत बाहेर येऊन योगमायेच्या खोलीच्या दाराशीं येऊन म्हणाली—

"दिदी, दिदी, तुझ्या पाया पडतें ग, मला एकटी टाकूं नकोस—"

योगमायेला भय वाटलें तसाच रागही आला. तिला वाटलें या क्षणीं कादंबिनीला घालवून द्यावी. श्रीपतिबाबूंना दया येऊन तिची नानाप्रकारें समजूत करून तिला आपल्या शेजारच्या खोलींत जागा दिली.

दुसरे दिवशीं अवेळीं श्रीपतिबाबूंना अंतःपुरांतून पाचारण झालें. योगमायेनें एकाएकीं भर्त्सना करण्यास सुरवात केली—“ काय बाई, ही काय तुमची रीत ? एक बाई मनुष्य सासर सोडून तुमच्या घरीं येऊन राहिली, आज महिना होऊन गेला, जायचें नांव काढीना, पण तुम्हांला त्याचें कांहींच नाहीं ? तुमच्या मनांत तरी काय आहे, सांगा बघूं मला ? तुम्हा पुरुषांची जातच अशी!”

वास्तविक साधारणपणें स्त्रीजातीबद्दल पुरुषांचा एक प्रकारें निर्विचार पक्षपात असतोच व स्त्रिया या त्याबद्दल पुरुषांना दोषही देतात. त्या निःसहाय रूपवती कादंबिनीबद्दल श्रीपतिबाबूंची करुणा यथोचित प्रमाणाहून कांहीं अंशीं अधिक होती त्याबद्दल ते योगमायेच्या गळ्याची शपथ घ्यायला तयार झाले, तथापि व्यवहारांत त्याची साक्ष पटेना.

श्रीपतिबाबूंना वाटलें कीं, निःसंशय सासरचीं माणसें ह्या पुत्रहीन विधवेशीं अन्याय—अत्याचारानें वागत असलीं पाहिजेत व म्हणूनच ती आपल्या आश्रयाला आली. ज्या अर्थी हिला आईबाप नाहींत त्या अर्थी आपल्याला हिचा त्याग करितां येत नाहीं. असें मनांत आल्यामुळें अधिक चौकशी करण्याच्या भानगडींत ते पडले नाहींत. व या अप्रिय विषयासंबंधीं कादंबिनीला प्रश्न करून तिचें मन व्यथित करण्यास प्रवृत्त झाले नाहींत.

एतदर्थ त्यांची स्त्री त्यांच्या अनुभवशून्य कर्तव्यबुद्धीवर नानाप्रकारें आघात करूं लागली. घरच्या मंडळींच्या समाधानाकरितां कादंबिनीच्या सासरीं खबर देणें अत्यंत आवश्यक हें ते ओळखीत होते. पण पत्र लिहिल्यानें, वेळेनें चांगला परिणाम होणार नाहीं. अतएव आपण समक्ष राणीहाटला जाऊन शोध काढून जें योग्य दिसेल तें करण्याचें ठरविलें.

श्रीपतिबाबू संकेताप्रमाणें गेले; इकडे योगमायेनें येऊन कादंबिनीला म्हटलें—“ सखि, तुझें आणखी इथें राहणें बरें दिसत नाहीं. लोक काय म्हणतील ? ”

कादंबिनी गंभीर मुद्रेनें योगमायेकडे बघून म्हणाली—“ लोकांशीं माझा संबंध काय ? ” योगमाया हें ऐकून निरुत्तर झाली. पण थोड्या वेळानें किंचित् रागानें म्हणाली—

इतक्यांत मुलगा ह्या कुशीवरचा त्या कुशीवर झाला व अर्धवट झोपेंत "काकू! मला पाणी दे" म्हणून म्हणाला. सोनें बाळ तें माझें! अजून काकूला विसरला नाहींस? घाइघाईनें सुरईतलें पाणी ओतून घेऊन मुलाला पोटाशीं धरून कादंबिनीनें त्याला पाणी पाजलें.

झोपेचा अम्मल होता तेथवर नेहमींच्या सवईप्रमाणें काकूच्या हातून पाणी पिण्यांत मुलाला कांहींच आश्चर्य वाटलें नाहीं. शेवटीं कादंबिनीनें आपली फार दिवसांची इच्छा तृप्त करण्याकरितां चुंबन घेऊन मुलाला निजवूं लागली. तेव्हां त्याची झोंप पुरती उडून गेली. तिला चिकटून धरून मुलानें विचारलें--

"काकू, तूं मेली होतीस ना?"

काकू म्हणाली--"हो, बाळ."

"तूंच बाळाकडे फिरून आलीस? आतां पुन्हा मरून जाणार नाहींस?" ह्याचें उत्तर देण्यापूर्वीच गोंधळ माजला. दासी एका वाटींत साबुदाण्याची खीर घेऊन खोलींत आली ती एकदम वाटी टाकून देऊन "बापरे" म्हणून बेशुद्ध होऊन पडली.

चीत्कार ऐकून पत्ते फेकून देऊन गृहिणी घाइघाईनें आली. खोलींत डोका-वून पहातांच निश्चेष्ट उभी राहिली. तिच्याच्यानें पळून जाववलें नाहीं कां तोंडून शब्द उमटला नाहीं.

हा सगळा व्यापार पाहून मुलाच्याही मनांत भयाचा संचार झाला. तो रडत रडत म्हणाला--"काकू! तूं आपली जा."

आज अनेक दिवसांनंतर कादंबिनीच्या अनुभवास आलें कीं आपण मेलों नाहीं.--तेंच तें पुरातन घर. तोच मुलगा, तेंच प्रेम जसेंच्या तसें आहे. मध्यं-तरीं विच्छेद व्यवधान कांहीं एक नाहीं. मैत्रिणीच्या घरीं गेल्यावर कादंबिनीला वाटत होतें कीं, आपण मरून गेलों आहों. मुलाच्या घरीं आल्यावर वाटूं लागलें कीं आपण तिळमात्र मेलों नाहीं.

व्याकुळ होऊन कादंबिनी म्हणाली--"दिदी, तुम्हांला मला पाहून कां भय वाटतें? पहा तर मी जशीच्या तशी आहे."

गृहिणीच्यानें आणखी धीर धरवेना. ती मूर्च्छित होऊन पडली.

वहिणीकडून बातमी मिळतांच शारदाशंकरबाबू स्वतः अंतःपुरांत येऊन दाखल झाले. त्यांनीं हात जोडून कादंबिनीस म्हटलें–" वहिनी, हें कां तुम्हांला शोभतें ? सतीश आमच्या वंशांत एकुलता एक मुलगा. त्याच्यावर तुम्ही कां नजर ठेवतां ? आम्ही कां तुम्हांला परकी आहोंत ? तुम्ही गेल्या-पासून तो कसा कृश होत चालला आहे. त्याचें दुखणें अजून त्याला सोडीत नाहीं. रात्रंदिवस " काकू काकू " करतो. हा संसार सोडून ज्या ठिकाणीं गेलांत तिथें हा मायापाश सोडून जा. आम्ही तुमचा यथोचित सत्कार करूं ! "

कादंबिनीला आणखी सहन होईना, तीव्र स्वरानें बोलली–" बाबा ! मी मेलें नाहींरे मेलें नाहीं. मी मेलें नाहीं. हें पहा मी जीवंत आहें ! "

इतकें बोलून काशाची वाटी कपाळावर आपटून घेऊं लागली. कपाळांतून रक्त स्रवूं लागलें तेव्हां म्हणाली, " हें पहा. मी जिवंत आहें कीं नाहीं. "

शारदाशंकर एखाद्या मूर्तीप्रमाणें स्तब्ध उभे राहिले. मुलगा भिऊन बापाला हांक मारूं लागला. त्या दोघीजणी मूर्च्छित स्त्रिया जमिनीवर पडून राहिल्या.

कादंबिनीनें " बाबा, मी मेलें नाहींरे मेलें नाहीं," म्हणून चीत्कार करीत खोलीच्या बाहेर पडून जिना उतरून घरांतल्या विहिरींत जाऊन उडी टाकली.

शारदाशंकरबाबूंनीं माडीवरून धाडकन् उडी टाकल्याचा आवाज ऐकला. रात्रभर वृष्टी थांबली नाहीं. दुसरे दिवशीं सकाळींही पाऊस पडतच होता. दुपारपर्यंत पावसाला खळ पडला नाहीं. कादंबिनीनें जीव देऊन आपण मेलें नाहीं हें सिद्ध करून दाखविलें.

  

*** पिशाच्च योनीच्या अस्तित्वावर रवींद्रबाबूंचा विश्वास आहे कीं नाहीं हें त्यांचे लेख वाचून सांगणें धाष्टर्याचें होईल. तथापि वास्तविक स्थिती निराळीच असून सामान्य जन अंधश्रद्धेनें व आपल्या कुसंस्कारामुळें भुतांवर विश्वास कसे

ठेवितात हें ह्या कथेंत दाखविण्याचा प्रयत्न आहे. गोष्टींत वर्णिलेला प्रकार असाधारण असला तरी अशक्य नाहीं असेंच म्हणावें लागतें. कादंबिनीच्या मनाची द्विधावस्था फार कुशलतेनें वर्णिली आहे. ती सावध होऊन विचार उद्भवले, व गार वाऱ्याची झुळूक लागून ती पूर्ण शुद्धीवर आली व स्मशानांतील दृश्य तिच्या नजरेस पडलें त्या वेळीं तिच्या मनाची स्थिती कशी होती याचें वर्णन इतकें स्वाभाविक व मार्मिक रीतीनें केलें आहे कीं मराठी साहित्यांतच काय पण इंग्रजी वाङ्मयांतही असें क्वचितच आढळेल.

कवित्वाची झाक ह्या गोष्टींतील नीरस व असाधारण कथाभागांतहि दिसल्यावांचून रहात नाहीं.

स्त्रीस्वभावाचें दिग्दर्शन, स्थळांचें वर्णन कवीच्या इतर कथांमधून जसें दिसून येतें तसेंच या कथेंतही आहे.

कांहीं दृष्टांत व कल्पना असाधारण असल्या तरी फार मार्मिक आहेत. उदाहरणार्थ—

" त्यानंतर एखाद्या लिहिलेल्या कागदावर शाईनें भरलेली दौत उपडी व्हावी तद्वत् सर्व काळोख पसरल्यासारखें कसें झालें ! "

यमलोकाची कादंबिनीची कल्पना विचार करण्यासारखी आहे. " मनुष्य भुताला भितें, तसेंच भूतही मनुष्याला भितें. मृत्युनदीच्या दोन तीरांवर दोघांचा वास. "

कादंबिनी आपल्या मैत्रिणीच्या घरीं आली, पण तिच्याशीं तिला मित्रभावानें वागणें कसें शक्य झालें नाहीं हें जें कवीनें " मध्यें मृत्यूचें व्यवधान " येथपासून " ती ह्या विद्यमान लोकाची व आपण अनंतामध्यें " पर्यंत वर्णन केलें आहे तें निरुपम आहे.

# ७. घोर रात्र

सुरबाला व मी कित्येक दिवस बरोबर शाळेंत जात होतों व नवरानवरायको म्हणून खेळही खेळलों आहोंत. सुरबालेच्या घरीं मी जाई तेव्हां तिची आई मजवर फार प्रेम करी; तिनें दोघांना शेजशेजारीं उभें करून म्हणावें, "काय पण जोडा शोभतो!" मी लहानच होतों पण तिच्या बोलण्याचा अर्थ समजे. इतरांपेक्षां सुरबालेवर माझा विशेष हक्क ही भावना माझ्या मनांत दृढ होऊं लागली होती. या अधिकारमदानें मी तिच्या खोड्या कराव्यात, तिला शासन करावें पण तिचें ही माझ्यावांचून होत नसे व माझें शासन ती निमूटपणें सोशीत असे. शेजारीपाजारी तिच्या रूपाची फार प्रशंसा करीत. पण मजसारख्या गव्हार मुलाला तिच्या सौंदर्याचा गौरव वाटेना! माझ्या मनानें घेतलें होतें कीं, सुरबाला माझें प्रभुत्व स्वीकारण्याकरितांच जन्माला आली आहे. याच समजुतीनें माझ्याकडून तिची फारच अवहेलना होत असे.

चौधरी जमीनदारांच्या घरीं माझे वडील जमीनमहसुलाचे कामावर होते. माझें अक्षर चांगलें घटलें म्हणजे जमीनमहसुलीचें काम शिकवून मला कोठें तरी गुमास्त्याची नोकरी लावून द्यावी अशी वडिलांची इच्छा! मला ती गोष्ट मनांतून मुळींच आवडत नव्हती. आमच्या गांवचा नीलरत्न कलकत्त्यास पळून जाऊन विद्याभ्यास करून कलेक्टरचा नाझर झाला होता. माझेंही ध्येय असेंच उच्च होतें. कलेक्टरचा शिरस्तेदार होतां आलें नाहीं तरी, जजाचा नाझर, कारकून, तरी होऊं असा मी मनांतल्या मनांत निश्चय करून ठेविला होता.

मी नेहमीं पहात होतों कीं, आमचे वडील अदालतीच्या नोकरांचा फारच मान ठेवीत. कांहीं ना कांहीं तरी निमित्तानें मासे, भाजी, रोख पैसे देऊन संतुष्ट ठेवीत हें मला लहानपणापासून ठाऊक होतें. म्हणूनच मी आपल्या हृदयांत अदालतीच्या शिपायापर्यंत उच्चासन दिलें होतें. ह्याच आमच्या बंगालदेशच्या पूज्य देवता. तेहतीस कोटी देवांचीच ही लहान आवृत्ति—सुख-

कर्त्या—दुःखहर्त्या विनायकापेक्षां ह्यांच्यावरच लोकांचा भरंवसा अधिक. कारण बिचाऱ्या गणपतीपासून जो लाभ होत नाहीं तो ह्यांच्यापासून होतो हा प्रत्यक्ष अनुभव लोकांच्या पुढें आहे.

मीही नीलरत्नाच्या उदाहरणानें उत्साहित होऊन संधी साधून कलकत्त्यास पळून गेलों. प्रथम मी गांवकऱ्याच्या घरीं उतरलों, पुढें वडिलांकडूनही अध्ययना-करितां थोडथोडी मदत मिळत गेली. अभ्यासही नीटपणें चालूं लागला.

ह्याखेरीज सभा, समिती ह्यांमध्येंही मी भाग घेऊं लागलों. देशाकरितां प्राण देणें ही गोष्ट आवश्यक आहे याबद्दल मला शंका मुळींच नव्हती. पण काय केलें असतां हें दुःसाध्य कार्य करितां येईल हें समजेना. कोणी मार्गदर्शकही नव्हता.

पण माझा उत्साह मात्र कमी झाला नाहीं. आम्ही खेड्यांतील मुलें कल-कत्त्याच्या पंडितंमन्य मुलांप्रमाणें सर्व गोष्टी तुच्छ मानण्यास शिकलों नव्हतों. म्हणूनच आमची दृढ निष्ठा असे. आमच्या मंडळयांचे पुढारी व्याख्यानें देत व आम्ही उपाशीं उन्हांत घरोघर हिंडून वर्गण्या गोळा करीत असूं. कधीं रस्त्याच्या कडेला उभें राहून हस्तपत्रकें वाटावीं, सभागृहांतील बाकें खुर्च्या मांडाव्या, आमच्या पुढाऱ्यांच्या विरुद्ध कोणी ब्र काढिला कीं कंबर बांधून मारामारीला तयार व्हावें, हीं आमचीं लक्षणें पाहून शहरवासी मुलें आम्हांला गांवढळ म्हणत.

नाझर, शिस्तेदार होण्याच्या हेतूनें आलों खरें पण मॅझिनी, ग्यॅरिबाल्डी होण्याच्या तयारीस लागलों. याच सुमारास सुरबालेचा पिता व माझे वडील यांचे विचार ठरून आमच्या लग्नाच्या उद्योगाला ते लागले.

मी वयाच्या पंधरा वर्षांचे सुमारास कलकत्त्यास पळून आलों त्यावेळीं सुर-बालेचें वय आठ वर्षांचें होतें. आतां मला अठरावें लागलें होतें. वडिलांच्या मतानें मी लग्नाला मोठाच झालों होतों पण मी आपल्या मनाशीं प्रतिज्ञा केली होती कीं आमरण अविवाहित राहून देशकार्यीं प्राण खर्च करीन, म्हणून मी वडिलांना सांगून टाकिलें कीं विद्याभ्यास पूर्ण होण्यापूर्वी लग्न करावयाचें नाहीं.

सुरबालेचा विवाह रामलोचनबाबूंशीं झाला, अशी खबर मला दोनचार महिन्यांतच कळली. पतितभारतवर्षाकरितां वर्गणी गोळा करण्याच्या व्यवसायांत मी असल्यानें ही बातमी मला अत्यंत तुच्छच वाटली.

मी मॅट्रिक पास झालों होतों व इंटरला बसणार या सुमारास माझे वडिलांचा देहांत झाला. मी अगदींच एकटा नव्हतों. माझी आई व दोन बहिणी होत्या. मला कॉलेज सोडून नोकरीकरितां हिंडावें लागलें. बराच प्रयत्न केल्यावर नोखाली विभागांत एका लहानशा शहरांतील हायस्कुलांत मला दुसऱ्या शिक्षकाची जागा मिळाली. मला वाटलें आपल्याला योग्य काम मिळालें. उत्साह व उपदेश देऊन आपल्याला एकेक विद्यार्थ्याला भारतवर्षाचा भावी नेता बनवितां येईल.

कामाला सुरवात झाली. लवकरच दिसून आलें कीं, भारतवर्षाच्या भावी उन्नतीपेक्षां प्रत्यासन्न परीक्षेची तयारी अधिक महत्त्वाची. मुलांना ग्रामर, ॲल्जिब्रा यांखेरीज बाहेरचें कांहीं सांगूं गेल्यास हेडमास्तर रागावत. दोन एक महिन्यांतच माझा सर्व उत्साह नष्ट झाला. मजसारखे प्रतिभाहीन लोक घरांत बसून नानाप्रकारच्या कल्पना करीत, पण कार्यक्षेत्रांत आल्यावर त्यांना मानेवर जूं घेऊन शेपटी पिरगळून घेऊन सर्व दिवस नांगर ओढावा लागला म्हणजे संध्याकाळच्या प्रहरीं जें मूठभर गवत मिळेल तेवढ्यावर संतुष्ट होऊन राहावें लागतें. नाचाबागडायला उत्साह रहात नाहीं.

आगीच्या भयानें एका शिक्षकाला शाळेंतच रहावें लागे. मी एकटा असल्यानें तो भार माझ्यावरच पडला. शाळेच्या मोठ्या इमारतीला लागूनच एक झोंपडी होती तींत मी रहात असें. शाळागृह वस्तीपासून कांहींसें दूर एका मोठ्या तळ्याच्या कांठीं असे; त्याच्याभोंवतीं पोफळी, नारळी व मांदाराचीं झाडें होतीं व शाळेच्या इमारतीच्या अगदीं जवळच दोन लिंबाची झाडें अगदीं जवळजवळ असून त्यांची दाट छाया पडत असे.

एका गोष्टीचा उल्लेख मी आतांपर्यंत केला नाहीं. तो उल्लेख करण्याजोगा आहे असें माझ्या मनांतही आलें नाहीं. येथील सरकारी वकील रामलोचनराय

यांचें घर आमच्या शाळेपासून जवळच होतें. त्यांची स्त्री सुरबाला त्याच्यापाशीं आहे व तीच माझी बाल्यसखी हेंही मी जाणत होतों.

रामलोचनबाबूंबरोबर माझें बोलणेंचालणें होत असे. सुरबालेशीं लहानपणीं माझें बोलणेंचालणें होत असे ही गोष्ट रामलोचनबाबूंना ठाऊक होती कीं नाहीं हें मला ठाऊक नाहीं. माझाही त्यांच्याशीं नवीनच परिचय असल्यामुळें ही गोष्ट त्यांना सांगणें मला योग्य वाटलें नाहीं. सुरबालेचा एकाकाळीं माझ्या जीवितार्शी एकप्रकारें निकट संबंध होता ही गोष्ट मी विसरल्यासारखेंच झालों होतों.

एकदां सुटीच्या दिवशीं मी रामलोचनबाबूंच्या घरीं त्यांच्या भेटीस गेलों. कोणत्या विषयावर त्यांचें माझें बोलणें झालें तें नीटसें आठवत नाहीं; पण बहुधा भारतवर्षाच्या दुःस्थितीसंबंधींच तें असावें. त्यांना भारतभूमीसंबंधीं विशेष कळकळ वाटत अ . किंवा हृदय भरून येत असे, असें नाहीं. पण हा विषयच असा आहे कीं, हुक्का ओढीत ओढीत घंटा–दीड घंटा मन मोकळें करून खेद प्रदर्शित करायला कांहीं हरकत नाहीं! आम्हीं बोलत बसलों असतां शेजारच्या खोलींतून बांगड्यांचा मंजुळ ध्वनी, साडीचा खरखर आवाज व पदशब्द मला ऐकूं आले. माझी खात्री झाली कीं, खिडकीच्या फटींतून उत्सुकतेनें माझ्याकडे कोणी पहात आहे. एकाएकीं माझ्या डोळ्यांसमोर–विश्वास, सरलता, स्नेह, मुग्धतामंडित विशालचक्षुद्वय–सिततारका–दीर्घ पक्ष्मल शांत गंभीर स्थिर दृष्टी–ह्याखेरीज मला कांहीं दिसेनासें झालें. एकाएकीं माझें हृदय भरून आलें व असह्य वेदना होऊं लागल्या. घरीं परत आलों पण वेदना थांबल्या नाहींत. लिहितां वाचतां, कांहीं करूं लागलों तरी हृदयावरील भार कमी होईना. सर्व देहबंध शिथिलप्राय झाले. संध्याकाळीं थोडें स्थैर्य आल्यावर असें कशानें झालें म्हणून विचार करूं लागलों तों मनानेंच जणूं काय प्रश्न केला "तुझी ती सुरबाला आज कोठें आहे?" मी उत्तर दिलें "मी तर तिला स्वइच्छेनें सोडलें!" तिनें काय मजकरितां निरंतर बसून राहावें! पण पुन्हां मनानें विचारावें "जी सुरबाला तत्समयीं तुला इच्छामात्रें प्राप्त झाली असती, तिच्याकडे तूं कांहीं केलेंस तरी, नुसतें डोळ्यानें पाहण्याचा

सुद्धां आज तुला अधिकार नाहीं. तीच बाल्यसखी सुरबाला आज तुझ्या किती कांजवळ असेना, तूं तिच्या बांगड्यांचा शब्द ऐक, तिच्या केशकलापांचा सुगंध घे, पण तिच्या तुझ्यामध्यें आज केवढी तरी भिंत उभी आहे ! ”

मी म्हटलें—असेल—सुरबाला माझी कोण ?

मनांतून उत्तर आलें—सुरबाला आज तुझी कोणी नव्हे. पण ती तुला कोणाकोणाच्या ठिकाणीं झाली नसती ? हें अगदीं सत्य ! तिच्याकडून मला काय असाध्य होतें ? सर्वहितप्रिय, सर्वांपेक्षां निकटवर्ती, माझ्या सुखदुःखाची भागिनी झाली असती. ती आज इतकी दूर, अनात्म, आज तिच्याकडे पाहण्याचें धैर्य नाहीं, तिच्याशीं बोलणें दोष, तिच्यासंबंधीं चिंता करणें पाप. आज हा रामलोचन कोठून तरी एकाएकीं येऊन उपस्थित झाला, कांहीं ठराविक मंत्र म्हटले व झडप घातल्यासारखी सुरबालेला ज्ञातिबांधवांपासून विभक्त करून एका क्षणांत निघून गेला.

मी मानव समाजांत कांहीं नवीन नीतितत्त्वांचा प्रचार करूं इच्छित नाहीं. समाजांत परिवर्तन करण्याचा माझा इरादा नाहीं. कौटुंबिक बंधनेंही तोडण्याची आकांक्षा नाहीं. मी केवळ आपल्या मनाची स्वाभाविक अवस्था काय झाली तें सांगत आहें. आपल्या मनांत जे जे तरंग उत्पन्न होतात ते सर्वच युक्तीला धरून थोडेच असणार ? रामलोचनरायच्या घरीं विराजमान असलेल्या सुरबालेवर रामलोचनपेक्षां माझा हक्क अधिक ही गोष्ट कांहीं केल्या मनांतून जाईना. मला मान्य आहे कीं कल्पना अयोग्य व अविचाराची, पण अस्वाभाविक मात्र नव्हे.

तेव्हांपासून कोणच्याही कामांत माझें मन लागेना. दोनप्रहरीं मुलें वर्गांत गुणगुण करिताहेत, सकल बाह्यसृष्टी सूर्यकिरणांनीं उद्भासित केली आहे, मंदोष्ण वायु निंबवृक्षाच्या मंजरींचा सुगंध वाहून आणीत आहे अशा वेळीं मन उत्कंठित होई. मनांतील भाव माझा मलाच समजेना. एवढें खचित कीं भारतवर्षाच्या ह्या समस्त भावी अशास्तंभांच्या व्याकरणाच्या चुक्या संशोधन करण्यांतच आपलें आयुष्य व्यतीत करावें असें मात्र वाटेना. शाळा सुटल्या-

वर त्या घरांत एकटें बसण्याला मन येईना. पण कोणी शिष्टमंडळी भेटीला आल्यास त्रास वाटे. संध्याकाळीं तळयाच्या कांठीं नारळीपोफळींच्या झाडांचा अर्थहीन मर्मध्वनी ऐकत बसलों असतां मनांत येई कीं, मनुष्यसमाज म्हणजे भ्रमाचें एक जटिल जाल. योग्य समयीं योग्य गोष्ट करण्याचें न सुचल्यानें संधि निघून गेल्यावर आपल्या अतृप्त वासनांबद्दल आपण शोक करीत बसतों.

सुरबालेशीं विवाह करून वृद्धापकाळपर्यंत सुखानें राहतां आलें असतें. पण गॅरिबाल्डि होतां होतां शेवटीं एका खेडेगांवांतील शाळेंत दुसरा मास्तर होऊन राहावें लागलें. इकडे रामलोचनराय वकिलाला सुरबालेचाच पति होण्याची कांहीं विशेष आवश्यकता होती असें नाहीं. रामलोचन वकिलाला विवाह-मुहूर्तापर्यंत सुरबाला काय आणि असुरबाला काय एकच. पण त्याच्या ध्यानीं-मनींही नसतां मुकाट्यानें लग्न करून सरकारी वकील बनून चांगला पैसा मिळ-वीत आहे. जे दिवशीं दुधाला धुरकट वास येईल ते दिवशीं सुरबालेवर राग-वत आहे, जे दिवशीं प्रसन्न होईल ते दिवशीं तिच्याकारितां दागिना घडावला टाकीत आहे. थोडें पोट सुटलेलें, चांगले कपडे घातलेला, कधीं असंतोष नाहीं. तळ्याच्या काठीं बसून आकाशांतील ताऱ्यांकडे बघत सुस्कारा टाकीत संध्याकाळ घालविण्याचा प्रसंग त्याला कधीं नाहीं.

रामलोचन एक मोठा खटला चालविण्याकरतां कांहीं दिवस परगांवीं गेला होता. ज्याप्रमाणें मी माझ्या घरीं एकटा होतों तशी सुरबालाही आपल्या घरीं एकटी होती.

मला आठवतें कीं तो सोमवारचा दिवस. सकाळपासूनच आकाशांत ढग जमले होते. दहाच्या सुमारास पावसाला सुरवात झाली. आकाशाचा रंग पाहून हेडमास्तरांनीं लवकरच शाळा सोडली. काळे काळे प्रचंड मेघ सर्व दिवसभर आकाशांत हिंडूं लागले, जणू काय कांहीं विशेष घटनेचे ते पूर्वचिन्हच होते. दुसरे दिवशीं दोनप्रहरचे सुमारास वादळ होऊन मुसळधार वृष्टी सुरू झाली. जसजशी रात्र पडूं लागली तसतसा वृष्टी व वादळाला जोर चढला. प्रथम वारा पूर्व दिशेचा होता, नंतर उत्तर व नैऋत्य दिशेनें वाहूं लागला.

अशा रात्रीं निजण्याचा प्रयत्न करणेंच व्यर्थ. अशा या भयंकर रात्रीं सुरबाला घरांत एकटी आहे हें मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. आमची शाळा तिच्या बंगल्यापेक्षां पुष्कळच मजबुत होती.

पुष्कळदां मनांत आलें कीं तिला शाळेंत बोलवावी व आपण तळ्याच्या काठीं रात्र घालवावी. पण मनाचा कांहीं केल्या धीर होईना. रात्रीं एक दीड वाजण्याच्या सुमारास भरतीचा आवाज ऐकूं आला. समुद्र जोरानें वाहत होता. घरांतून बाहेर पडलों; सुरबालेच्या घराकडे चाललों. वाटेंत आमच्या तलावाचा एक कांठ लागतो. तेथें जाईतोंपर्यंत पाणी गुडघ्यापर्यंत चढलें. बांधावर चढतों तों आणखी एक लाट येऊन आदळली. बांधाचा सर्वांत उंच भाग सपाटीपासून सतरा फुटांहून अधिक उंच होता. बांधावर मी चढतों तों समोरून दुसरें कोणी तरी तेथें येऊन पोंचलें. तें कोण हें माझा अंतरात्मा, माझें नखशिखांत सर्व शरीर जाणत होतें. तिनें मला ओळखिलें याबद्दलही मला संशय नव्हता. पांच सहा हात रुंदीच्या बेटावर आम्ही दोघे प्राणी उभे होतों.

प्रळयकालची वेळ, आकाशांत घनघोर अंधःकार, पृथिवीवरील सर्व दीप नष्ट झालेले, अशा प्रसंगीं एकमेकांशीं बोलण्यास कांहींच हरकत नाहीं. पण एक शब्दही बोलवेना. कोणी कोणाला कुशल प्रश्नही केला नाहीं. दोघेजण केवळ अंधकाराकडे पहात राहिलों. पादस्थळीं कृष्णवर्ण, उन्मत्त मृत्युप्रवाह वहात होता.

आज सर्वसंसारपरित्याग करून सुरबाला मजजवळ येऊन उभी आहे. आज मजखेरीज तिचें असें कोणी नाहीं.

ही सुरबाला अनेक वर्षांपूर्वीं माझ्या शैशवावस्थेंत जन्मांतरींचें रूप टाकून एका अज्ञेय स्थितीमधून ह्या सूर्यचंद्रोद्भासित जनाकीर्ण भूतलावर जन्मग्रहण करून मजसमीप येऊन उभी होती. व आज कित्येक वर्षांनंतर सुरबाला लोकालोकमय पृथिवी सोडून अशा भयंकर जनशून्य प्रलयान्धकारसमयीं एकाकिनी माझ्याजवळ येऊन उभी आहे. जीवनौघानें त्या नवबालिकाकलिकेला मत्समीप आणून सोडलें; मृत्युस्रोतानें आज त्या विकसित कुसुमाला पुन्हां

मजजवळ आणून सोडिलें. आणखी एक लोट या समयीं येईल तर पृथिवीच्या ह्या अंतिम स्थलापासून ज्या वृत्तांवर आम्ही आहोंत त्याचा विच्छेद करून यम-लोकीं पुन्हां संलग्न करील.

ती लाट न येवो ! पतिपुत्रगृहजनांसहित सुरबाला चिरकाल नांदो ! मी महाप्रलयतीरावर उभा असून परमानंदाचा आस्वाद घेत आहें !

रात्र संपत आली, वृष्टि थांबली, पूर ओसरला, सुरबाला आपल्या घरीं परत गेली. मीही एक शब्द न उच्चारितां आपल्या घरीं गेलों. विचार आला कीं, मी गॅरिबाल्डि होऊं शकलों नाहीं, नाझर नाहीं, शिरस्तेदार नाहीं, मी एका भिकार शाळेंत सेकण्डमास्तरच राहिलों तरी माझें समस्त जीवन, क्षणमात्र कां होईना, उज्वलित झालें. आयुष्यांतील एकंदर दिवसरात्रींमध्यें त्या एकट्या कालरात्रीनें माझ्या तुच्छ जीविताची सार्थकता झाली.

   

*** या गोष्टीचें तात्पर्य कवीचे शब्दांतच सांगावयाचें म्हणजे "योग्य समयीं योग्य गोष्ट करण्याचें न सुचल्यानें संधी निघून गेल्यावर आपल्या अतृप्त वासनां-बद्दल आपण शोक करीत बसतों." हिंदु समाजांतील विवाहपद्धती कवीला संमत नाहीं असा जरी या गोष्टींतून ध्वनी निघत असला तरी वाचकांचा गैरसमज होऊं नये म्हणून चौधरीबाबूंच्या तोंडींच एक दोन विधानें कवीनें घातलीं आहेत. " मी मानवसमाजांत कांहीं नवीन नीतितत्त्वांचा प्रचार करूं इच्छित नाहीं " इ. गोष्टीचा शेवटही फार मार्मिक रीतीनें केलेला आहे.



# ८. मुक्तीचा उपाय



फकीरचंद लहानपणापासूनच गंभीर प्रकृतीचा असल्यामुळें वृद्धांचा सहवास त्याला कंटाळवाणा होत नसे. जसें थंड पाणी तसेंच हास्य, परिहास त्याला मुळींच सहन होत नसे. आधींच गंभीर, त्यांतही वर्षांतून अधिकांश दिवस मुखमंडलाभोंवतीं लोकरीचा काळा गळपट्टा वेष्टून घेत असल्यामुळें हा कोणी तरी श्रेष्ठ पुरुष अशी लोकांत कीर्ति झाली. तशांतच फार लहान वयांत ओष्ठ व गंडस्थळ प्रचुर दाढीमिशांनीं आच्छादित झाल्यामुळें मुखावर हास्याला तिळमात्र जागा उरली नव्हती.

त्याची स्त्री हैमवती. तिचें वय अल्प असून मन ऐहिक विषयांत गढून गेलेलें. तिला बंकिमबाबूंच्या कादंबऱ्या वाचण्याची हौस. केवळ पतिदैवताची पूजा करून मनाची तृप्ति होत नसे. तिला हंसायला, बोलायला हवें असे; विकचोन्मुख पुष्प ज्याप्रमाणें वायूचें आंदोलन व प्रभातप्रकाश यांकरितां उत्कंठित असतें त्याप्रमाणें अशा नवयौवनसमयीं पतीकडून यथावकाश आदर, हास्य, विनोद यांची प्रत्याशा ती करी. पण पतीनें सवड सांपडतांच तिला भागवत सांगण्यास सुरुवात करावी, संध्याकाळच्या वेळीं गीता सांगावी; येवढेंच नव्हे तर तिच्या अध्यात्म उन्नतीसाठीं शारीरिक शासनाचीही बाकी ठेवूं नये. जे दिवशीं हैमवतीच्या बिछान्याखालून "कृष्णकांतांचें वुइल" बाहेर पडलें ते दिवशीं त्या लघुप्रकृति युवतीला रात्रभर अश्रुपात करावा लागला. मग कोठें फकीरचंद थोडे शांत झाले. एक तर कादंबरी वाचणें, दुसरें पतिदेवतेची प्रतारणा. कांहींही होवो, अविश्रांत आदेश, अनुदेश, उपदेश, धर्मनीति, दंडनीतिद्वारा शेवटीं हैमवतीच्या मुखावरील हास्य, मनाची प्रसन्नता, यौवनाची शोभा पार नाहींशी झाली. त्यावेळीं पतिदेवांना कृतकार्य झालोंसें वाटलें.

पण अनासक्त माणसाच्या दृष्टीनें संसारांत विघ्नें अनेक. लवकरच फकीरला एक मुलगा व नंतर एक मुलगी अशीं दोनच अपत्यरत्नें झालीं. संसाराचें

लगेच दुसरी त्याच्याहून खड्या सुरांत म्हणाली—"डोळ्याच्या खांचा झाल्या वाटतें? मेल्या तुला मरण कसें नाहीं आलें!"

आपल्या बायकांच्या तोंडून असली ग्राम्य भाषा ऐकण्याचा अभ्यास नसल्यामुळें अगदीं भयंभीत होऊन फकीर हात जोडून म्हणाला—आपण चुकत आहां. मी असा उजेडांत उभा रहातों—तुम्ही जरा न्याहाळून पहा.

दोघींनीं एकीमागून एकीनें सुरवात केली.

पहिली—पुष्कळ पाहिलें आहे.

दुसरी—पाहून पाहून डोळे फुटले.

पहिली—तूं कांहीं मूल नाहींस. आजच उपजला आहे जसा!

दुसरी—तुझे दुधाचे दांत कधींच पडले आहेत.

पहिली—तुला यमराज विसरला पण आम्ही नाहीं विसरणार.

हा एकतर्फी प्रेमालाप किती वेळ चालला असता तें सांगतां येणें कठीण आहे. फकीरला तोंडांतून एक शब्द काढण्याचें सामर्थ्य नव्हतें. तो मान खालीं घालून बसला होता. ही गडबड ऐकून लोकांची दाटी झालेली पाहून यष्टीचरण आला.

वृद्ध म्हणाला— इतके दिवस घर कसें शून्य भासत होतें. आज समजत आहे कीं माझा माखन परत आला.

फकीर हात जोडून म्हणाला—महाराज, आपल्या पुत्रबंधूंच्या हातून मला सोडवा.

यष्टी—बाबा फार दिसांनीं परत आला आहेस म्हणून पहिल्या पहिल्यांदा अवघड वाटत आहे. मुलींनो, तुम्ही आतां जा. माखन तर आतां इथेंच आहे. आतां मी त्याला कांहीं केल्या जाऊं देणार नाहीं.

ललनाद्वयाला निरोप दिल्यावर फकीर यष्टीचरणला म्हणाला—महाराज, आपला पुत्र संसारत्याग करून कां गेला तें आम्ही पूर्णपणें ओळखलें! मी आपल्याला प्रणाम करीत आहें. मी आतां जातों.

यष्टीचरण इतक्या मोठ्यानें रडूं ओरडूं लागला कीं, शेजारच्या लोकांना वाटलें कीं माखन बापाला मारीत आहे. सर्व लोक हां हां म्हणतां धांवत आले.

त्याला जाणविलें कीं हें तपस्वीगिरीचें ढोंग यापुढें चालणार नाहीं. शहाण्या-प्रमाणें मुकाट्यानें राहिलें पाहिजे.

एकजण म्हणाला—हा परमहंस कसला ? परमबक आहे.

गांभीर्य, दाढीमिशा, व गळेबंद यांच्या जोरावर आजपर्यंत फकीरचंदला इतकी कठोर निंदा कधींच ऐकून घ्यावी लागली नाहीं. कसेंही असो, पळून जाण्याला आतां मार्ग उरला नाहीं. लोक पाळतीवर राहिले. स्वत: जमीनदार षष्ठीचरणच्या पक्षाचा झाला.

६

फकीरनें पाहिलें इतका सक्त पहारा आहे कीं, मेल्यावांचून घरांतून बाहेर पडणें कठीण. घरांत बसल्या बसल्या गाणें म्हणूं लागला—'उगीच कां तळमळसी मना व्यर्थ कसें फसलेंसी ।' गाण्यांतला अध्यात्मिक अर्थ बराचसा कमी झाला होता हें सांगणें नकोच. अशा रीतीनें कांहीं दिवस गेले. माखन आल्याची बातमी ऐकून बायकोचा भाऊ व बहिण आली. त्यांनीं येतांच फकीरच्या दाढी-मिशा धरून ओढल्या. ते म्हणाले ' ह्या खरोखरीच्या नाहींत. ह्या कपटवेशा-करितां चिकटविलेल्या आहेत.' नासापूट धरून ओढल्यावर फकीरसारख्या महात्म्यालाही आपलें महात्म्य रक्षण करणें कठीण झालें. ह्याशिवाय कानावरही अत्याचार कमी झाले नाहींत. ते एक तर उपटले गेले व दुसरें भाषाप्रयोग इतका कडक होता कीं, न उपटतांच लाल झाले असते. याशिवाय लोकांनीं त्याला असें गायन गायला लाविलें कीं मोठमोठ्या आधुनिक पंडितांना त्याची अध्यात्मिक व्याख्या करतांना हार मानावी लागेल. निजल्यावर लोकांनीं त्याच्या स्वल्पावशिष्ट गंडस्थलावर चुना फांसावा. भोजनसमयीं, साखरेचे जागीं मीठ, गोड्या पाण्याऐवजीं खारें, पाटाखालीं सुपारी ठेवून घसरून पाडणें, अशा शेंकडों उपायांनीं फकीरचें अभ्रभेदी गांभीर्य भूमिसात् करून टाकिलें.

फकीर रागावे, आरडे, ओरडे, आवेश आणी पण कशानेंही ह्या उपद्रवी लोकांच्या मनांत भीति उत्पन्न करूं शकला नाहीं. उलट आपल्याला अधिकच

हास्यास्पद करून घेतलें. तशांतच आंतून एक मधुरसा हास्यध्वनी मधून मधून ऐकूं येऊं लागला. तो परिचित असा वाटल्यामुळें मन अधिकच चकित व अस्थिर झालें.

तो परिचित ध्वनी वाचकांनाही अपरिचित नाहीं. येवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, यष्टिचरण कांहीं नात्याच्या संबंधानें हैमवतीचा मामा. लग्नानंतर सासूकडून फार छळ होऊं लागला म्हणजे पितृमातृहीना हैमवती कोणत्याना कोणत्या नातेवाइकाच्या घराचा आश्रय करीत असे. पुष्कळ दिवसांनीं ती मामाच्या घरीं आली होती. पडद्याच्या आंतून तिला हें हास्यकारक दृश्य यावेळीं पहावयास सांपडलें. यावेळीं हैमवतीच्या स्वाभाविक विनोदप्रियते-बरोबरच प्रतिहिंसाप्रवृत्तीचा उद्रेक झाला होता कीं नाहीं हें मार्मिक वाचकांनींच ठरवावें. ज्यांचें केवळ थट्टामस्करीचें नातें होतें ते केवळ मधून मधून विश्रांति तरी घेत. पण ज्यांचें प्रेमाचें नातें त्यांच्या हातून सुटका होणें फार कठीण झालें. सात मुली व एक मुलगा, त्याला एक क्षणभरही सोडीनात.बापाचा स्नेह संपादन करण्याकरितां त्यांच्या आया त्यांना कांहींना कांहीं तरी निमित्तानें त्याच्याकडे पाठवीत. दोघी सवतींमध्यें चढाओढ सुरू झाली. आपल्या मुलांचाच बापानें आदर करावा म्हणून दोघींचाही प्रयत्न. दोघींनीं मुलांना उत्तेजन द्यावें. गळ्यांत पडणें, मांडीवर बसणें, चुंबन घेणें इत्यादि स्नेहप्रकाशनकार्यांमध्यें दोन्ही दळें परस्परांना जिंकण्याकरितां आटोकाट प्रयत्न करूं लागलीं.

हें सांगण्याची आवश्यकता नाहीं कीं, फकीर हा अत्यंत अरसिक स्वभावाचा. तसें नसतें तर आपल्या मुलांबाळांना सोडून गेलाच नसता. मुलांना भक्ति करणें ठाऊक नाहीं, त्यांना साधुत्वाची चाड नाहीं, म्हणूनच फकीर शिशु-समाजावर तिळमात्र अनुरक्त नसे. तो त्यांना कीटपतंगांप्रमाणें आपल्यापासून दूर ठेवण्याची इच्छा करी. सांप्रत अर्भकगणांच्या टोळधाडीनें नित्य प्रच्छन्न असल्यामुळें बर्जोहस अक्षरांच्या लहान मोठ्या टिपण्यानीं आद्योपान्त समाकीर्ण एखाद्या ऐतिहासिक प्रबंधाप्रमाणें शोभायमान झाला होता. मुलांमध्यें वयाचें अंतर बरेंच होतें. पण त्यांतील कोणीही फकीरशीं वयःप्राप्त सभ्यजनोचित

व्यवहार करीत नसे. शुद्ध शुचिर्भूत फकीरचंदाचे डोळे अनेकदां पाण्यानें भरून येत. पण ते आनंदाश्रु खचित नव्हते.

परक्याचीं मुलें निरनिराळ्या सुरांत "बाबा बाबा" म्हणून आदरानें संबोधित त्यावेळीं श्वापदी शक्तीचा प्रयोग करण्याची अत्यंत इच्छा होत असे, पण भयानें तसें करितां येईना. तोंड वांकडें करून गप्प बसे.

शेवटीं फकीरानें मोठा आवेश आणून सांगितलें—"मी जातों; पहातों मला कोण अटक करणार तो." गांवच्या लोकांनीं एक वकील आणिला. वकिलानें येऊन विचारिलें, "आपल्याला माहीत आहे आपल्याला दोन बायका आहेत?"

फकीर—होय, ही गोष्ट येथें आल्यावर ठाऊक झाली.

वकील—आपल्याला सात मुली, एक मुलगा, त्यांतील दोन लग्नाच्या मुली?

फकीर—मला दिसतें कीं माझ्यापेक्षां तुम्हांलाच अधिक माहिती आहे.

वकील—ह्या बृहत् परिवाराच्या पालनपोषणाचा भार आपण जर न घ्याल तर आपल्या दोघी अनाथ स्त्रियांना अदालतीचा आश्रय करावा लागेल. पूर्वींच आपल्याला बजावून ठेवीत आहें.

फकीर सगळ्यापेक्षां अदालतीला भी. त्याला ठाऊक होतें कीं, वकील उलट तपासणी करते वेळीं मोठमोठ्या माणसांच्या मानमर्यादा, गांभीर्याची परवा मुळींच देखील करीत नाहींत, उघडउघड अपमान करितात, व वर्तमानपत्रां-तून त्याचा रिपोर्ट प्रसिद्ध होतो. फकीरनें डोळ्यांत अश्रू आणून आपली सविस्तर हकीकत सांगण्याचा प्रयत्न केला. वकील, त्याचें चातुर्य, त्याची उपस्थित बुद्धि, काल्पनिक गोष्ट रचल्याची असाधारण क्षमता इत्यादि गुणांची पुन्हां पुन्हां प्रशंसा करूं लागला. हें ऐकून आपले हातपाय चावून घ्यावेत कीं काय करावें असें फकीरला झालें.

फकीरला पुनश्च पलायनोद्यत पाहून शोकानें अधीर होऊन यष्टीचरण रडूं लागला. गांवचे लोक चारी बाजूंनीं गोळा होऊन शिव्यांचा वर्षाव करूं लागले. वकिलानें अशी धमकी दिली कीं, तोंडांतून त्यानें ब्र देखील काढिला नाहीं.

ह्या उप्पर आठजण मुलेंमुली, मोठ्या मायेनें चारी बाजूंनीं आलिंगन देऊं लागलीं व त्याचा श्वास बंद होण्याची वेळ आली; तेव्हां हैमवतीला हंसावें कां रडावें कांहींच समजेना. इतक्यामध्यें अन्य उपाय न सुचून फकीरनें आपल्या बापाला चिठी लिहून आपली साद्यंत हकीकत कळविली. तें पत्र पाहून फकीरचे वडील हरिचरणबाबू येऊन दाखल झाले. पण गांवचे लोक, जमीनदार व वकील कांहीं केल्या ऐकेनात.

हा फकीर नसून हा माखन आहे ही गोष्ट शाबीत करण्याकरितां या लोकांनीं निरुत्तर करून टाकण्याजोगा पुरावा आणिला. येथपर्यंत कीं ज्या सुइणीनें बाळंतपण केलें त्या म्हातारीला आणून हजर केली. ती कंपित हस्तांनीं फकीरची हनुवटी धरून तोंडाकडे निरखून पाहून त्याच्या दाढीवर अश्रू ढाळूं लागली.

जेव्हां पाहिलें कीं एवढ्यानेंही फकीर ऐकत नाहीं तेव्हां अवगुंठनवती दोघी स्त्रिया उपस्थित झाल्या. शेजारीपाजारी उठून बाहेर गेले. केवळ दोघी, दोघे बाप, फकीर व मुलें राहिलीं. दोघी स्त्रिया हातवारे करीत करीत विचारूं लागल्या-कोणत्या चुलींत कोणत्या नर्कांत जायची इच्छा झाली आहे? फकीरचा कांहीं निश्चय होईना. तो उत्तर न देतां तसाच गप्प बसला. पण मनांतल्या मनांत विचार करितां असें दिसलें कीं त्याचा अमुक एका विशेष नरकाबद्दल पक्षपात आहे असें नाहीं, कोणता कां होईना पण एकदां येथून सुटका झाली पाहिजे.

इतक्यांत आणखी एक रमणीय मूर्ती येऊन दाखल झाली. तिनें येऊन फकीरला प्रणाम केला.

फकीर प्रथम तर स्तब्ध झाला, मग आनंदानें उत्तेजित होऊन म्हणाला, "अरे ही तर हैमवती!"

आपल्या किंवा परक्याच्या स्त्रीला पाहून इतकें प्रेम त्याच्या हृदयांत या पूर्वी कधींच जागृत झालें नव्हतें. मनांत आलें—मूर्तिमंत मुक्ती स्वयं उपस्थित झाली आहे.

एक गृहस्थ तोंडावर शालजोडी घेऊन आडून हें नाटक पहात होता त्याचें नांव माखनलाल. एका निरीह अपरिचित व्यक्तीला निजपदाभिषिक्त पाहून

त्याला एतावत्कालपर्यंत फार आनंद झाला. शेवटीं हैमवती आलेली पाहून त्यानें जेव्हां जाणिलें कीं उक्त निरपराधी व्यक्ती आपले भागिनीपति, तेव्हां दया येऊन घरांत येऊन म्हणाला–" आपल्याला अशा विपत्तींत ठेवणें महापातक." दोघी स्त्रियांकडे बोट दाखवून म्हणाला— " हा अमचा गळफास, ही आमची शृंखला." माखनलालचें हें असाधारण धैर्य व शौर्य पाहून गावांतील लोक आश्चर्यचकित झाले.

  

*** या गोष्टींत मुख्य पात्रें अशीं दोनच. एक फकीरचंद व दुसरें हैमवती. या कथेंतील भाषा किंचित् क्लिष्ट वाटण्याचा संभव आहे, तथापि गोष्टींतील विनोद व उपमारूपकादि अलंकार फार उच्च कोटींतील आहेत. गोष्टींतील प्रसंग असाधारण मानले तरी अशक्य नाहींत. मध्यम स्थितींतील अशिक्षित स्त्रियांचें चित्र अगदीं वस्तुस्थितीला धरून आहे.

भाषेंतील वैचित्र्य ठराविक पद्धतीचें नसून नवीन कल्पना, नवीन संस्कारांनीं व नव्या नव्या प्रयोगांनीं ती "मुळांत" भूषित केलेली आहे. कांहीं कल्पना व भाषाप्रयोग उदाहरणार्थ खालीं देत आहोंत.

" ओष्ट व गंडस्थळ ( गाल ) प्रचुरदाढीमिशांनीं आच्छादित झाल्यामुळें मुखावर हास्याला तिळमात्र जागा उरली नव्हती."

" त्या लघुप्रकृति युवतीला ( light-hearted )."

"विकचोन्मुख पुष्प ज्याप्रमाणें वायूचें आंदोलन व प्रभातप्रकाश यांकरितां उत्कंठित असतें त्याप्रमाणें अशा नवयौवनसमयीं पतीकडून यथावकाश आदर, हास्य, विनोद यांची प्रत्याशा ती करी." या वाक्यांत स्त्रीस्वभावाबद्दल केलेलें विधान व उपमा दोन्हीही कवित्वपूर्ण आहेत.

" त्यांतच जेव्हां दोन कर्णधार दोहींकडे ओढाताण करूं लागले..." इ.

" अचल गांभीर्य " हा प्रयोग नवीन आहे.

" उन्नतचित्त फकीरचंदाला..." इ.

" हा एकतर्फी प्रेमालाप किती वेळ चालला असता...." इ.

'पुत्रवधू' हा शब्द बंगाली भाषेंत 'सून' या शब्दाबद्दल प्रचलित आहे. सून या शब्दानें मराठी भाषेंत अर्थबोध होतोच तरी पण सून या शब्दानें सासू-सून हेंच नातें सूचित होतें. कांहीं प्रसंगीं या गर्भित अर्थाचें प्रयोजन नसतें व मुलाशीं असलेला संबंधच अधिक उद्दिष्ट असतो अशा वेळीं 'पुत्रवधू' हा प्रयोगच जास्त शोभेल.



# ९. मध्यवर्तिनी

## प्रथम परिच्छेद

निवारणबाबूंचा संसार अत्यंत सामान्य जनाप्रमाणें, त्यांना काव्यरसाचा नामगंध देखील नव्हता. आयुष्यांत काव्यरसाची कांहीं आवश्यकता आहे ही कल्पना देखील त्यांच्या मनाला कधीं शिवली नाहीं. ज्याप्रमाणें परिचित पुरातन अशा चर्मी जोडयांमध्यें दोन्ही पाय निशंकपणें सहजगत्या प्रवेश करितात त्याचप्रमाणें ह्या पुरातन पृथिवमिध्यें निवारणबाबू आपलें चिरभयस्त स्थान अधिकृत करून होते. त्यासंबंधीं चुकून सुद्धां ते चिंता, तर्क, तत्त्वावलोचन करीत नसत.

निवारणबाबू प्रातःकाळीं उठल्यानंतर रस्त्याकडे तोंड असलेल्या दाराशीं उघडया अंगानें अत्यंत निरुद्विग्न मनानें हुक्का ओढीत बसत असत. रस्त्यांत लोक जात येत, गाडीघोडा जाई येई, भिक्षेकरी गाणें गात, जुन्या बाटल्या विकत घेणारा फेरीवाला ओरडत जाई, हें चंचल दृश्य त्यांच्या मनाला विशेष कष्ट न देतां व्यापृत करून ठेवी. जे दिवशीं कैऱ्यावाला किंवा तपसी मासेवाला येई ते दिवशीं जास्तीकमी पैसे खर्चून कांहीं भोज्य विशेषांची योजना होत असे. तदनंतर यथासमय तेल चोपडणें झाल्यावर स्नान, स्नानानंतर भोजन, भोजनोत्तर दोरीवर टांगलेला चापकाना घालून चिलीम ओढून तोंडांत विडा कोंबून भरल्यावर ऑफिसयात्रा. ऑफिसांतून परत आल्यावर शेजारीं रामलोचन घोष यांचे घरीं प्रशांत गंभीरपणानें संध्याकाळ घालविल्यावर भोजनानंतर रात्रीं शयनगृहांत स्त्रीची गांठ पडे. तिचें नाव हरसुंदरी.

त्या ठिकाणीं स्नेह्याचे घरीं लग्नानिमित्त आहेर पाठविणें, नवीन ठेवलेली मोलकरीण काम ऐकत नाहीं म्हणून तक्रार, मिसळीच्या भाजींत फोडणीच्या विशेष प्रकारच्या मसाल्याची उपयुक्तता, वगैरे विषयांची चर्चा चालत असे.

ती आजपर्यंत कोणी कवींनीं छंदोबद्ध केलेली नसल्यामुळें तिचें विवरण करण्याकडे कधीं लक्ष जाण्याचें कारण पडलें नाहीं.

अशा प्रकारें कालक्षेप चालला असतां फाल्गुनमासीं हरसुंदरी दुखण्यानें पडली. ताप कांहीं केल्या कांहीं सोडीना. डॉक्टर जितकें जितकें क्विनीन देत तितका तितका ताप कुंठितगति प्रबलप्रवाहाप्रमाणें वरचेवर चढे. अशा प्रकारें वीस तीस दिवस करितां करितां चाळीस दिवसपर्यंत दुखणें हटलें नाहीं.

निवारणबाबूंचें ऑफिसांत जाणें बंद पडलें, रामलोचनबाबूंच्या संध्याकाळचे सभेलाही अलीकडे ते जातनासे झाले. केव्हां शयनगृहांत जाऊन रोग्याची अवस्था पाहून येत, केव्हां बाहेरच्या व्हरांड्यांत बसून सचिंत मुखानें तंबाखू ओढीत बसत. दोन वेळ डॉक्टर वैद्य येऊन जात. जें जें कोणी सांगेल त्या त्या औषधाची परीक्षा करून पहात.

अशा अव्यवस्थित रीतीनें शुश्रूषा चालली असूनही चाळिसावे दिवशीं हरसुंदरी दुखण्यांतून बरी झाली. पण ती इतकी अशक्त व कृश झाली कीं शरीर जणूं काय दूर अंतरावरून क्षीण स्वरानें केवळ ‘ मी आहें ’ म्हणून सांगत होतें.

या समयीं वसंतऋतूंतील दक्षिण दिशेचा वारा वाहण्यास सुरवात झाली होती. उष्ण रात्रीच्या चंद्रप्रकाशाला सीमंतिनीच्या उन्मुक्तद्वार शयनगृहामध्यें निःशब्दपदसंचारानें प्रवेश करण्याचा अधिकार प्राप्त झाला होता.

हरसुंदरीच्या खोलीच्या खालींच शेजारणीचा मागील दारच्या आवारांतला बगीचा होता. तें कांहीं विशेष दर्शनीय रमणीय स्थान होतें कीं नाहीं सांगतां येत नाहीं. एके काळीं तेथें कोणी तरी हौसेनें कांहीं क्रोटनचीं झाडें लाविलीं होतीं. पण त्यानंतर कोणी तिकडे बघितलेलें नव्हतें. शुष्क काष्ठांच्या मांडवावर भोपळ्याचा वेल पसरलेला, जुन्या बोरीच्या झाडाखालीं खूप जंगल माजलेलें, स्वयंपाकघराच्या पडक्या भिंतीच्या विटा पडलेल्या व त्यावरच कोळसे व राख पडून पडून एक मोठा थोरला ढीग झाला होता.

तथापि खिडकीपाशीं निजून ह्या बगीच्याकडे पाहून प्रतिक्षणीं हरसुंदरीला जो आनंद होई तो तिच्या सबंध आयुष्यांत कधीं झाला नव्हता. ग्रीष्मऋतूंत

ज्याप्रमाणें प्रवाहाचा वेग मंद होऊन क्षुद्र ग्रामनदी वालुकाशय्येवर जीर्ण होऊन पडते व त्या वेळीं तिला जशी स्वच्छता प्राप्त होते, कंपित सूर्यप्रकाश त्या वेळीं जसा तळापर्यंत जाऊन पोंचतो, वायुस्पर्श जणूं काय तिचें सर्व शरीर पुलकित करून सोडतो व आकाशांतील तारागण तिच्या स्फटिकमय दर्पणावर स्पष्टपणें प्रतिबिंबित होतो; त्याप्रमाणें हरसुंदरीच्या क्षीण जीवतंतूवर आनंदघन प्रकृतीची प्रत्येक करांगुली जणूं काय स्पर्श करूं लागली व अभ्यंतरीं जें एक संगीत उदय पावलें त्याचा खरा अर्थ तिला पूर्ण रीतीनें समजला नाहीं.

तिचा पती जेव्हां जवळ बसून विचारी "कसें काय आहे?" तेव्हां तिचे डोळे पाण्यानें भरून येत. दुखण्यानें कृश झालेल्या मुखावर तिचे डोळे फार मोठाले दिसूं लागले होते व अशा त्या मोठमोठ्या डोळ्यांनीं प्रेमार्द्र कृतज्ञ दृष्टीनें नवऱ्याकडे पहावें व आपल्या कृश हातांनीं नवऱ्याचा हात धरून ठेवून स्वस्थ पडून रहावें. पतिहृदयामध्येंही जणूं काय नवीन आनंदरश्मी उदय पावूं लागला.

अशा रीतीनें कांहीं दिवस गेले. एके दिवशीं रात्रीं पडक्या भिंतीवरील लहानशा पिंपळाच्या झाडाच्या कंपमान शाखांमधून चंद्र वर येत होता, व संध्यासमयाचें आवरण छेदून एकाएकीं निशाचर वायु जणूं काय जागृत झाला होता, अशा समयीं निवारणबाबूंच्या केसांवरून हात फिरवीत फिरवीत हरसुंदरी म्हणाली—"मला मूळबाळ कांहीं झालें नाहीं. तुम्ही आणखी लग्न करा."

हरसुंदरी पुष्कळ दिवसांपासून हा विचार करीत होती. मनामध्यें ज्या वेळीं उत्कट आनंद अथवा प्रेमाचा संचार होतो त्या वेळीं मनुष्याला वाटत असतें कीं मी सर्व कांहीं करूं शकतों. अशा वेळीं स्वार्थत्याग करण्याची इच्छाही फार प्रबळ असते. प्रवाहाचा उच्छ्वास ज्याप्रमाणें कठीण तटभागीं वेगानें येऊन आदळून मूर्छित होतो तद्वत् प्रेमाचा आवेग, आनंदाचा उच्छ्वास महत् त्याग व महत् दुःखावर निक्षेप करूं पहात असतो.

अशा मानसी अवस्थेंत एके दिवशीं अत्यंत प्रसन्न मनानें आपल्या पतीकरितां कांहीं तरी महत् कार्य करण्याचा हरसुंदरीनें मनाशीं निश्चय केला. परंतु

इच्छेप्रमाणें गोष्टी थोड्याच घडवून आणितां येतात ! आपल्या हातीं काय आहे? आपण काय देणार? ऐश्वर्य नाहीं, बुद्धि नाहीं, योग्यता नाहीं. आपल्या पाशीं केवळ आपले प्राण ! ते जरी द्यावे लागले तरी देऊं ! पण त्याची तरी किंमत काय ?

केतकीप्रमाणें गौरवर्ण, नवनीताप्रमाणें कोमल बाळ, मदनाप्रमाणें सुंदर, प्रेमाची जणूं काय मूर्तीच, असें एखादें मूल आपल्या पोटीं असतें तर ! पण पंचप्राण अर्पण केल्यानेंहि ती गोष्ट घडण्यासारखी नाहीं. तेव्हां मनांत आलें कीं, नवऱ्याचें एखादें लग्न करून द्यावें. मनांत विचार केला कीं, बायका या गोष्टीला इतक्या भितात कां ? ही गोष्ट कांहीं कठीण नाहीं. जिचें पतीवर प्रेम आहे तिला सवतीवर प्रेम करणें का असाध्य ? ही गोष्ट मनांत येऊन जणूं काय छाती फुगली.

या विषयाची प्रस्तावना झाली, तेव्हां ती गोष्ट निवारणबाबूंनीं उडवाउडवी-वर नेली. दुसऱ्यांदा तिसऱ्यांदा देखील त्यांनीं ऐकून घेतलें नाहीं.

नवऱ्याची असंमति, अनिच्छा पाहून हरसुंदरीचा विश्वास व आनंद जितका वाढला तितकाच निश्चयही दृढ झाला.

इकडे निवारणबाबू जों जों तिची विनवणी ऐकून घेऊं लागले तसतशी या गोष्टीची असंभाव्यता त्यांच्या मनांतून दूर जाऊं लागली व गृहद्वारीं बसून तंबाखू ओढतां ओढतां संतान-परिवृत्त घराचें सुखमय चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागलें.

एके दिवशीं स्वतः होऊन त्यांनीं विषय काढिला. "वृद्धापकाळीं एखाद्या लहान पोरीशीं लग्न करून तिला वागविणें आमच्या हातून होणार नाहीं."

हरसुंदरी म्हणाली—"त्याचा विचार तुम्हांला करण्याचें कारण नाहीं. लहा-नाची मोठी करायची जिम्मेदारी माझ्यावर." बोलतां बोलतां ह्या संतानहीन रमणीच्या डोळ्यांसमोर एका अल्पवयस्क, सुकुमार, लज्जाशील, आईच्या अंका-पासून सद्यःच्युत नववधूचें चित्र उभें राहिलें व हृदय स्नेहानें विगलित होऊन गेलें.

निवारणः——आम्हांला ऑफिस, आमचें कामकाज, तुम्ही, इतकें असल्यावर ल्हान मुलींचे कोड पुरवायला आम्हांला वेळ तरी कुठें आहे ?

हरसुंदरीनें वारंवार सांगितलें कीं "त्याकरतां तुम्हांला वेळ मुळींच घालवायला नको." शेवटीं थट्टेथट्टेनें म्हणाली—बरं, बरं, पण पाहीन कुठें तुमचें कामकाज जाईल आन मी जाईन तें.

याचें उत्तर देणें निवारणबाबूंना आवश्यक वाटलें नाहीं. शांतपणें हरसुंदरीच्या गालावर एका बोटानें हळूच आघात केला. येथें प्रस्तावना संपली.

## — द्वितीय परिच्छेद —

नाकांत एक लहानशी * नलक ( नथ ) घातलेल्या रडक्या तोंडाच्या मुलीशीं निवारणबाबूंचा विवाह झाला. मुलीचें नांव शैलबाला.

निवारणबाबूंना वाटूं लागलें, नांव किती मधुर, मुखही किती सुंदर ! तिचा अभिनय, तिची ठेवण, तिचें चालणें ह्या गोष्टी लक्ष लावून पहाव्याशा वाटत, पण तें आज थोडेंच घडणार ! उलट निवारणबाबू असें दाखवूं लागले कीं, येवढ्याशा पोरीशीं लग्न करून फुकट विपत्तींत पडलों. कसातरी हा पाश सोडून आपल्या वयाला शोभेल अशा कामाला लागलों म्हणजे वांचलों.

हरसुंदरीला निवारणबाबूंचें हें वैराग्य पाहून मनांतल्यामनांत मोठा आनंद होई. कधीं कधीं हात धरून ठेवून तिनें म्हणावें "हें काय, पळून कुठें चाललात ! येवढीशी पोर ! ती का तुम्हाला खाते कीं काय ?"

निवारणबाबू उताविळ होऊन म्हणत—छे छे, थांब थांब, मला कांहीं जरूरीचें काम आहे.—असें म्हणत कीं जणूं काय पळून जाण्याला मार्ग नाहीं.

हरसुंदरीनें दार ढकलून घेऊन हंसत म्हणावें—आज सुटून जाणें होणार नाहीं.—शेवटीं निवारणबाबू अगदीं निरुपाय होऊन बसत.

---

* नलक—बंगाली लोकांत जुन्या चालीच्या घराण्यांत लहान मुलींनीं बारीक मोत्यांच्या झुपक्याची नथ दोन नाकपुड्यांच्या मधल्या भागाला (टोंचून) घालण्याची चाल आहे.

हरसुंदरी कानाशीं लागून म्हणे—परक्याची मुलगी घरांत आणून तिची अशी उपेक्षा करून कशी चालेल ?

इतकें म्हणून शैलबालेला धरून आणून नवऱ्याच्या डाव्या बाजूला बसवून हरसुंदरीनें शैलबालेचे डोक्यावरील पदर मागें सारून तिची अनवठी धरून तोंड वर करून म्हणावें--कसें चंद्रासारखें मुख ! पहातर वर !

कधीं दोघांना खोलींत बसवून कामाच्या निमित्तानें बाहेर जाऊन पटकन् दरवाजा बंद करून घेई. निवारणबाबूंची खात्री होती कीं दाराच्या भोकाशीं कोठून ना कोठून निरीक्षण होत आहे—अत्यंत उदासीनतेनें निवारणबाबू पाठ फिरवून निजण्याचा उपक्रम करीत, तेव्हां शैलबाला डोक्यावर पदर घेऊन गुड-घ्यांत मान घालून तोंड फिरवून कोपऱ्यांत जाऊन बसे.

सरतेशेवटीं हरसुंदरीला तीर गांठतां येईना म्हणून तिनें सुकाणू सोडून दिलें. तरी मनांत ती निराश नव्हती.

हरसुंदरीनें सुकाणू सोडून देतांच निवारणबाबू स्वयं कर्णधार झाले. हें बृहत् कौतूहल, हें महत् रहस्य ! एखादा हिरा हातीं आला असतां नाना प्रकारें उलटपलट करून बघण्याची इच्छा होते, मग हें अतिसूक्ष्म मनुष्यहृदय, हें तर किती अपूर्व ! हें किती प्रकारांनीं, स्पर्श करून, मोठ्या आदरानें, दुरून, मागून, समोरून, बाजूनें पाहिलें पाहिजे ! कधीं कानांतील डूल हलवून, कधीं बुरखा काढून, कधीं चाकित होऊन तर कधीं नक्षत्राकडे दीर्घकाळ न्याहाळून पहावें, तद्वत् प्रतिक्षण नवीन नवीन भासणारी सौंदर्यशोभा बघितली पाहिजे !

मॅकमोरान कंपनीचे हेडक्लार्क निवारणचंद्र यांच्या बुद्धींत ही अभिजता आजपर्यंत उदय पावली नव्हती. त्यांचें पहिलें लग्न झालें त्या वेळीं ते फारच लहान होते. त्यांना यौवन प्राप्त झालें त्या वेळीं स्त्री त्यांच्या संनिध, चिरपरि-चित, विवाहित जीवन त्यांना चिराभ्यस्त, हरसुंदरीवर अवश्य त्यांचें प्रेम होतें, पण क्रमाक्रमानें तें परिणत होत गेल्यानें त्याची जाणीव त्यांना नव्हती.

परिपक्व आम्रफलामध्यें ज्या कीटकाचा जन्म होतो, ज्याला रसान्वेषणाची कधींही अपेक्षा नाहीं, हळूहळू रसास्वाद घेण्याचें ज्याला कारण पडलें नाहीं

अशा भ्रमराला वसंतसमयीं विकसित पुष्पवनामध्यें सोडून दिला असतां अर्ध-विकसित गुलाबकलिकेच्या भोंवतीं तो घिरट्या घालतो. अशा रीतीनें जो सौरभ लाभ, जो मधुर आस्वाद त्याचा तो केवढा उन्माद !

पहिल्या पहिल्यांदा निवारणबाबू कधीं कधीं गाउन घातलेली कांचेची बाहुली, कधीं अत्तराची बाटली, कधीं पेढे बरफी, विकत आणून शैलबालेला कोणाच्या न कळत देत. अशा रीतीनें परिचयाची दृढता होत गेली. शेवटीं एके दिवशीं हरसुंदरीला सवड सापडतांच दाराच्या छिद्रांतून पाहिलें तों निवारण-बाबू व शैलबाला कवड्यांनीं दहा, पंचवीस करून खेळत होतीं.

वृद्धपणाला शोभण्याजोगा खरोखर हाच खेळ ! कधीं कधीं निवारणबाबू जेवण आटपून ऑफिसांत न जातां अंतःपुरांत प्रवेश करीत. ह्या प्रवंचनेची काय आवश्यकता ! हरसुंदरीचे एखाद्या वज्रशलाकेनें उघडावेत तसे डोळे उघडले. तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

हरसुंदरी मनांतल्या मनांत म्हणाली—मीच हिला घरांत आणली ! मीच हा योग आणला ! माझ्याशीं हा व्यवहार कां ! जणूं काय मी हिच्या सुखाच्या आड येतें !

हरसुंदरी शैलबालेला घरांतलें कामकाज शिकवी. एक दिवस निवारणबाबू म्हणाले—लहान पोर ती ! तिला इतके श्रम कशाला करायला लावतेस ? ती कांहीं शरीरानें घट्टीकट्टी नाहीं.

चांगलें झोंबेल असें उत्तर तिच्या तोंडावर आलें होतें, पण ती मुकाट्यानें बसली. कांहींच बोलली नाहीं.

तेव्हांपासून शैलबालेला घरांतल्या कोणच्याच कामाला ती हात लावून देत नाहींशी झाली. स्वयंपाक, पाणी, विणणें, टिपणें सर्व आपण आपलें स्वतः करी; असें झालें कीं शैलबालेला जागचें हलायला सुद्धां नको. हरसुंदरी एखाद्या दासीप्रमाणें तिची सेवा करी व नवरा एखाद्या विदूषकाप्रमाणें तिचें मनोरंजन करी. संसारांतील कामकाज, दुसऱ्याची सेवा हें आयुष्यांतील कर्तव्य हें सुद्धां ती विसरून गेली.

हरसुंदरी जें मुकाट्यानें एखाद्या दासीप्रमाणें काम करूं लागली त्याबद्दल तिला अभिमान वाटत असे. तिला त्यांत कमीपणा किंवा दीनता वाटेना. जणूं काय तिनें म्हणावें "तुम्ही मुलेंमुलें खेळा, प्रपंचाचा सर्व बोजा मी संभाळतें."

## तृतीय परिच्छेद

ज्या जोरानें हरसुंदरी मनांत म्हणे कीं प्रेमाचा अर्धा अधिक हक्क आपल्या पतीकरितां मी कायमचा खुशीनें सोडून देण्यास तयार आहें तो जोर आज नाहीं. जीवनसमुद्राला पौर्णिमेची भरती येऊन मन मर्यादा उल्लंघून विस्तार पावतें त्या वेळीं त्याला वाटूं लागतें 'मला सीमाच नाहीं.' व त्या वेळीं जी एखादी दुर्घट प्रतिज्ञा करून बसतें ती, आयुष्यांतील ओहोटीच्या समयीं रक्षण करण्याकरितां त्याची अत्यंत ओढाताण होते. एकाएकीं ऐश्वर्याच्या भरांत लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं जें दानपत्र लिहून दिलें जातें, तें आपत्कालीं पुरें पाडण्याकरितां जीव तिळतिळ तुटूं लागतो. त्या वेळीं समजूं लागतें कीं मनुष्य किती दीन, हृदय किती दुर्बळ, त्याची शक्ती अत्यंत अल्प.

फार दिवसांच्या दुखण्यानें क्षीण, रक्तहीन, पांडुवर्णा हरसुंदरी शुक्लपक्षांतील द्वितीयेच्या चंद्राप्रमाणें रेखामात्र असतां संसारांत लघुकार्यालाही अक्षमसी भासत होती. तिच्या मनाला वाटलें कीं, "मी आहें आणि नाहीं सारखीच." हळूहळू अंगांत शक्ति आली, तेज वाढूं लागलें, तसें तिचा इंद्रियगण जबूं काय तिला म्हणूं लागला "तूं तर त्यागपत्र लिहून दिलेंस, पण आमचा अधिकार आम्ही सोडणार नाहीं."

हरसुंदरीला जे दिवशीं परिस्थिती स्पष्टपणें कळली ते दिवशीं ती निवारण व शैलबालेला सोडून आपण दुसरीकडे जाऊन निजली. आठ वर्षांची असतांना ज्या शय्येवर प्रथम शयन केलें, त्या शय्येचा आज सत्तावीस वर्षांनंतर तिनें त्याग केला. दिवा मालवून ही सधवा रमणी ज्या वेळीं असह्य हृदयभार घेऊन आपल्या नूतन वैधव्यशय्येवर येऊन पडली, त्या वेळीं गल्लीच्या एका टोकाला एकजण हौसी युवक बिहाग रागामध्यें "मालिनीगीत" गात होता,

एकजण डग्गातबल्यानें साथ करीत होता व श्रोतृगण समेवर ‘ वाहवा वाहवा ’ म्हणून शब्द करीत होता.

त्याचें तेंच गाणें त्या शांत चांदण्याराञीं शेजारच्या खोलींत कांहीं कमी ऐकू जात नव्हतें. त्या वेळीं झोपेनें शैलबालेचे डोळे मिटूं लागले होते व निवारणबाबू तिच्या कानाशीं तोंड नेऊन हळू ‘ सइ ’ म्हणून हाक मारीत होते.

निवारणबाबूंनीं बंकिमबाबूंचें चंद्रशेखर संपवून एकदोन आधुनिक कवींची कविता शैलबालेला वाचून दाखविली होती.

निवारणबाबूंच्या जीवितामध्यें अत्यंत खोल जो एक यौवननिर्झर दडपून गेला होता तो आघात पावतांच अगदीं अकालीं उसळून उठला. त्याचा आवेग सहन करण्यास आधींपासून तयारी नसल्यामुळें त्यांची अक्कल, हुषारी, संसारांतील एकंदर व्यवस्था उलटपलट होऊन गेली. त्या बिचाऱ्याला कधींच ठाऊक नाहीं कीं मनुष्यामध्यें अशा प्रकारचा उपद्रवजनक पदार्थ असतो व त्याची अशी दुर्दम्य विलक्षण शक्ती असते कीं ज्याच्यामुळें बुद्धिमत्ता, विचार, बंधनें, सामंजस्य सर्वतोपरी विस्खलित होऊन जातात.

केवळ निवारणबाबूच नव्हे, तर हरसुंदरीलाही नवीन वेदनेचा अनुभव येऊं लागला. ही कशाबद्दल आकांक्षा, ही कशाबद्दल दुःसह यंत्रणा ! आज तिच्या मनाला जें हवेंसें वाटत आहे तें कधींही हवेंसें वाटलें नव्हतें कां कधीं प्राप्त झालें नव्हतें. जे समयीं निवारणबाबू भलेपणानें नेमानें ऑफिसांत जात, जेव्हां निजायच्या आधीं थोडा वेळ गवळ्याचा हिशोब, जिनसांची महागाई, लौकिकासंबंधीं कर्तव्य वगैरे गोष्टींबद्दल विवेचना होत असे, त्या वेळीं ह्या गृहदाहाची नांवनिशाणी देखील नव्हती. त्यांचें प्रेम खचित होतें परंतु त्या प्रेमाला प्रकाश, किंवा ज्वाला नव्हती. तें प्रेम ज्वालाहीन अग्नीप्रमाणें होतें.

आज हरसुंदरीला वाटलें कीं जन्माच्या साफल्यापासून आपण कायमची वंचित झालों. तिचें हृदय जणूं काय फार दिवसांचें उपाशी आहे. तिला वाटूं लागलें, आपला स्त्रीजन्म आपण मोठ्या दारिद्र्यांत कंठिला, आपण वयाचीं सदतीस अडतीस अमूल्य वर्षें, केरवारा, विणणें टिपणें, स्वयंपाक पाणी ह्या

जंजाळांत एखाद्या मोलकरणीसारखीं घालविलीं. आज आयुष्यपथाच्या मध्य-भागीं आल्यावर पहाते तों आपल्या शयनगृहाच्या पार्श्वभागीं एका गुप्त ऐश्वर्य-भांडाराचें कुलूप तोडून एक क्षुद्र बालिका मालकीण होऊन बसलेली. स्त्री ही दासी खरी पण त्याचबरोबर ती राणीही खरीच. श्रमविभागतत्त्वानें एक स्त्री दासी झाली व दुसरी राणी झाली. पण ह्या विनिमयांत दासीचा गौरव नाहींसा झाला व राणीचें सुख नष्ट झालें.

कारण शैलबालेला स्त्रीजीवनाच्या यथार्थ सुखाचा स्वाद अनुभवितां आला नाहीं. इतका अविश्रांत आदर होत गेल्यामुळें तिला दुसऱ्यावर प्रीति करण्याला क्षणभरसुद्धां सवड मिळाली नाहीं. नदीनें समुद्राकडे वहात जाऊन समुद्रामध्यें आत्मविसर्जन करण्यांत नदीच्या जीवनाचें साफल्य आहे ही गोष्ट खरी, परंतु समुद्र जर भरतीच्या जोरानें नदीमुखानें आकृष्ट होऊन राहील तर नदी केवळ आपल्या ठिकाणीं फुगून राहील. संसार आपला समस्त आदर सौभाग्य घेऊन रात्रंदिवस शैलबालेकडे वाहूं लागल्यामुळें शैलबालेचा अभिमान अत्यंत उत्तुंग होऊं लागला. त्यामुळें संसाराकडे तिचें प्रेम आकृष्ट होईना. तिला वाटूं लागलें कीं माझ्याकरितां हे समस्त व मी मात्र कोणाकरितां नाहीं. ह्या अवस्थेमध्यें अहंकार यथेष्ट असतो, पण परितृप्ति मात्र नसते.

## -- चतुर्थ परिच्छेद --

एके दिवशीं आकाशांत इतके घनघोर मेघ पसरले व इतका अंधकार पडला कीं घरांत कामकाज करणें मुष्कील झालें. बाहेर पावसाच्या सरीवर सरी. बोरीच्या झाडाखालील वेल, झुडपांचें जंगल पाण्यांत बहुतेक डुबून गेलें व भिंतीजव-ळचा नाला गढूळ पाण्यानें भरून जाऊन कलकल शब्द करीत वहात चालला होता. हरसुंदरी आपल्या नवीन निर्जन अंधकारमय शयनगृहांतील खिडकीजवळ स्वस्थ बसली होती.

अशा वेळीं निबारणबाबू हळूहळू चोरासारखे येऊन दारापाशीं उभे राहिले, पुढें सरकावें कीं परत फिरावें हें सुचेना. अशा स्थितींत हरसुंदरीनें त्यांना बघितलें पण एक शब्दही बोलली नाहीं.

निवारणबाबू घाइघाईनें हरसुंदरीजवळ जाऊन म्हणाले—" एकाद दुसरा दागिना पाहिजे होता. तुला ठाऊकच आहे किती देणें झालें आहे तें. देणेदार फार अपमान करीत आहेत. कांहीं तारण दिलें पाहिजे—लवकरच सोडवितां येईल."

हरसुंदरीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. निवारणबाबू चोरासारखे उभे राहिले. शेवटीं पुन्हा एकदां म्हणाले—"तर मग आज नाहीं होण्यासारखें ?"—हरसुंदरी म्हणाली " नाहीं. "

खोलींत शिरतांना जितकें अवघड वाटलें तितकेंच कठीण परत फिरणें वाटलें. निवारणबाबू हिकडे तिकडे बघून म्हणाले—" दुसरें कांहीं बघतों,"—म्हणून प्रस्थान केलें.

कुठलें कर्ज आन् कुठें दागिना गहाण ठेवणार तें हरसुंदरीनें सर्व कांहीं ओळखलें. तिनें ओळखिलें कीं गेल्या रात्रीं ह्या बुद्धिहीन स्त्रीलंपटाला नवी बायको मोठ्या झणकाऱ्यानें म्हणाली होती, "दिदीपाशीं दागिन्यांनीं पेटी भरली आहे, आन् मला त्यांतलें कांहीं नाहीं !"

निवारणबाबू गेल्यावर हळूहळू उठून लांखंडी पेटी उघडून एकेक एकेक करतां सर्व दागिने बाहेर काढिले. शैलबालेला बोलावून आणून प्रथम आपला बनारशी शालू तिला नेसविला. नंतर आपादमस्तक सबंध शरीर दागिन्यांनीं भरलें, चांगला अंबाडा बांधला व दिवा लावून तोंडाकडे निरखून पाहिलें. तिचें मुख एखाद्या मध्यःपक्व सुगंधी फळाप्रमाणें वर्तुळाकार रसपूर्ण असें दिसूं लागलें. शैलबाला जो झणझण शब्द करीत गेली तो बहुत कालपर्यंत हरसुंदरीच्या रक्तस्नायूंमध्यें झोंबत होता. मनांतल्यामनांत म्हणाली " आज तिची माझी थोडीच बरोबरी आहे? मी तिच्या एवढी होतें तेव्हां मीही अशीच यौवनानें नखशिखांत मुसमुसलेली होतें. पण मला त्या वेळीं ह्या गोष्टीची खबर कशी कोणी कधींच दिली नाहीं ! तो दिवस कधीं आला व कधीं गेला तें ठाऊक सुद्धां पडलें नाहीं. शैलबाला पहा कशी नटत मुरडत गर्वानें थाटानें चालली आहे. "

हरसुंदरी ज्या वेळीं संसार हेंच काय तें सर्व समजत होती त्या वेळीं दागिने तिला मोठे मूल्यवान् वाटत ! त्या वेळीं एखाद्या निर्बुद्ध स्त्रीप्रमाणें हे सर्व दागिने तिनें अशा रीतीनें एका क्षणांत हातचे घालविले असते ? आज संसाराव्यतिरिक्त आणखी कांहीं आहे ह्या गोष्टीचें ज्ञान तिला झालें होतें. आज दागिन्यांचें मोल भविष्यकालीन विचारांपुढें तुच्छ वाटूं लागलें होतें.

शैलबाला सोन्यामोत्यांच्या झोंकांत शयनगृहाकडे निघून गेली. क्षणभर सुद्धां मनांत आलें नाहीं कीं हरसुंदरीनें आज मला किती दिलें. ती समजत होती कीं चोंहोंकडून समस्त सेवा, समस्त संपत्ति, समस्त सौभाग्य स्वाभाविकपणेंच आपल्यामध्यें परिसमाप्त झालें पाहिजे, कारण ती पडली पट्टराणी व हरसुंदरी तिची दासी.

## — पंचम परिच्छेद —

कोणी कोणी स्वप्नावस्थेमध्यें मोठ्या संकटाच्या मार्गांतून अगदीं निर्भयपणें पार निघून जातात, क्षणमात्र चिंता त्यांना वाटत नाहीं. कित्येक मनुष्यांची जागेपणींही दीर्घस्वप्नाप्रमाणें अवस्था असते. यत्किंचित्‌ही ज्ञान नसतें. विपत्तीच्या संकीर्ण मार्गांतून निश्चिंत मनानें पुढें जात असतात. शेवटीं घोर सर्वनाशाप्रत पोंचल्यावर जागे होतात.

आमच्या मॅकमोरन कंपनीच्या हेडक्लार्कबाबूंची हीच अवस्था. शैलबाला त्यांच्या जीवनौघामध्यें एखाद्या प्रबल आवर्ताप्रमाणें घूर्णमान होऊं लागली, एवं दूर दूरचे विविध महार्घ पदार्थ आकृष्ट होऊन तिजमध्यें विलुप्त होऊं लागले. केवळ निवारणबाबूंचें मनुष्यत्व, त्यांचें मासिक वेतन, हरसुंदरीचें सुखसौभाग्य, वस्त्राभरण येवढेंच नव्हे तर त्याच्याच बरोबर मॅकमोरन कंपनीची रोकड शिल्लकही गुप्तरूपानें आकृष्ट होऊं लागली. रोकडींमधून एकेक दोन दोन तोडे अदृश्य होऊं लागले. निवारणबाबू मनांत निश्चय करीत कीं येत्या महिन्याच्या पगारांतून हळू हळू भरती करून देऊं. परंतु महिन्याचा पगार हातीं येण्याचा अवकाश कीं त्या आवर्तानें आकर्षित केलाच. शेवटीं चवलीपावलीपर्यंत बघतां बघतां विद्युद्वेगानें अंतर्हित होऊं लागली.

शेवटीं एक दिवस निवारणबाबू पकडले गेले. वंशपरंपरेची नोकरी, साहेब दयाळू, रोकड पुरती करण्याकरितां दोन दिवसांची सवड दिली.

कशा रीतीनें हळूहळू अडीच हजारांची शिल्लक तुटूं लागली तें निवारणबाबूंना स्वतःलाच समजेना. एकाएकीं भांबावून जाऊन हरसुंदरीजवळ जाऊन म्हणाले–" सर्वस्वीं घात झाला."

हरसुंदरी सर्व हकीकत ऐकतांच पांढरी पडली.

निवारणबाबू म्हणाले– दागिने लवकर बाहेर काढ.

हरसुंदरी म्हणाली–ते तर मी सगळे धाकटीला दिले.

निवारणबाबू अगदीं एखाद्या मुलासारखे अधीर होऊन बोलूं लागले–कां दिलेस धाकटीला ? कां दिलेस ? कोणी तुला द्यायला सांगितलें ?

हरसुंदरी प्रकृत प्रश्नांचीं उत्तर न देतां म्हणाली–दिले म्हणून काय झालें ? ते कुठे पाण्यांत तर नाहीं गेले ?

भ्याड निवारण कातरस्वरानें म्हणाला–तर मग तुला कांहींतरी सबबीवर तिच्याकडून काढून घेतां येतील ? पण तुला माझ्या गळ्याची शपथ मला हवे आहेत म्हणून सांगशील तर ! नाहीं तर सांगशील कशाला हवे आहेत म्हणून !

या वेळीं हरसुंदरी मर्मभेदक विरक्ती व निर्भर्त्सनेनें म्हणाली–ही का लपवून छपवून ठेवावयाची कां प्रेम दाखवावयाची वेळ ? चला बघू–असें म्हणून नवऱ्याला घेऊन धाकट्या बायकोच्या खोलींत गेली.

धाकट्या बायकोनें एक गोष्ट ऐकून घेतली नाहीं. सगळ्या गोष्टींना तिनें एक उत्तर दिलें–तें नाहीं मला कांहीं समजत.

संसारांत कोणत्याही प्रकारची चिंता कधीं तिला करावी लागेल ही गोष्ट तिला कधीं कोणी सांगितली तरी होती ? ज्यांनीं आपापली काळजी करावी पण सगळ्यांनीं मात्र तिच्या सुखाची काळजी वहावी. एकाएकीं ह्याचा व्यतिक्रम होणें म्हणजे केवढा अन्याय ?

त्या समयीं निवारणबाबू शैलबालेचे पाय धरून रडूं लागले. शैलबाला येवढेंच म्हणाली–तें नाहीं मला समजत, माझा जिन्नस मी कां देईन ?

निवारणबाबूंनीं पाहिलें कीं ही दुर्बल लहानशी सुंदर सुकुमार बालिका लोखंडी पेटीहूनही अधिक कठीण. अशा संकटसमयीं नवऱ्याची ही दुर्बलता पाहून हरसुंदरीला तिटकारा आला, ती शैलबालेपासून किल्ल्या हिसकावून घेऊं लागली. शैलबालेनें किल्ल्यांचा जुडगा भिंतीवरून लांब तळ्यांत फेकून दिला.

हरसुंदरी हताश झालेल्या नवऱ्याला म्हणाली—बघतां काय ? कुलूप तोडा.

शैलबाला मोठ्या गंभीर स्वरानें म्हणाली—तसें झालें तर मी गळ्याला फांस लावून जीव देईन.

निवारण म्हणाले—मी दुसरें कांहीं तरी बघतों.— इतकें म्हणून गबाळ पोषाखानिशीं तसेच बाहेर पडले.

निवारणबाबू दोन तासांच्या आंत वडलोपार्जित घर अडीच हजाराला विकून आले.

मोठ्या संकटानें हातांत बेड्या पडायच्या वाचल्या पण चाकरी गेली. स्थावर-जंगमापैकीं दोन स्त्रिया मात्र शिल्लक राहिल्या. त्यांपैकीं क्लेशकातर बालिका स्त्री गर्भवती असल्यामुळें नितांत स्थावर होऊन पडली. गल्लींत एका लहानशा ओल असलेल्या घरांत निवारणबाबू सहपरिवार येऊन राहिले.

## — षष्ठ परिच्छेद —

धाकट्या बायकोच्या असंतोषाला आणि दुःखाला पारावार नाहीं. आपल्या नवऱ्याला ऐपत नाहीं ही गोष्ट समजून घेण्याची तिची इच्छाच नव्हती. ऐपत नव्हती तर लग्न कशाला केलें ?

माडीवर काय त्या दोनच खोल्या. एका खोलींत निवारण व शैलबाला निजत. दुसऱ्या खोलींत हरसुंदरी असे. शैलबाला पुटपुटत म्हणे—रात्रंदिवस ह्या निजायच्या खोलींत बसून कसे काढायचे ते ?

निवारणबाबू मिथ्या आश्वासन देऊन म्हणत—मी आणखी एखाद्या चांगल्या घराच्या शोधांत आहें, लवकरच आपण घर बदलूं.

शैलबाला म्हणे—तें कां, हें तर जवळ एक घर आहे.

शैलबाला तिच्या पहिल्या शेजारणीकडे कधीं ढुंकून पहात नसे. निवारण-बाबूंची सांप्रतची दैन्यावस्था पाहून ते एके दिवशीं भेटायला आले. शैलबाला दाराला आंतून कडी लावून घेऊन बसून राहिली. कांहीं केल्या दार उघडीना. ती मंडळी निघून गेल्यावर रागावली, रडली, उपास केला, हिस्टेरिआनें पडली; घरदार डोक्यावर घेतलें. हा गोंधळ वरचेवर होऊं लागला.

शेवटीं शैलबाला शारीरिक आपत्तींत पडून फार त्रास झाला. येथपर्यंत कीं गर्भपात होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं.

निवारणबाबू हरसुंदरीला हात जोडून म्हणाले—" तूं येवढी शैलाला वांचीव!" हरसुंदरी रात्र नाहीं दिवस नाहीं शैलबालाची सेवा करूं लागली. यत्किंचित् कमी पडलें कीं शैल तिला कटु शब्दांनीं बोले, पण तिनें कधीं उत्तर सुद्धां देऊं नये.

शैल कांहीं केल्या साबूदाण्याची कांजी खाईना, वाटी घेऊन फेकून द्यावी. ताप अंगांत असतांना देखील आंब्याचें पन्हें आन भात मागे. नाहीं दिलें कीं रागावावें, रडावें, असा अनर्थ करावा. हरसुंदरीनें म्हणावें " माझी बाई कशी, माझी ताई, माझी छकुली " अशा रीतीनें लहान मुलासारख्या विनवण्या करी.

इतकेंही करून शैलबाला वांचली नाहीं. संसारांतील समस्त प्रेम आदराचा अनुभव घेऊन मोठ्या दुःखांत व असंतोषांत तिचें क्षुद्र, असंपूर्ण व्यर्थ जीवन नष्ट झालें.

## — सप्तम परिच्छेद —

निवारणबाबूंना प्रथम मोठा धक्का बसला. लागलीच, आपण एका मोठ्या पाशांतून मुक्त झालों असेंही वाटलें. दुःखामध्येंही आपल्या मुक्ततेच्या आनंदाचा अनुभव झाला. एकाएकीं मनांत आलें कीं आपल्या मनावर इतके दिवस एका दुःस्वप्नाचें दडपण पडलें होतें. जागें होऊन एका क्षणांत जीव हलका पडला. माधवीलतेप्रमाणें कोमल हा जो जीवनपाश तुटून गेला, तीच का आपली आदरणीय शैलबाला ? एकदम दीर्घ श्वास सोडून पाहिलें—छे, तो तर आपला गळफांस !

निवारणबाबूंच्या मनांत आलें कीं आपली चिरकालिन सहचरी हरसुंदरी! त्यांच्या दृष्टीस पडलें कीं तीच एकाकिनी आपल्या संसाराधिकाररूढ. तीच आपल्या जीवितांतील समस्त सुखदुःखात्मक-स्मृतिमंदिरामध्यें विराजमान. तथापि मध्यें एक आवरण. जणूं काय एखाद्या क्षुद्र, उज्वळ, सुंदर, निष्ठुर अशी सुरी येऊन हृत्पिंडाच्या वाम व दक्षिण भागांचे मधोमध एक वेदनामय विदारण रेषा ओढून गेली आहे.

एके दिवशीं गंभीर रात्रीं समस्त शहर निद्रावश झालें असतांना निवारण-बाबूंनीं हरसुंदरीचे शयनगृहांत मंद गतीनें प्रवेश केला, व मुकाट्यानें पूर्ववत् त्या पुरातन शय्येच्या दक्षिणभागीं शयन केलें. परंतु आज त्या चिराधिकृत शय्येवर चोरासारखा प्रवेश करावा लागला.

हरसुंदरी कांहींच बोलली नाहीं. निवारणबाबूंच्यानेंहि कांहीं बोलवलें नाहीं. पूर्वीं ज्याप्रमाणें शेजशेजारीं शयन करीत तसेंच आजही शेजशेजारींच निजले. पण दोघांच्या मध्यें एक मृत बालिका निद्रित होती तिचें उल्लंघन कोणालाही करितां आलें नाहीं.

  

* * * गोष्टींतील कथाभाग अत्यंत सामान्य असतांही वाचकांचें मन आकर्षित झाल्यावांचून राहणार नाहीं इतक्या कुशलतेनें या कथेची मांडणी झाली आहे. पाहूं गेलें असतां कथानायक म्हणजे एक कारकून, कथाभाग म्हणजे त्याचीं दोन लग्नें व दुसऱ्या बायकोच्या पाशांत गुंतून त्यानें आपली नोकरी गमावली. तथापि कोणाहि मार्मिक वाचकाला दिसून येईल कीं अथपासून इतिपर्यंत एकहि शब्द निष्कारण वापरला गेलेला नाहीं. ज्यांनीं रविबाबूंचे गहन तात्त्विक ग्रंथ वाचले असतील त्यांना रविबाबूंचा स्त्रीस्वभावाशीं असलेला परिचय पाहून आश्चर्यच वाटेल. रविबाबूंच्या कवित्वाचा परिचय वाचकाला त्यांच्या कथारूपी गद्य रचनेंतही पदोपदीं होण्यासारखा आहे. उदाहरणें;

ग्रीष्मऋतूंत ज्याप्रमाणें प्रवाहाचा वेग मंद होऊन क्षुद्र ग्रामनदी इ०......
त्याचा खरा अर्थ तिला पूर्णपणें समजला नाहीं.

" हरसुंदरीनें सुकाणू सोडून देतांच निवारणबाबू स्वयंकर्णधार झाले.

एखादा हिरा हातीं आला असतां नाना प्रकारें......

" जीवनसमुद्राला पौर्णिमेची भरती येऊन इ०......

" निवारणबाबूंच्या जीवितामध्यें अत्यंत खोल जो एक यौवननिर्झर दडपून गेला होता तो आघात पावतांच अगदीं अकालीं उसळून उठला. "



# १०. फळ तेंच



पुच्छ आणि मुख, राहू आणि केतू हीं जशीं एकाच धडाचीं दोन आंगें पण परस्पर भिन्न भिन्न दिशेकडे बघणारीं तद्वतच ह्यांचा संबंध होता.

हालदारांचें जुनें घराणें, पण आज त्यांच्या वांटण्या होऊन राहत्या वाड्यांत मधोमध भिंत पडली. एकाचें तोंड एकीकडे, दुसऱ्याचें दुसरीकडे. एकमेकांत संभाषण तर दूरच राहिलें.

नवगोपाळबाबूंचा मुलगा नलिन व ननीगोपाळाचा नंद. दोघेही एका घरचे, एका वयाचे, एका शाळेंत जाणारे. पारिवारिक विद्वेष व स्पर्धा ह्यांमध्यें दोघांत संपूर्ण ऐक्य.

नलीनचे वडील नवगोपाळ अत्यंत कडक, मुलाला दम पडूं देत नसत, लिहिण्यावाचण्याखेरीज दुसरी गोष्ट नाहीं. खेळ, खाद्य, छानछोकीसंबंधीं मुलाची सर्व हौस त्यांनीं बुकें आणि वह्या ह्यांच्या खालीं दडपून ठेविली होती.

नंदाचे वडील ननीगोपाळ यांची शासनपद्धति अत्यंत शिथिल. आई त्याला नटवून सजवून शाळेंत पाठवी, दोन तीन आणे खायला घेण्याकरितां देई. नंदानें मिठाई, कुलपी मलाई, भोंवरा, गोट्या, इच्छेस येईल तें घ्यावें. भोगविलासांमध्यें त्याला यश मिळत गेलें.

नलीन मनांतल्या मनांत पराभव स्वीकार करून म्हणे नंदाचे बाबा आमच्या बाबांचे जागीं व आमचे वडील त्याच्या वडलांचे ठिकाणीं असते तर नंदाला दाखाविली असती कशी काय मौज आहे ती.

पण तो योग येण्यापूर्वी नंदाला दर वर्षी बक्षीस मिळत गेलें. नलीन रिक्त हस्तें घरीं येऊन शाळेच्या चालकांना पक्षपाताचा दोष देऊं लागला. बापानें त्याला दुसऱ्या शाळेंत घातलें. घरीं दुसरा मास्तर ठेवला. झोंपेच्या वेळांतला एक तास कमी करून अभ्यासाचा वेळ वाढविला. पण फळ तेंन् तेंच. नंद

पास होतां होतां बी. ए. झाला. नलीन फेल होतां होतां एन्ट्रन्स क्लासांत जाऊन कळीच्या उंदरासारखा अडकून पडला.

त्या समयीं वडलांनीं त्याच्यावर दया केली. त्यांचा देहांत झाला. तीन वर्षे मॅट्रिकचे वर्गांत काढल्यानंतर त्याची सुटका झाली. स्वाधीनता आल्याबरोबर आंगठी, सोन्याचीं बटणें, घड्याळाची साखळी वगैरे भूषणांनीं नखशिखांत नटून जाऊन नंदाला निष्प्रभ करून टाकण्याची चेष्टा करूं लागला. फेल एन्ट्रन्स झालेल्याची गाडीजोडी बी. ए. पासाच्या एका घोड्याच्या गाडीला सहज मागें टाकूं लागली. विश्वविद्यालयाची डिग्री वेलर घोड्याच्या चालीनें चालूं शकेना.

हिकडे नलीन व नंद दोघाकरितां मुली पहाण्याचें काम चालूं होतें. नलीनची प्रतिज्ञा कीं, अशा मुलीशीं लग्न करीन कीं, तिच्या तडीला दुसरी मुलगी लागणार नाहीं व त्याची जोडी व त्याची बायको ह्या बाबतींत नंदाला हार मानावी लागेल.

सगळ्यांत चांगली करण्याची ज्याची आकांक्षा त्याला पुष्कळ चांगल्या मुली टाकाव्या लागल्या. सरासरी एकादी मुलगी पसंत करून प्रकरण संपविण्याचें त्याचें साहस होईना, न जाणो आणखी एखादी चांगली मुलगी दुसऱ्याच्या गळ्यांत पडेल.

शेवटीं त्याला बातमी लागली कीं, रावळपिंडीस राहणाऱ्या एका बंगाली गृहस्थाची परम सुंदर कन्या आहे. जवळच्या रूपवती मुलींपेक्षां दूरची मुलगी अधिक सुंदर भासावी हा मनाचा धर्म आहे! नलीन अगदीं वेडा झाला. वाटखर्ची, कागदपत्र देऊन मुलीला कलकत्त्यास आणिली. मुलगी खरोखरच सुंदर. नलीन म्हणाला ‘ कोणी कांहीं कां करीना. सहजासहजीं रावळपिंडीची मुलगी हातची जाईल असा संभव नाहीं. पुन्हां दुसऱ्या कोणाला असें तर म्हणतां येणार नाहीं कीं, मुलगी आम्हीं प्रथम पाहिली होती, पसंत नव्हती म्हणून संबंध केला नाहीं. ’

गोष्ट जवळजवळ ठरल्यासारखी झाली. याद्या, करारपत्र तयार होणार. या सुमारास एक दिवस प्रातःकाळीं ननीगोपाळच्या घरामधून निरानिराळीं झांकलेलीं ताटें घेऊन दासींचे पथक बाहेर पडतांना दिसलें.

नलीन म्हणाला---बघून तर ये हा काय प्रकार आहे तो ! नोकरानें खबर आणिली कीं, नंदाच्या लग्नाच्या वाङ्निश्चयाची तयारी चालली आहे.

नलीन तत्क्षणीं गुडगुडी ओढण्याची बंद ठेवून चकीत होऊन उठून बसला व म्हणाला–खबर काढलीच पाहिजे.

तत्क्षणीं भाड्याच्या गाड्या करून दूत धांवले. बिपिन हाजरानें परत येऊन कळविलें कीं, कलकत्त्याची मुलगी ठरली आहे. पण मुलगी चांगली.

नलीनची छाती दडपून गेली. म्हणाला—काय म्हणतोस ?

हाजरा येवढेंच म्हणाला--खाशी मुलगी !

नलीन म्हणाला--ती तर पाहिली पाहिजे !

पारिशद म्हणाला--त्यांत कठीण काय आहे ? तर्जनी व आंगठ्यानें रुपये वाजवून दाखविण्याचा भाव केला.

सुयोगानें नलीननें मुलगी पाहिली. जों जों मनांत येई कीं ही मुलगी नंदाकरितां ठरली आहे तों तों मनांत येई कीं रावळपिंडीच्या मुलीपेक्षां ही चांगली दिसते. मन द्विधा होऊन नलिननें पारिषद्‌ला विचारलें--कशी काय दिसते मुलगी ?

हाजरा--आज्ञा, आमच्या दृष्टीला तर चांगली दिसते.

नलीन म्हणाला—ती चांगली कां ही चांगली ?

हाजरा म्हणाला—हीच चांगली.

नलीनला वाटूं लागलें हिच्या डोळयांच्या पापण्या तिच्यापेक्षां अधिक व लांब. तिचा रंग हिच्यापेक्षां किंचित् कमी. हिचा गौरवर्ण जणूं हळदींत सोन्याची झांक. हिला हातची घालवितां कामा नये.

नलीन विषण्ण होऊन गुडगुडी ओढीत ओढीत म्हणाला—कारे हाजरा, काय करायचें बोल तर ?

हाजरा म्हणाला—महाराज, कठीण काय ? पुनः आंगठा व तर्जनीनें काल्पनिक रुपये वाजवून दाखविलें.

रुपये ज्या वेळेला खरोखरच वाजले तेव्हां यथोचित फळ होण्यास विलंब लागला नाहीं. मुलीच्या बापानें कांहीं तरी सबबीवर मुलाच्या बापापाशीं भांडण काढलें. वराचे वडील म्हणाले—तुमच्या मुलीबरोबर मुलाचें लग्न करीन तर—........व मुलीचा बाप आणखी एक मात्रा वाढवून म्हणाला—तुमच्या मुलाबरोबर मुलीचा विवाह करीन तर...इत्यादि...

यानंतर अधिक विलंब न करितां नंदाच्या हातावर तुरी देऊन नलीननें शुभमुहूर्तावर शुभ लग्न उरकून घेतलें. हांसत हांसत हाजराला म्हणाला—'बी. ए. पास तर ह्याला म्हणतात! कां रे हाजरा? ह्या वेळेला आमच्या त्या घरचे बडे बाबू फेल!'

थोड्याच दिवसानंतर ननीगोपाळच्या वाड्यांत सनई वाजंत्री वाजूं लागलें. नंदाच्या अंगाला हळद.

नलीन म्हणाला—अरे हाजरा, खबर तर काढ मुलगी कुठली.

हाजरानें येऊन बातमी दिली कीं वधू तीच रावळपिंडीची मुलगी.

रावळपिंडीची मुलगी! हाः हाः हाः नलीन अतिशय हासूं लागला. कां रे, त्या वाड्यांतल्या बड्या बाबूंना आणखी एखादी मुलगी नाहीं मिळाली? आम्ही नाकारलेल्या मुलीशीं लग्न करीताहेत! हाजराही खूप हांसला.

परंतु उत्तरोत्तर नलीनच्या हांसण्यांत जोर राहिला नाहीं. त्याच्या हांसण्याला जणूं कीड लागली, तीव्र संशय त्याच्या कानांत गुणगुण करूं लागला. "आहारे, हातचें घालविलेस! शेवटीं नंदाच्या कपाळीं पडली. तो संशय क्रमानें मोठा होत गेला—त्याचा कंठस्वरही मोठा झाला—तो म्हणाला आतां कांहीं केलें तरी ती तर मिळत नाहीं. आतां आहे हीच खरी! फारच फसलें!

अंतःपुरांत नलीन ज्या वेळीं भोजनास गेला त्या वेळीं स्त्रीचे बारिक सारिक दोष विस्तार पावून त्याचा उपहास करूं लागले.

त्याच्या मनांत येऊं लागलें कीं बायकोनें आपल्याला फारच फसविलें.

रावळपिंडीचा संबंध होण्याचें घाटत होतें तेव्हांचा त्या मुलीचा आलेला फोटो बाहेर काढून नलीन पाहूं लागला. काय हें सौंदर्य! अशी लक्ष्मी हातीं आलेला मी झिटकारून टाकिली! केवढा मी गाढव?

लग्नाच्या दिवशीं रात्रीं दिवे लावून वाजत गाजत गाडींत बसून वराची स्वारी बाहेर पडली. नलिन पडल्या पडल्या गुडगुडींत सांत्वना ओढून घेण्याचा प्रयत्न करीत आहे अशा समयीं हाजरा प्रसन्न मुखानें हांसत हांसत येऊन नंदाला लक्षून परिहास करण्याचा उपक्रम केला.

नलीननें हांक मारिली—पहारेकरी!

हाजरा तटस्थ झाला व पहारेकऱ्याला हांक मारली.

बाबूंनीं हाजराकडे बोट दाखवून म्हटलें—अब्बी इस्को कान पकडके बहार निकाल दो.

   

*** ही लहानशी गोष्ट एकाच कुटुंबांतील व्यक्तींमध्यें द्वेष, स्पर्धा किती असते याचें चित्र आहे व तें पुष्कळांशीं हुबेहूबही आहे.



# ११. हुंडा



पांच मुलांच्या पाठीवर मुलगी झाली म्हणून आईबापांनीं मुलीचें नांव हौसेनें निरुपमा असें ठेविलें. त्यांच्या घरीं असें हौसेचें नांव कधीं कोणी ठेविलें नव्हतें. प्रायः गणेश, कार्तिक, पार्वती, हीं देवतांचींच नांवें प्रचलित होतीं. अलीकडे निरुपमेच्या लग्नाच्या गोष्टी चालत असत ! तिचे वडील रामसुंदर मित्र ह्यांनीं पुष्कळ तपास केला, पण मनांत भरण्याजोगें स्थळ कुठें दिसेना ! शेवटीं रावबहादुरांच्या घराण्यांतील एक मुलगा पसंत केला. रावबहादुरांची वडिलोपार्जित संपत्ति जरी बहुतेक संपुष्टांत आली होती तरी घराणें प्रतिष्ठित होतें हें खरें.

वरपक्षानें दहा हजार हुंडा व शिवाय करणी असा आग्रह धरिला. रामसुंदर कांहीं विचार न करितां तितक्यालाही कबूल झाले. असें स्थळ हातचें घालवितां येत नाहीं.

कुठूनही पैशाची तजवीज होईना. मोडतोड करून इकडून तिकडून तीन चार हजार रुपये झाले तरी सहा सात हजार आणखी हवेत. लग्नाचे दिवस जवळ येऊन ठेपले. शेवटीं लग्नाचा दिवस आला. फारच जास्त व्याज घेऊन एका गृहस्थानें पैसे देण्याचें कबूल केलें. पण वेळेवर ते हातीं येईनात. लग्नमंडपांत एकच गोंधळ माजला. रामसुंदर रावबहादुरांच्या हातीं पायीं पडून म्हणाले " येवढें शुभ कार्य उरकून जाऊं द्या. आम्ही कसेंही करून आपले पैसे ठेवणार नाहीं." रावबहादूर म्हणाले " हुंडा हातांत पडल्यावांचून मुलगा लग्नाला उभा राहणार नाहीं."

ह्या संकटामुळें घरांतील बायका उदासीन झाल्या. ह्या घोर विपत्तीचें मूळ जी अष्टपुत्री नेसलेली, लग्नचुडे घातलेली, कपाळीं मळवट भरलेली नवरी मुलगी ती बिचारी गप्प बसून राहिली. भावी सासूसासऱ्यांबद्दल तिच्या मनांत किती आदर व भक्ति उत्पन्न झाली असेल हें सांगणें नकोच !

इतक्यांत एक सुयोग प्राप्त झाला. नवरा मुलगा वडिलांच्या उलट गेला; वडिलांना म्हणाला "देण्याघेण्याची गोष्ट मला ठाऊक नाहीं, लग्नाला आलों आहोंत, लग्न झालें पाहिजे." वडील दृष्टीस पडेल त्याला सांगूं लागले "पाहिलेंत का आजकालच्या मुलांचें वागणें?" त्यांत एकदोन पंडित होते ते म्हणाले—"शास्त्रशिक्षा, नीतिशिक्षा आजकाल नाहीं त्याचें हें फळ!" आधुनिक शिक्षणाचा विषमय परिणाम आपल्या मुलांवर झालेला पाहून रावबहादूर अगदीं हताश होऊन गेले. झालें, लग्न कसें तरी उरकून गेलें, पण उत्साह कोणालाही नव्हता.

मुलगी सासरीं जाण्यास निघाली तेव्हां बापानें तिला पोटाशीं धरून रडून रडून डोळे लाल करून घेतले. अश्रू देखील येईनात. निरूनें विचारलें "बाबा सासरची मंडळी पुन्हां मला येऊं देणार नाहींत?" रामसुंदर म्हणाला "कां नाहीं येऊं देणार?"

मुलीला भेटण्याकरितां रामसुंदर वरचेवर व्याह्यांचे घरीं जात. पण त्याची कोणीही विचारपूस करीत नसे. नोकरचाकरसुद्धां त्यांचा अपमान करीत! घरालगतच्या सोप्यांत कधीं पांच मिनिटें निरू नजरेस पडली तर पडे, कित्येकदां तिचें दर्शनसुद्धां होत नसे.

नातेवाइकांत होणारा अपमान सहन होईना. रामसुंदरानें निश्चय केला कीं, कसेंही करून हुंड्याचे पैसे दिलेच पाहिजेत. पण जें कर्ज काढिलें होतें त्याचेंच ओझें सहन करणें कठीण झालें होतें; खर्चाची ओढाताण होऊं लागली. कर्जदारांची गांठ पडूं नये म्हणून नाना प्रकारच्या युक्त्या योजाव्या लागत.

इकडे सासरीं मुलीला पावलोंपावलीं टोमणे सोसावे लागत.

आईबापांची निंदा ऐकून दार बंद करून रडत बसणें हा तर तिचा नित्य क्रमच होऊन बसला. विशेषतः सासूचें तोंड कशानेंही बंद होईना. कोणी म्हटलें "आहा काय पण रूप! तुमच्या सुनेचें मुख पाहून डोळे कसे निवतात!" कीं सासूनें झणकाऱ्यानें म्हणावें "काय पण मुलगी—जशा आया तशा मुली."

येथपर्यंत मजल गेली कीं मुलीच्या खाण्यापिण्याची सुद्धां कोणी चवकशी करूं नये. एखाद्या शेजारणीला दया येऊन ती मुलीच्या बाजूनें कांहीं बोलली कीं सासूनें म्हणावें—" अगबाई, तिला कमी कां कांहीं आहे ?" अर्थात् बापानें पुरते पैसे दिले असते तर मुलीला पुरेसें मिळालें असतें. मुलीचा घरांत कांहींच अधिकार नाहीं अशा भावनेनें सर्वजण तिला लेखूं लागले. जणूं काय फसवून घरांत घुसली आहे.

मुलीच्या ह्या अनास्थेची बातमी बापाच्या कानावर गेली असली पाहिजे, म्हणूनच तो आपलें राहतें घरही विकण्याच्या खटपटीला लागला; पण मुलांची अशा प्रकारें आपण उघडीक करीत आहों ही गोष्ट त्यांच्यापासून छपवून ठेवली. मनांत बेत केला कीं घर विकून तेंच पुन्हा भाड्यानें घेऊन राहूं, मरेपर्यंत मुलांना समजूं सुद्धां देणार नाहीं, पण मुलांना ही गोष्ट कळली. सगळेजण रडूं लागले. विशेषतः मोठ्या तीन मुलांना फारच वाईट वाटलें. त्यांचीं लग्नें होऊन मुलें बाळें झालेलीं, त्यांच्यावर मोठाच प्रसंग गुदरला. घर विकण्याचें मागें पडलें.

रामसुंदरनें ठिकठिकाणहून पुष्कळ व्याजानें थोडथोडे पैसे काढले होते. इकडे प्रपंचाचा खर्च चालविणें कठीण होऊं लागलें.

निरूनें बापाच्या चेहऱ्यावरून सर्व स्थिति ओळखली. अकाल वार्धक्यानें पिकलेले केस, निस्तेज मुख, उदासीन मुद्रा, यांवरून त्याचें दैन्य व चिंता स्पष्ट दिसत होती. मुलीचा आपण केलेला अपराध व त्यापासून झालेला पश्चात्ताप मुलीपासून गुप्त राहीना. रामसुंदर व्याह्यांच्या घरीं जाऊन त्यांच्या परवानगीनें मुलीला क्षणभर भेटे तेव्हां त्याचें हृदय फाटून जाई.

आपल्या खिन्नमनस्क बापाची सांत्वना करण्याकरितां तरी कांहीं दिवस माहेरीं जावें म्हणून निरू फारच अधीर झाली होती. बापाचें म्लान वदन पाहून तिच्यानें दूर राहवेना. एक दिवस बापाला म्हणाली—बाबा, एकदां मला घरीं न्या हो !

रामसुंदर "बरें" म्हणून म्हणाला, पण त्याचा काय उपयोग? आपल्या मुलीवरचा बापाचा जो स्वाभाविक हक्क तो जणूं काय हुंड्याच्या पैशाबद्दल गहाण टाकला होता. येथपर्यंत कीं मुलीच्या दर्शनाकरितां देखील भिक्षा मागितल्याप्रमाणें मोठ्या संकोचानें प्रार्थना करावी लागे. कधीं कधीं निराशाही व्हावें; पण बोलावयास तोंड नव्हतें.

मुलीनें घरीं येत्यें म्हणावें व बापानें आणूं नये हें कसें घडणार! व्याह्यांच्या जवळ ही गोष्ट काढण्यापूर्वीं तीन हजार रुपये रामसुंदरनें जमविले, पण त्याला किती हीनता, किती अपमान सोसावा लागला, तो न लिहिणें हेंच बरें.

कांहीं नोटा रुमालांत गुंडाळून उपरण्याच्या पदरांत बांधून रामसुंदर मुलीचे सासरीं गेला. प्रथम हंसत मुखानें त्यानें हल्लींच्या गोष्टी काढल्या. हरकृष्णाच्या घरीं मोठी चोरी झाली होती त्याची साद्यंत हकीकत सांगितली; नवीनमाधव व राधामाधव ह्या दोघा भावांची तुलना करून विद्या, बुद्धि व स्वभाव ह्या बाबतींत राधामाधवाची स्तुति व नवीनमाधवाची निंदा केली. गांवांत नुकताच एक " उपद्रव " सुरू झाला होता त्याच्या भयंकर केसेसची हकीकत सांगून शेवटीं ओघाओघानें गोष्ट काढून म्हटलें " पण हो, ते आपले पैसे तसेच राहून गेले, रोज येतांना म्हणतों कीं ते रुपये घेऊन जाईन. पण वेळेवर आठवण राहात नाहीं. आतां वृद्धापकाळ झाला आहे आणखी काय? " ही अशी लांबलचक प्रस्तावना करून तीन नोटा अगदीं सहज, मनाला कांहीं वाटलें नाहींसें दाखवून, पुढें केल्या. त्या तीन नोटा नसून हृदयपंजराच्या तीन अस्थिच होत्या असें पाहून रावबहादूर मोठमोठ्यानें हंसले.

म्हणाले—राहूं द्याहो! आजच मला कोठें जरूर आहे?

एका प्रचलित बंगाली म्हणीचा उल्लेख करून म्हणाले "थोड्याशा कारणाकरितां आपला हात कशाला खराब करूं?"

ह्यानंतर मुलीला पाठविण्यासंबंधीं गोष्ट कोणाच्यानेंच काढवेना. वर्मी लागल्यासारखें विव्हळ होऊन बराच वेळ गप्प बसल्यावर रामसुंदरनें मृदु स्वरानें गोष्ट काढली. कांहीं कारण वगैरे न सांगतां रावबहादूर म्हणाले " तें इतक्यांत

होऊं शकत नाहीं." इतकेंच बोलून कांहीं कामाच्या निमित्तानें दुसरीकडे निघून गेले.

रामसुंदर मुलीला नोटा न दाखवितां कांपत कांपत नोटा उपरण्यांत बांधून घरीं परत आला. जे दिवशीं हुंड्याची सर्व रक्कम चुकवून मुलीवर निर्भिडपणें हक्क सांगतां येईल तेच दिवशीं व्याह्यांच्या घरीं पाऊल टाकीन असा मनांतल्या मनांत निश्चय केला.

पुष्कळ दिवस गेले. निरुपमेनें माणसावर माणूस पाठविलें, पण बापाची भेट होईना. शेवटीं रागानें माणूस पाठविण्याचें सोडून दिलें. तेव्हां मात्र बापाच्या मनाला धक्का बसला, पण गेला मात्र नाहीं.

आश्वीन मास आला. रामसुंदरनें निश्चय केला कीं पूजेच्या दिवसांत मुलीला कसेंही करून घरीं आणीन. न आणिली तर—असें म्हणून एक घोर शपथ वाहिली.

पंचमी कीं षष्ठीच्या दिवशीं उपरण्याच्या पदरांत नोटा बांधून रामसुंदर आण्यास निघाला. इतक्यांत पांच वर्षांचा नातू येऊन म्हणाला "आजोबा, आम्हांला गाडी आणायला जातां ?" पुष्कळ दिवसांपासून हातगाडींत फिरायला जायचा मुलानें हट्ट धरिला होता. पण त्याचा हट्ट पुरा करणें कांहीं केल्या झालें नाहीं. सहा वर्षांची नात येऊन रडत रडत म्हणाली "पुजेच्या बोलावण्याला जायला मला एकही चांगलें अंगांतलें नाहीं." रामसुंदरला या सर्व गोष्टी ठाऊक होत्या व तंबाखू खातखात याच गोष्टींचा विचार करीत होता. रावबहादुरांच्या घरीं पूजेच्या निमंत्रणाला जातांना सुनांना अंगाखांद्यावर कांहीं नाहीं अशा शोचनीय स्थितींत दरिद्याप्रमाणें जावें लागेल याची आठवण होऊन दीर्घ सुस्कारा टाकला; पण कपाळाची वार्धक्यरेषा खोल घालविण्यापलिकडे त्याचा कांहीं उपयोग नव्हता.

दैन्यपीडित कुटुंबांतील आक्रंदनध्वनी कानांत तसाच ठेवून तो वृद्ध रामसुंदर व्याह्यांचे घरीं गेला. आज त्याच्या मनांत संकोच नव्हता. आज नोकराचाकरांकडे नेहमींसारख्या दीन लज्जित दृष्टीनें न बघतां जणूं काय स्वतःच्याच घरांत चालले आहोंत अशा धीटपणानें तो वागला. रावबहादूर घरांत नाहींत,

थोडें थांबावें लागेल असें कोणी येऊन सांगितलें. मनाचा उल्हास आवरेना. रामसुंदर मुलीला जाऊन भेटला.

आनंदानें दोन्ही डोळ्यांतून अश्रू पडूं लागले. बाप रडूं लागला तशी मुलगीही रडूं लागली. दोघांच्यानेंही कांहीं बोलवेना. कांहीं क्षण असेच गेले. मग रामसुंदर म्हणाला "आज तुला खचित घेऊन जातों हां. आतां कांहीं अडचण नाहीं." इतक्यांत रामसुंदरचा थोरला मुलगा आपल्या दोन लहान मुलांना बरोबर घेऊन तेथेंच आला व बापाला म्हणाला—"बाबा, आज तुम्हीं आम्हांला रस्त्यावर सोडलेंत!" रामसुंदर लाल होऊन म्हणाला—"तुमच्या-करतां मी का नरकांत जाऊं? तुम्ही मला सत्यपालन करूं द्याल कीं नाहीं?" रामसुंदर घर विकून बसला होता. मुलाला कळूं नये म्हणून त्यानें पुष्कळ व्यवस्था केली, तरीपण माहित पडलेंच. बाप मुलावर रुष्ट झाला होता. नातू आजोबांच्या गुडघ्यांवर हात ठेवून तोंडाकडे बघून म्हणाला—"आजोबा, आम्हाला गाडी नाहीं घेऊन दिलीत?" आजोबांनीं मान खालीं घातली. उत्तर मिळालें नाहीं हें पाहून आतेला म्हणाला, "अत्याबाई, मला गाडी घेऊन देशील?"

निरुपमेनें सर्व स्थिति ओळखली. ती म्हणाली—बाबा तुम्ही जर एक पैसा माझ्या सासऱ्याला द्याल तर तुमच्या गळ्याची शपथ. तुमची मुलगी तुम्हांला दृष्टीस पडणार नाहीं.

रामसुंदर म्हणाला—छे मुली, असें बोलूं नकोस. हे रुपये जर मी दिले नाहींत तर तुझ्या बापाचा अपमान व तुझाही अपमान!

निरु म्हणाली—रुपये दिले तरी अपमान! तुमच्या मुलीला स्वतःची अशी किंमतच का नाहीं? मी एक पैशाची पिशवी कीं काय? जोंपर्यंत पैसे असतील तोंपर्यंत माझी किंमत! नाहीं, बाबा, हे पैसे देऊन तुम्ही माझा आणखी अपमान करूं नका. तें राहूद्या. माझा पतीला तर पैसे नको आहेत ना!

रामसुंदर म्हणाला—पण तसें झालें तर तुला येऊं देणार नाहींत त्याचें काय!

निरुपमा म्हणाली–नाहीं दिलें तर काय करायचें? तुम्हीं आतां मला नेण्याच्या खटपटींत पडूं नका.

रामसुंदर कांपत कांपत नोटा उपरण्यांत बांधून खांद्यावर टाकून चोरा-सारखा सगळ्यांची दृष्टी चुकवून घरीं परत आला.

रामसुंदर रुपये घेऊन घरीं आला होता, पण मुलीच्या सांगण्यावरून न देतांच परत घेऊन गेला ही गोष्ट गुप्त राहिली नाहीं. नेहमींच्या स्वभावाप्रमाणें कोणी दासीनें चोरून ऐकून ही गोष्ट सासूच्या कानावर घातली. हें ऐकून सासूच्या क्रोधाला तर सीमाच उरली नाहीं.

निरुपमेला सासर शरशय्येप्रमाणें झालें. लग्नानंतर थोडेच दिवसांत तिचा नवरा डेप्युटी मॅजिस्ट्रेट होऊन परगांवीं गेला होता. माहेरच्या संगतीनें मुलगी बिघडून जाईल म्हणून माहेरच्या माणसांना भेटण्याची सुद्धां बंदी झाली.

ह्याच सुमारास निरूची प्रकृति फारच बिघडली, पण त्याचा सर्वच दोष सासूकडे नव्हता. निरू आपल्या प्रकृतीची फारच हेळसांड करीत असे. कार्तिकाचा महिना; थंडीचे दिवस पण रात्रच्या रात्र दार उघडें टाकून अंगांवर कांहीं न घेतां तिनें काढावी. खाण्यापिण्यांतही नियमितपणा नसे. दास दासी पथ्याचें आणण्यास मधून मधून विसरल्या तर हिनें त्यांना आठवणसुद्धां करूं नये. तिच्या मनानें पक्कें घेतलें कीं ह्या परके ठिकाणीं आपण राहतों हें सुद्धां नोकर चाकर, सासू सासरा, ह्यांच्या केवळ कृपेनेंच. पण तिचें हें वागणेंसुद्धां सासूला पसंत पडेना. खाण्यापिण्याची अवहेलना केलेली सासूच्या नजरेस आली म्हणजे तिनें म्हणावें—

"जहागिरदाराची मुलगी पडलीना, तिला गरिबाच्या घरचें अन्न कसें आवडेल!" कधीं कधीं म्हणावें–"बघा तर खरी दिवसानुदिवस कशी रोडत चालली आहे ती."

दुखणें जसें वाढलें तसें सासू म्हणाली–दुखणें कांहीं फारसें नाहीं.

एक दिवस निरू सासूला मोठ्या केविलवाणीनें म्हणाली–बाबांना आन् भावांना एकदां पाहिलें असतें.

सासूबाई म्हणाल्या—केवळ माहेरीं जाण्याकरितां हें ढोंग !

कोणाला सांगितलें तर खरें वाटणार नाहीं, पण जे दिवशीं संध्याकाळच्या सुमारास निरूला श्वास झाला ते दिवशींच डॉक्टरला पहिल्यानदां आणिलें होतें. पुन्हां डॉक्टरचें काम पडलें नाहीं.

रावबहादुरांची थोरली सून वारली. जिकडे तिकडे गडबड उडाली. अंत्य-विधी मोठ्या थाटानें झाला.

सबंध प्रांतांत रायचौधरींच्या वेळीं जशी प्रख्याति झाली होती तशीच राव-बहादुरांच्या थोरल्या सुनेची क्रियाकर्मांतराबद्दल ख्याति झाली. अशी चंदनाची चिता ह्या मुलुखांत कोणी कधीं ऐकिली देखील नव्हती.

" अशा थाटाचें श्राद्ध केवळ रावबहादुरांच्याच घरीं ! " अशीं बोलणीं ऐकूं येऊं लागलीं.

रामसुंदरची सांत्वना करतांना सगळ्यांनीं त्यांच्या मुलीचा दहनविधी काय समारंभानें झाला म्हणून वर्णन करावें !

याच सुमारास डेप्युटी मॅजिस्ट्रेटांकडून पत्र आलें:—

" आम्ही आतां सर्व व्यवस्था उत्तम केली आहे. तरी विलंब न लावतां कुटुंबाला पाठविण्याची तजवीज करावी." रावबहादुरांच्या राणीसाहेबांनीं लिहिलें, " बाबा, तुझ्याकरतां दुसरी एक मुलगी पाहून ठेविली आहे. तरी विलंब न करतां रजा घेऊन तूं निघून ये. "

या खेपेला वीस हजार हुंडा आधींच घेण्यांत आला.

  

***समाजांतील वाईट चाली मोडून टाकण्यास जे अनेक उपाय आहेत त्यांत नाटकरूपानें किंवा कथारूपानें त्यांचें हृदयद्रावक चित्र रविबाबूंसारख्या विद्वान् कवीनें लोकांपुढें मांडल्यास अधिक उपकारक होईल हें वाचकांस वरील गोष्ट वाचून पटण्यासारखें आहे. सामाजिक सुधारणेकडे भावी पिढीचें चित्त आक-र्षित करण्यास अशा साहित्याचा चांगला उपयोग होईल.

---

# १२. उद्धार

गौरी, एका पुरातन श्रीमान घराण्यांतील सुस्थितींत वाढलेली रूपवती कन्या होती. तिचा पति परेश यानें स्वोपार्जित धनानें नुकतेंच गरिबींतून डोकें वर काढिलें होतें. गरिबी होती तेथपर्यंत मुलीचे हाल होतील या भयानें, आई-बापांनीं मुलीला सासरीं पाठाविलें नाहीं. गौरी चांगली वयांत आल्यावरच पति-गृहीं आली.

बहुधा याच कारणानें परेशला स्वतःच्या सुंदर तरुण स्त्रीचे ठिकाणीं आपले-पणा वाटेना. त्याचा स्वभावही संशयी.

परेश पश्चिमेकडील एका लहानशा शहरीं वकिली करीत असे. घरीं नात्यां-तील कोणी मोठें मनुष्य नव्हतें. बायको एकटी म्हणून मन नेहमीं साशंक असे. मधून मधून त्यानें अवेळीं कोर्टांतून आकस्मिक यावें. प्रथम प्रथम नव-ऱ्याच्या आकस्मिक आगमनाचें कारण गौरीला कळत नसे. मधून मधून परेश निष्कारण आपल्या नोकरांना नोकरीवरून काढून टाकूं लागला. फार दिवस कोणीच टिकेना. विशेषतः अडचण होईल म्हणून एकादा नोकर न काढण्याबद्दल बायकोचा आग्रह दिसला, कीं तो ताबडतोब काढला जाई. ती मानिनी जों जों या गोष्टीचा राग करी, तों तों नवरा अधिकच विलक्षणपणानें वागूं लागला.

शेवटीं संशय अनावर होऊन परेश, दासींना गुप्तपणें विचारूं लागला; तेव्हां तर सर्व गोष्टी गौरीच्या कानावर येऊं लागल्या. ती अभिमानी मित-भाषिणी स्त्री अपमानरुष्ट सिंहिणीप्रमाणें आंतल्या आंत जळूं लागली. याप्रमाणें त्या संशयपिशाच्चानें त्या उभयतांना विच्छिन्न करून टाकिलें.

गौरीला आपला संशय कळून चुकला हें पाहून प्रतिदिवशीं पावलों पावलीं स्त्रीशीं उघड उघड कलह उपस्थित करण्यास परेशला मुळींच संकोच वाटेनासा झाला. गौरीनें कधीं कधीं उत्तरही देऊं नये, आपल्या तीक्ष्ण कटाक्षांनीं पतीला

आपादमस्तक जणूं काय क्षतविक्षत करून टाकावें; ह्यामुळें परेशाचा संशयभ्रम उत्तरोत्तर अधिकाधिक वाढूं लागला.

पतिसुख या प्रकारचें, मूलबाळ नाहीं, अशा स्थितींत त्या तरुणीचें मन धर्माकडे लागावें यांत काय नवल? हरिसभेचे नवीन प्रचारक परमानंद स्वामी यांना बोलावून तिनें त्यांचा गुरूपदेश घेतला व त्यांच्याकडून भागवत ऐकण्यास प्रारंभ केला. नारीहृदयांतील समस्त निरालंब स्नेह, प्रेम, भक्तिरूपानें पुंजीभूत होऊन गुरुदेवाच्या पदकमळीं समर्पण करण्यांत आलें.

परमानंदाच्या शुद्ध चारित्र्याबद्दल गांवीं परगांवीं कोणालाही संशय नव्हता. सर्व त्यांना पूज्य मानीत. स्वामींच्या संबंधीं परेशाचा संशय प्रकटित होण्यास मार्ग न सांपडल्यामुळें तो गुप्त क्षताप्रमाणें वाढत जाऊन हृदयविदारण करूं लागला.

एके दिवशीं सामान्य कारणामुळें विष ओकून बाहेर पडलें. बायकोजवळ तो परमानंदाला उद्देशून दुराचरणी ढोंगी म्हणून बोलला, " तूं आपल्या शाळिग्रामाची शपथ घेऊन सांग बरें, कीं, तूं त्या ढोंग्यावर मनांतल्या मनांत प्रेम करीत नाहींस म्हणून?"

पादाहत नागिणीप्रमाणें क्रुद्ध होऊन मिथ्या-स्पर्धा-विषानें पतीला दंश करून रुद्ध स्वरानें म्हणाली-" होय, करतें! काय करणें असेल तें करावें!" परेश तत्क्षणीं तिला कोंडून कुलूप घालून कोर्टांत चालता झाला.

राग असह्य होऊन, कसें तरी दार उघडून गौरी घराच्या बाहेर पडली. दोन प्रहरच्या शांत वेळीं परमानंद एकटाच घरांत बसून पोथी वाचीत होता. एकाएकीं मेघविहीन आकाशांतील विद्युल्लतेप्रमाणें गौरी शास्त्राध्ययनमग्न ब्रह्मचाऱ्यासमोर प्रकाशित झाली.

गुरु म्हणाला-तूं इथें!

शिष्या म्हणाली--गुरुदेव, ह्या कष्टमय संसारांतून मला सोडवा, माझा उद्धार करून मला घेऊन चला. तुमची सेवा करून मी आपला काळ कंठीन.

परमानंदानें तिची निर्भर्त्सना करून तिला घरीं परत पाठविलें. पण हायरे गुरुदेव ! ते दिवशीं अकस्मात् छिन्नविछिन्न झालेलें अध्ययन-सूत्र पुन्हा जोडणें शक्य आहे का ?

परेश घरीं आल्यावर दार उघडें पाहून त्यानें विचारलें—कोण आलें होतें ?

स्त्री म्हणाली—कोणी नाहीं. मी गुरूंच्या घरीं गेलें होतें.

परेश क्षणभर हिरवापिवळा झाला. लाल होऊन म्हणाला—काय म्हणून गेली होतीस ?

गौरी म्हणाली—माझी मर्जी !

त्या दिवसापासून त्यानें बायकोला कोंडून ठेविली, पहारा बसविला व तो अशा रीतीनें वागूं लागला कीं, सर्व गांवभर त्याची निंदा सुरू झाली.

आपल्या शिष्याची ही निंदा, अपमान, अत्याचार ऐकून परमानंदाचें हरि-चिंतन पार मागें पडलें. हें गांव ताबडतोब सोडून गेलें पाहिजे असें त्याला वाटूं लागलें. पण त्या पीडित स्त्रीला टाकून जाण्याचें धारिष्ट होईना. रात्रं-दिवस त्या संन्याशाच्या मनाची अशी स्थिती किती दिवसांपासून झाली असेल हें एक अंतर्यामीच जाणूं शकेल !

शेवटीं बंदिवासांत असतां गौरीला पत्र आलें. " वत्से, यापूर्वी अनेक साध्वी स्त्रियांनीं कृष्णप्रेमानें संसाराचा त्याग केलेला आहे. जर सांसारिक आपत्तीमुळें तुझें चित्त हरिपादपद्मापासून विचलित होत असेल तर भगवंताच्या कृपेनें भगवद्भक्ताला प्रभुपदारविंद सेवन करण्याचा अवसर देण्यास्तव मी सहाय्यभूत होण्यास तयार आहें. फाल्गुन द्वादशी बुधवार ते दिवशीं दोन प्रहरीं दोन घटिकेचे सुमारास तुमच्या पुष्करणीचे तीरीं आमची भेट होईल ! "

गौरीनें पत्र खोप्यांत खोंचून ठेविलें. फाल्गुन द्वादशीचे दिवशीं मध्यान्ह-काळीं स्नानापूर्वीं केस मोकळे सोडतेवेळीं पहातें तों पत्र नाहीं. तिला संशय आला कीं, चिठी बिछान्यांत पडून पतीच्या हातीं तर लागली नाहींना ? पत्र वाचून पतीची अवस्था काय होईल हें मनांत येऊन निष्ठुर होऊन आनंद वाटला. पण शिरोभूषण म्हणून बाळगलेलें पत्र पाखंड्याच्या स्पर्शानें दूषित

झालें असेल, ही कल्पना सह्य होईना. त्वरेनें पतीच्या खोलींत गेली. डोळे फिरलेले, तोंडाला फेस आलेला, घरघर लागलेली अशा स्थितींत आपला पती जमिनीवर पडला आहे हें तिच्या नजरेस आलें. उजव्या हाताच्या मुठींत धरलेलें पत्र काढून घेऊन ताबडतोब डॉक्टरला बोलाविणें पाठाविलें.

डॉक्टर येऊन म्हणाले–" ॲपोप्लेक्सी! ( अपस्मार ) रोग्याचें प्राणोत्क्रमणही झालें आहे!!! "

तेच दिवशीं एका महत्त्वाच्या खटल्याची तारीख होती व परेशला बाहेरगांवीं जावयाचें होतें. इकडे संन्याशाचें पतन येथपर्यंत झालें होतें कीं, ह्या गोष्टीचें अनुसंधान ठेऊन गौरीची गांठ घेण्याचा त्याचा बेत होता.

सद्यविधवा गौरीनें खिडकीमध्यें उभे राहिलेल्या गुरुदेवांना बघतांच चकित होऊन मान खालीं घातली. गुरूंचा कोणत्या ठिकाणाहून कोठवर अधःपात झाला आहे हें जणूं काय विद्युत्प्रकाशानें एका क्षणांत तिच्या हृदयांत स्पष्ट करून दाखविलें.

गुरूंनीं हाक मारली–गौरी.

गौरी–आलेंच, गुरुदेव.

मृत्यूची वार्ता ऐकून बंधुजन अंत्यविधीकरितां उपस्थित झाले. गौरीचें प्रेत नवऱ्याचे शवाशेजारीं पडलेलें. तिनें विष खाऊन प्राण दिला होता. तिनें सती जाऊन आपलें पातिव्रत्य व्यक्त केलेलें पाहून सर्वजण आश्चर्यचकित झाले व विशेषतः ह्या कालांतील ही घटना म्हणून!

  

⁂ या गोष्टीचें सार शेवटच्या एका वाक्यांत आलें आहे. ही कथा बंगालमधील सामाजिक स्थितीला अनुलक्षून लिहिली असली तरी महाराष्ट्राच्याही सद्यःस्थितीला पूर्णपणें लागूं पडण्याजोगी आहे हें प्रौढ वाचकांच्या लक्षांत येईल.

---

# १३. सुट्टी

फटिक चक्रवर्ती गांवांतल्या मुलांचा पुढारी असे. एके दिवशीं त्याच्या डोक्यांत एक नवी कल्पना आली. नदीच्या कांठीं एक शालवृक्षाचा प्रचंड ओंडका आपलें रूपांतर ( डोलकांटी ) कधीं होणार म्हणून जणूं काय वाट पहात पडला होता. फटिकच्या मनांत सगळ्यांनीं मिळून ढकलीत ढकलीत तो न्यावा असें आलें.

ज्या व्यक्तीचें तें काष्ट होतें त्याला कसें आश्चर्य वाटतें, कसा राग येतो त्याची गम्मत पहावी असा सगळ्यांचा बेत ठरला.

सर्वजण कंबर बांधून मोठ्या उत्साहानें लोटायला सुरुवात करणार इतक्यांत, फटिकचा कनिष्ठ भाऊ माखनलाल मोठ्या गंभीर मुद्रेनें त्या ओंडक्यावर जाऊन बसला. त्याचें तें औदासीन्य पाहून मुलें विरस होऊन गेलीं.

एकानें येऊन त्याला थोडें ढकलून पाहिलें, पण तो किंचितही विचलित झाला नाहीं व जणूं काय एखाद्या अकालीं वैराग्य प्राप्त झालेल्या तत्त्वज्ञाप्रमाणें क्रीडेच्या असारतेबद्दल स्तब्धपणें विचार करूं लागला.

फटिक येऊन ओरडून म्हणाला—बघ ! मार खाशील ! आतां ऊठ येथून.

माखन थोडा पलीकडे सरकून ओंडक्याला आणखीच घट्ट धरून बसला.

वास्तविक फटिकला आतां सगळ्यांच्या समोर आपली अब्रु राखावयाची म्हणजे आपल्या बंधूच्या तत्क्षणींच श्रीमुखांत भडकावयाला पाहिजे होती, पण त्याचा धीर झाला नाहीं.

त्याच्या मनांत आलें कीं, भावाला योग्य शासन करणें कांहीं अवघड नाहीं, पण आपण आणखी एक मजा करावी; माखनसकट ओंडका लोटून द्यावा असा विचार आला.

माखनला वाटलें कीं, आतां तसेंच बसून राहण्यांतच आपला मोठेपणा आहे. पण ऐहिक मोठेपणाच्या अनुषंगिक जीं संकटें असतात त्यांचा विचार मनांत येत नाहीं.

मुलांनीं कमरा बांधून लोटण्यास आरंभ केला. त्या ओंडक्यानें एक पलटी खाली न खाली तोंच माखनबरोबरच त्याचें तें गांभीर्य, मोठेपणा, तत्त्वज्ञान, जमीनदोस्त झालीं. खेळाला सुरुवात करतात तोंच इतकें यश आलेलें पाहून मुलांना खूप गम्मत वाटली. पण फटिक मात्र घाबरला. माखन तत्क्षणींच जमिनीवरून उठून फटिकच्या अंगावर धांवून गेला व एकसारखा त्वेषानें मारीत सुटला व त्याच्या तोंडावर नाकावर ओरखडे घेऊन रडत रडत घरीं गेला.

खेळाचा पहिला अंक अशा रीतीनें समाप्त झाला.

फटिक एक गवताची काडी उपटून घेऊन एका अर्ध निमग्न नौकेवर चढून स्वस्थपणें ती काडी चावीत बसला.

इतक्यांत एक नौका कांठावर येऊन लागली. एक प्रौढ वयाचा, अर्धे-अधिक केस पिकलेला गृहस्थ नावेंतून उतरला व त्यानें मुलाला विचारलें "चक्रवर्तींचें घर कुठेसें आहे?" मुलानें काडी चावीत उत्तर दिलें "त्या तिकडे." पण कोणीकडे त्यानें दाखविलें हें कोणालाही समजण्यासारखें नव्हतें. त्या गृहस्थानें पुन्हा विचारलें "कुठें म्हणालास?"

तो म्हणाला "समजलें नाहीं?" इतकें बोलून त्या गवताच्या काडीचा जणूं काय आस्वाद घेत तसाच बसला.

बाबूंनीं विचार केला कीं, दुसऱ्या कोणाला तरी विचारावें हेंच बरें, म्हणून चक्रवर्तींच्या घराच्या शोधार्थ तसेच चालूं लागले.

इतक्यांत नोकरानें तेथें येऊन सांगितलें, "फटिकदादा, आई बोलावीत आहे."

फटिक म्हणाला "येत नाहीं."

नोकर जबरदस्तीनें उचलून घेऊन गेला. फटिकचें हातपाय झाडणें ओरडणें चालूच होतें.

फटिकला पहातांच आई विस्तवासारखी लाल होऊन म्हणाली—तूंच आतां मांखनला मारलेस ना ?

फटिक म्हणाला—नाहीं ! मी मारलें नाहीं.

"पुन्हा खोटें बोलतोस !"

"केव्हां मारलें माखनलाच विचार तर !"

माखनला विचारतां, त्यानें आपण प्रथम सांगितलेल्या गोष्टीचें समर्थन करण्याकरितां म्हणाला—हो मारलें.

फटिकच्यानें हें सहन झालें नाहीं. त्वेषानें जाऊन त्यानें माखनच्या एक फाडकन् मुसकाडींत लगावली, आणि म्हणाला—पुन्हा खोटें बोलतोस !

आईनें माखनचा पक्ष घेऊन फटिकला जोरानें एकीकडे ओढून दोन तीन जोरानें धपाटे पाठींत दिले.

फटिकनें आईला ढकलून दिलें. आई मोठ्यानें ओरडली, म्हणाली—तूं माझ्यावर हात उगारतोस !

इतक्यांत एक वयस्क गृहस्थ घरांत येऊन म्हणाला—काय आहे तरी काय ?

फटिकच्या आईला मोठा विस्मय वाटला. ती मोठ्या उत्साहानें म्हणाली—अरे, हा तर दादा ! तूं केव्हां आलास ?

इतकें बोलून वांकून तिनें नमस्कार केला.

भाऊला मुंबईला जाऊन पुष्कळ दिवस झाले होते. इकडे फटिकच्या आईला दोन मुलें होऊन तीं चांगलीं मोठींही झालीं. मुलांचा बाप वारल्याला बरेच दिवस झाले होते, पण दादाची गांठ मात्र इतके वर्षांत नव्हती. विश्वंभरबाबूला परत देशीं येऊनही बरेच दिवस झाले, आज तो बहिणीला भेटावें म्हणून आला होता.

बरेच दिवस मोठ्या आनंदानें गेले. शेवटीं निरोप घेण्यापूर्वीं विश्वंभरबाबूंनीं बहिणीला, मुलांचें शिक्षण व त्यांच्या मानसिक उन्नतीसंबंधानें प्रश्न केला. बहिणीनें फटिकची उच्छृंखलता, त्याचें अभ्यासाकडे दुर्लक्ष व माखनची

सुशीलता, त्याची विद्याभिरुची ह्यांचें वर्णन करून सांगितलें. बहिण म्हणाली— फटिक माझीं कशीं हाडें घुसळतो आहे.

हें ऐकून विश्वंभर म्हणाला——मी फटिकला विद्याभ्यासाकरितां कलकत्याला माझ्या जवळ घेऊन जाऊं का ?

बहिणीनें आढेवेढे न घेतां संमती दिली.

फटिकला विचारिलें—कायरे फटिक, मामांच्याबरोबर कलकत्त्याला जातोस का ?

फटिक मोठ्या उल्हासानें म्हणाला—होय.

फटिकला पाठवून देण्यांत आईला कांहीं संकट वाटलें नाहीं. तिच्या मनानें घेतलें होतें कीं, हा कधीं ना कधीं माखनला पाण्यांत तरी बुडवील, नाहीं तर त्याचें डोकें तरी फोडील, काय विघ्न आणील आणि काय नाहीं ! तथापि विद्याभ्यासाबद्दल त्याची इतकी उत्कंठा पाहून तिचें मन किंचित् उदास झालें. त्यानें 'कधीं जावयाचें ?' म्हणून विचारून विचारून मामाला पुरे पुरे करून सोडलें. त्या उल्हासामुळें त्याला रात्रीं झोंप देखील आली नाहीं.

शेवटीं जातांना आनंदाच्या भरांत मोठ्या औदार्यानें आपली मासे धरायची काठी, पतंग वगैरे सर्व मालमत्ता पूर्ण स्वामित्वानें कुलक्रमागत वंशपरंपरा उपभोगण्याकरितां माखनच्या स्वाधीन केली.

कलकत्त्याला मामांच्या घरीं पोहोंचल्यावर मामीशीं बोलण्याचा त्याचा हा पहिलाच प्रसंग ! मामीला त्याच्या येण्यानें संतोष झाला अशांतला मुळींच भाग नाहीं.

तिचीं स्वतःचीं तीन मुलें सांभाळतां सांभाळतां तिला पुरेसें होत असे, त्यांत आणखी एक तेरा वर्षांचा अपरिचित, अशिक्षित, खेडवळ मुलगा आल्यानें हें एक नवीन विघ्नच उपस्थित झाल्यासारखें तिला वाटलें. विश्वंभरचें इतकें वय झालें तरी त्याला काडीमात्र व्यवहारज्ञान नाहीं असेंच म्हटलें पाहिजे.

प्रपंचांत तेरा चौदा वर्षांच्या मुलापेक्षां जास्त उपद्रवी वस्तू शोधूं लागलें असतांही मिळणें कठीण. तो शोभा देत नाहीं, तो लाड करण्याला योग्य नाहीं,

त्याचा सहवासही कांहीं स्पृहणीय नसतो, तो लहान मुलासारखें लाडानें बोलला तरी कोणाला आवडत नाहीं, तो प्रौढ माणसासारखें वागला तरी रुचत नाहीं, तो कसेंही बोलला तरी त्याचा राग येतो, कपडालत्ता आंगाला येत नाहीं असें झालें कीं, तो एरंडासारखा वाढतो आहे असें वाटूं लागतें, त्याचा चेहरा वांकडा होऊन तो कुरूप दिसूं लागतो, बालपणची कोमलता व माधुर्य जाऊन त्याचा आवाज फुटून घोगरा होतो, बालपणचे दोष किंवा यौवनावस्थेंतील अपराध क्षम्य वाटतात. पण ह्या संधिसमयांतील अगदीं स्वाभाविक व अनिवार्य त्रुटीही असह्य वाटूं लागतात. जगांत आपणाला कोणीच चांगलें म्हणत नाहीं म्हणून त्याचें मन त्याला खात असतें ही जाणीव असल्यामुळें कधीं औद्धत्य तर कधीं अकारण लज्जा अशी त्याची स्थिती होऊन जाते.

ह्याच वयांत मुलांना स्नेहाची व सहाय्यतेची अपेक्षा वाटूं लागते. अशाच वेळीं एखादें कोणी जर त्याच्याशीं सहृदयता दाखवील तर त्याला तो सर्वस्व अर्पण करावयाला तयार होतो. पण त्याला कोणीही ममतेनें वागवावयाला धजत नाहीं; कारण त्याचे लाड करण्याचे हे दिवस नाहींत अशी समजूत असते. फार कशाला, त्याच्या मनाची स्थिती व चेहरा एखाद्या बिनवारशी रस्त्यांतील कुत्र्याप्रमाणें होतो. म्हणूनच या वयांत मुलांना आपलें घर सोडून अपरिचित ठिकाणीं राहणें म्हणजे नरकवास वाटतो. या वयांत साधारणपणें कोणीही स्त्री म्हणजे देवतेप्रमाणें वाटत असते, म्हणूनच तिनें केलेली उपेक्षा अत्यंत दुःसह होते.

मामीच्या निःस्नेह चक्षूंकडे त्याच्यानें बघवत देखील नसे. मामीनें एखादें काम त्याला करायला सांगितलें म्हणजे तो इतकें मन लावून करूं लागे कीं, मामीनें तिकडूनही रागवावें व म्हणावें " बाबा पुरें झालें तुझें करणें ! पुन्हा म्हणून तुला सांगावयाची सोय नाहीं. जा; बाबा तूं आपला उद्योग कर कसा. जा, आपला अभ्यास कर म्हणजे झालें." आपल्या मानसिक उन्नतीसाठीं ही मामीची काळजी व प्रयत्न पाहून तिचा निष्ठुरपणा व अविचार यांबद्दल त्याला तिटकारा आल्यावांचून रहात नसे. घरांत ह्या प्रकारचा अनादर, मोकळेपणानें

श्वास घेऊं म्हटलें तरी अशक्य, एखाद्या खोलींत कोंडून ठेवल्याप्रमाणें त्याला होऊन आपल्या गांवची आठवण वरचेवर होऊं लागली.

जेथें सर्व दिवसभर तो पतंग उडवीत असे, ती विस्तीर्ण राई; जेथें आनंदानें दिवसभर गात मनसोक्त हिंडावें तें नदीचें विस्तृत वाळवंट; जेथें त्यानें हवें तेव्हां पोहावें डुंबावें तो ओढा, ह्या सर्व गोष्टींची आठवण त्याला वारंवार होऊं लागली. आपले ते सोबती, तें स्वातंत्र्य व विशेषतः ती अत्याचारी व अविचारी आई ह्यांची अहर्निश आठवण होत असे.

जनावराप्रमाणें एक प्रकारें निर्बुद्ध प्रेम, कोणापाशीं तरी जावें अशी अंध इच्छा, प्रिय वस्तु दृष्टीस न पडल्यामुळें होणारी अव्यक्त व्याकुलता, संध्याकाळीं आईवांचून बांधलेल्या वासराप्रमाणें आंतरिक तळमळ ह्या गोष्टींनीं त्या सलज्ज, साशंक, शीर्ण, विदीर्ण असुंदर बालकाचें हृदय मंथनदंडाप्रमाणें आलोडित केलें होतें.

शाळेंत ह्याच्या इतका मतिमंद व मागें पडलेला मुलगा दुसरा कोणीच नव्हता. मास्तारनीं प्रश्न विचारला म्हणजे एखाद्या ओझ्यानें लादलेल्या गाढवा-प्रमाणें मुकाट्यानें मार सोसावा. सुट्टींत मुलें खेळूं लागलीं म्हणजे दाराजवळ उभें राहून ह्यानें घरांच्या कौलाराकडे पहात बसावें. एकादे वेळीं दोन प्रहरीं उन्हांत गच्चीवर कोणी लहान मुली खेळतांना पाहिल्या म्हणजे याचें मन अत्यंत अस्थिर होई.

एके दिवशीं मोठ्या धैर्यानें मामांना विचारलें—मामा, आईकडे कधीं जायचें?

मामा म्हणाले—शाळेला सुटी झाली म्हणजे जा.

कार्तिक महिन्यांत पुजेची सुटी. पण कार्तिक कांहीं जवळचा पल्ला नव्हता.

एके दिवशीं फटिक आपलें अभ्यासाचें पुस्तक हरवून बसला. पुस्तक असून सुद्धां अभ्यास व्हावयाची मारामार, त्यांतून पुस्तक हरवल्यावर तर मुळींच बोलायला नको.

मास्तरनीं दररोज खूप मारावें, अपमान करावा; त्याची अशी स्थिति होऊन गेली कीं, त्याच्या मामेभावांना त्याच्याशीं संबंध ठेवावयाची लाज वाटूं

लागली; दुसऱ्या मुलांपेक्षां ह्यांनाच त्याचा अपमान करण्यांत ज्यास्त आनंद वाटूं लागला.

हें अगदीं असह्य होऊन एके दिवशीं आपल्या मामीपाशीं जाऊन एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें केविलवाण्या स्वरानें म्हणाला—मामी, माझें पुस्तक हरवलें आहे.

मामी मोठ्या तिरस्कारानें म्हणाली—चांगलें केलेंस, महिन्यांतून चारदां पुस्तकें तुला आम्हीं कुठून आणून द्यावींत ?

फटिक कांहीं उत्तर न देतां मुकाट्यानें निघून गेला. आपण दुसऱ्याचा पैसा व्यर्थ घालवीत आहोंत हें मनांत येऊन आपल्या आईबद्दल त्याला अभिमान वाटूं लागला. आपल्या हीनदीन स्थितीबद्दल त्याला फारच खेद झाला.

शाळेंतून परत आल्यावर तेच दिवशीं रात्रीं त्याचें डोकें दुखून आंग मोडून आलें. ताप येणार असें कळून चुकलें. मामीला व्यर्थ उपद्रव होणार या गोष्टीचें त्याला फार भय पडलें. आजारीपणांत आपल्या आईखेरीज ' कोणी सेवा चाकरी करील का ?' अशी आशा करावी लागणार ह्या गोष्टीची त्याला फारच लज्जा वाटली.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं फटिक दृष्टीस पडला नाहीं. शेजारींपाजारीं चोहों-कडे शोध केला पण त्याचा पत्ता लागेना. ते दिवशीं रात्रीं पाऊस मुसळधार लागला. त्याच्या शोधाला गेलेलीं माणसें भिजून चिंब झालीं; शेवटीं कुठेंही तपास न लागल्यामुळें विश्वंभरबाबूंनीं पोलीसमध्यें खबर दिली.

सगळा दिवस तसाच गेल्यावर, संध्याकाळच्या समायास एक गाडी विश्वं-भरबाबूंच्या घरासमोर येऊन थांबली. वृष्टी एकसारखी होतच होती. रस्त्यांत पाणी गुडघा गुडघा झालें होतें.

दोन पोलिसच्या माणसांनीं गाडीमधून फटिकला धरून उतरवून विश्वंभर-बाबूंच्या समोर आणिलें. तो नखशिखांत भिजलेला, सर्वांग चिखलानें भरलेलें; तोंड व डोळे लाल झालेले असून तो एकीकडे सारखा थरथर कांपत होता.

विश्वंभरबाबू त्याला छातीशीं धरून घरांत गेले. मामी त्याला पहातांच म्हणाली—काय बाई ! परक्याचें मूल, पण कोण हा कर्मभोग ? द्या बाई, याला पाठवून तरी द्या !

तो सगळा दिवस मोठ्या संकटांतच गेला. कोणाचेंच जेवण खाण नीट झालें नाहीं. आपल्या मुलांशीं सुद्धां ती कचकच करूं लागली.

फटिक मामीचें ऐकून म्हणाला—मीं घरीं चाललों होतों; मला परतवून घरीं आणिलें.

मुलाचा ताप फारच वाढला, मुलगा सारी रात्र बडबड करीत होता. विश्वंभरबाबू डॉक्टर घेऊन आले. फटिकनें आपले लाल झालेले डोळे उघडून एक वेळ पटईकडे पाहून म्हणाला " मामा, आम्हांला सुट्टी झाली ? " विश्वंभर-बाबू रुमालाला डोळे पुसून ममतेनें त्याचा हात आपल्या हातांत धरून त्याच्या-जवळ रात्रभर बसले. फटिक बडबड करतां करतां मोठ्यानें म्हणाला " आई, तूं मारूं नकोस. मी खरें सांगतों मी कांहीं केलें नाहीं. "

दुसरे दिवशीं दुपारीं फटिक कांहीं वेळ शुद्धींत आला. मोठ्या आशेनें चोहोंकडे पाहूं लागला. निराश होऊन भिंतीकडे तोंड फिरवून स्तब्धपणें निजून राहिला.

विश्वंभरबाबूंनीं त्याच्या मनांतील भाव ओळखून त्याच्या कानांशीं तोंड नेऊन मृदु स्वरानें सांगितलें " फटिक, तुझ्या आईला आणायला पाठविलें आहे, बरें का ? "

ह्यानंतर आणखी एक दिवस कसा तरी गेला. डॉक्टर सचिंत होऊन म्हणाले " तब्यत जास्तच बिघडली ! "

विश्वंभरबाबू दिवा लहान करून फटिकच्या आंथरुणावर त्याच्या आईची क्षणोक्षणीं वाट पहात बसले.

फटिक खलाशांसारखा सूर काढून "एक वॉव, दोन वॉव" करूं लागला.

कलकत्त्यास येतांना खलाशी दोरी टाकून पाणी मोजीत तें फटिकनें पाहिलें होतें. त्यांचें अनुकरण करून फटिक स्वतःच करुण स्वरानें ठाव पाहूं लागला. परंतु तो जी समुद्रयात्रा करावयास निघाला होता त्याचा ठाव या तरुण बाल-काला कोठून लागणार ?

इतक्यांत फटिकची आई एखाद्या वावटळीप्रमाणें घरांत शिरतांच, मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागली. विश्वंभरनें सांत्वन करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण तिनें धाडदिशीं बिछान्यावर आंग टाकून "माझें सोनें, माझा हिरा, माझा फटिक" म्हणून सुरुवात केली. फटिक कांहीं वेळ निश्चेष्ट पडला. त्याचे हात आपटणें बंद पडलें. 'ए' असें कांहींसा पुटपुटला. आई "फटिक, माझ्या लाडक्या" म्हणून पुनः आक्रोश करूं लागली. फटिकला निरीक्षण करण्याची देखील शक्ती नव्हती. आपल्याजवळ कोण कोण आहेत हें सुद्धां त्याला ओळखेनासें झालें. "आई, सुट्टी आली, मी आतां घरीं जातों." एवढेंच मृदुस्वरें बोलला.

  

*** ह्या गोष्टींत दोन मुलें व दोन स्त्रिया यांचें स्वभावचित्र इतक्या थोड्या अवकाशांत व इतकें उत्कृष्ट साधलें आहे कीं, मराठी वाङ्मयांतच काय पण इतरत्रही तसें आढळणें कठीण.

फटिकची आई व मामी या दोघी मध्यम स्थितींतील कुटुंबांमध्यें सामान्यतः आढळून येणाऱ्या स्त्रियांपैकींच आहेत, पण त्यांचा स्वभाव त्यांच्या प्रासंगिक उद्गारांवरून फारच मार्मिकपणें दर्शविला आहे.

फटिक हा खोडसाळ, निर्बुद्ध असा जरी असला तरी त्याच्या मनाची स्थिति व परक्याचे घरीं मुलांना कसें वाटतें हें इतक्या उत्कृष्ट तऱ्हेनें दाखविलें आहे कीं, सहृदय वाचकांच्या डोळ्यांतून पाणी आल्यावांचून राहणार नाहीं. ग्रंथकाराच्या ठिकठिकाणीं आलेल्या उपमा व रूपकें तसेंच सामान्य सिद्धांत अत्यंत मनोहर व मनन करण्याजोगे आहेत. उदाहरणार्थ कांहीं खालीं उधृत केले आहेत.

"अकालीं वैराग्य प्राप्त झालेल्या तत्त्वज्ञाप्रमाणें क्रीडेच्या असारतेबद्दल स्तब्धपणें विचार करूं लागला."

" ऐहिक मोठेपणाच्या आनुषंगिक जीं संकटें असतात त्यांचा विचार मनांत येत नाहीं. "

" एखाद्या बिनवारशी रस्त्यांतील कुत्र्याप्रमाणें. "

" आईवांचून बांधलेल्या वासराप्रमाणें आंतरिक तळमळ. "

" तो जी समुद्रयात्रा करावयास निघाला होता त्याचा ठाव या तरुण बाल-कालां कोठून लागणार ? "

स्त्रियांचा मुलांबद्दल पक्षपात, भावाभावांतील भांडणें वगैरे प्रसंग उत्कृष्ट साधले नाहींत असें कोण म्हणेल ?

फटिकचें शाळेंतील व घरांतील वर्तन अगदीं स्वाभाविक असेंच दाखविलें आहे.



# १४. प्रायश्चित्त

स्वर्ग व मृत्युलोक ह्यांच्या मध्यंतरीं अनिर्देश्य, अराजक, असें एक स्थान आहे. त्याच ठिकाणीं राजा त्रिशंकू लोंबत आहे व तेथेंच खपुष्पांची उत्पत्ति अमर्याद होते. ह्या विस्तीर्ण देशाचें नांव “ असें असतें तर असें झालें असतें! ”

जें महत्कार्य करून अमर झाले ते धन्य! जे अल्पमति सामान्य जनांप्रमाणें संसारांतील प्रात्यहिक अनेकविध कर्तव्यांमध्यें यथाशक्ति दक्ष असतात तेहि धन्य! पण जे प्रारब्धावर विश्वासून या दोन्ही अवस्थांच्या मध्यें आहेत त्यांना तरणोपाय नाहीं. अमुक झालें असतें तर अमुक झालें असतें, पण तें झालें नाहीं म्हणून यांच्याही हातून कांहींही होणें अशक्य.

आमचे अनाथबंधूही याच कोटींतील एक विधिविडंबित आधुनिक तरुण. सर्वांची खात्री कीं, त्यांनीं मनांत आणिलें तर सर्व कांहीं करूं शकतील. पण त्यांनीं मनांतच कधीं आणिलें नाहीं व हातूनही कांहीं झालें नाहीं. सर्वांचा विश्वास तसाच अचल राहून गेला. सगळ्यांनीं म्हणावें कीं हा परीक्षेंत पहिला नंबर मिळवील पण हे परीक्षेलाच बसेनात! सर्वांची खात्री कीं हे नोकरींत शिरतील तर, ज्या खात्यांत नोकरी करतील त्या खात्यांतील उच्च जागा मिळवतील पण ह्यांनीं चाकरीच कोठें करूं नये! सामान्य लोकांबद्दल ह्यांना तिरस्कार असे. कां? तर ते सामान्य. असाधारण लोकांबद्दलही अनादर, कारण ह्यांनीं मनांत आणिलें असतें तर त्यांच्याहून श्रेष्ठ होतां आलें असतें.

अनाथबंधूंची कीर्ति, प्रतिपत्ति, संपत्ति ह्यांची ठेव असंभाव्यतेच्या उदरीं; संभाव्यतेच्या राज्यांत विधात्यानें त्यांना एक श्रीमान् सासरा व सुशील स्त्री येवढेंच काय तें दिलें होतें. स्त्रीचें नांव विंध्यवासिनी.

बायकोचें नांव अनाथबंधूंना पसंत नव्हतें. रूपानें व गुणांनींही तिला ते आपल्या योग्य समजत नव्हते. पण विंध्यवासिनीला मात्र नवऱ्याबद्दल जो अभिमान वाटत होता त्याला सीमाच नाहीं! आपला नवरा सगळ्यांच्या नवऱ्यांपेक्षां श्रेष्ठ ह्या बाबतींत तिला संदेह नव्हता. मग बाकीच्यांनाही तसें वाटावें

ह्यांत आश्चर्य काय ? आपला गर्व खंडित होणार नाहींना म्हणून ती नेहमीं साशंक असे. तिला जर स्वहृदयांतील अभ्रभेदी भक्तिपर्वताच्या उच्चतम शिखरावर आपल्या पतीची स्थापना करून मृत्युलोकच्या समस्त जनांच्या दृष्टिपातापासून रक्षण करितां आलें असतें तर निश्चिंत मनानें पतिसेवा करण्यांत आयुष्य तिनें घालविलें असतें. पण जड सृष्टींत केवळ भक्तिद्वारा आपल्या उपास्य देवतेला उच्चस्थानीं अढळ ठेवतां येत नाहीं, व अनाथबंधूंना आदर्श पुरुष न समजणारे लोकही कमी नाहींत. ह्याच कारणामुळें विंध्यवासिनीला अनेक दुःखें सोसावीं लागलीं.

अनाथबंधु कॉलेजांत शिकत असतां सासुरवाडीसच राहात होते. परीक्षेची वेळ आली तेव्हां परीक्षेला बसले नाहींत व दुसरे वर्षी कॉलेजही सोडून दिलें. ह्याच कारणामुळें विंध्यवासिनीला सर्वांच्या पुढें मान खालीं घालावी लागे. एके दिवशीं रात्रीं मृदुस्वरानें नवऱ्याला म्हणाली, "परिक्षा दिली असती तर बरें झालें असतें."

अनाथबंधूंनीं तिची हेटाळणी करून हांसून म्हटलें, "परिक्षा दिल्यानेंच योग्यता येते असें नाहीं. आमच्या केदारनाथानें कुठें नाहीं दिली परिक्षा ?"

विंध्यवासिनीचें समाधान झालें. ज्या परीक्षा, देशांतील अनेक गोगर्दभ पास होऊं शकतात, त्या परीक्षा देऊन अनाथबंधूंची योग्यता काय वाढणार ?

यंदा आपला भाऊ पास होऊन त्याला शिष्यवृत्ती मिळाली ही आनंदाची बातमी आपल्या बाल्यसखी विंधीला सांगण्याकरितां एक दिवस कमला विंध्यवासिनीकडे आली.

विंधीच्या मनांत निष्कारण शंका आली कीं कमलेचा आनंद शुद्ध स्वरूपाचा नसून आपल्या नवऱ्याला अनुलक्षून हा टोमणा आहे. म्हणूनच सखीच्या आनंदानें आपण आनंदित न होतां उलट तिच्यावर निर्भर्त्सना केल्याचा आरोप करून भांडणाच्या स्वरांत म्हणाली— "एफ. ए. ची परीक्षा म्हणजे परीक्षेंतच गणना नाहीं. येवढेंच नाहीं तर विलायतच्या बी. ए. च्या खालच्या परीक्षांना परीक्षा

म्हणणें म्हणजे अतिशयोक्ति करणें आहे.” हीं बोलणीं व युक्त्या विंध्या नवऱ्यापासून शिकली होती.

कमला आनंदाची बातमी म्हणून देण्यास आली व आपल्या परम मैत्रिणीच्या तोंडचे हे शब्द ऐकून प्रथम थोडी विस्मित झाली. पण तीहि स्त्रीजातच; तिनें विंध्येच्या मनांतील भाव क्षणांत ओळखिला व भावाचा अपमान सहन न होऊन तिच्याही जिव्हाग्रीं विषबिंदु संचारित झाला. ती म्हणाली—“ आम्ही तर बाई विलायतेला कधीं गेलों नाहीं, कां साहेब नवराही केला नाहीं. आम्हांला हें कसें समजणार ? आम्हीं मूर्ख बायका, आम्हांला आपलें येवढें माहीत कीं बंगाली मुलांना कॉलेजांत जाऊन एफ. ए. व्हावें लागतें. पण ती देखील बाई सगळींच पास होतात असें नाहीं. ”—अगदीं साधेपणानें व प्रेमभावानें इतकें बोलून कमला निघून गेली. कलहविमुख विंध्येनें निमूटपणें ऐकून घेतलें व घरांत येऊन ती हळूहळू रडूं लागली.

थोड्याच दिवसांत आणखी एक गोष्ट घडून आली. एक श्रीमान कुटुंब थोड्या दिवसांकरितां कलकत्त्यास येऊन विंध्यवासिनीच्या माहेरीं उतरलें. ह्यांच्या येण्यामुळें विंध्यवासिनीचे वडील राजकुमारबाबू यांचे येथें बरीच गडबड उडाली. जांवईबुवांचें बसणें उठणें बाहेरच्या थोरल्या दिवाणखान्यांत असे. पाहुण्यांच्या सन्मानाकरितां जांवईबुवांना आपला मुक्काम तेथून हालवून मागल्या एका खोलींत, थोडे दिवसांकरितां उठण्याबसण्याची विनंति करण्यांत आली.

येवढ्याशा गोष्टीवरून अनाथबंधूंना आपला अपमान झालासें वाटलें; प्रथम बायकोजवळ जाऊन तिच्या बापाची निंदा करून तिला रडावयास लाविलें; व मग सासूची खबर घेतली. तदनंतर, भोजन न करणें, वगैरे अनेक प्रबल उपाय योजून आपला अभिमान प्रकाशित करण्याचा उपक्रम केला. हें पाहून विंध्यवासिनी अतिशय लज्जित झाली. ती थोडी अधिक समजदार असल्यामुळें अशा कारणांकरितां सर्वांसमक्ष रुसून बसणें फारच लज्जास्पद आहे असें तिला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. हातीं पायीं पडून रडून कढून मोठ्या कष्टानें तिनें नवऱ्याची कशी तरी समजूत घातली.

विंध्या अविचारी नसल्यामुळें आपल्या आईबापांना तिनें दोष दिला नाहीं. ती ओळखीतच होती कीं गोष्ट अगदीं क्षुल्लक आहे. पण आपला पती सासुरवाडीस राहिल्याकारणानें अनादर होत आहे हें तिच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

त्या दिवसापासून तिनें रोज नवऱ्यापाशीं म्हणावें "मला आपल्या घरीं घेऊन चला, मला येथें राहावेंसें वाटत नाहीं."

अनाथबंधूंत अहंकार यथेष्ट भरला होता, पण आत्मसंभ्रमबोध मुळींच नव्हता. आपण घरीं जाऊन पुन्हा दारिद्र्यांत पडावें असें बिलकुल मनांत येईना. स्त्रीनें थोडी दृढता दाखविली. ती म्हणाली—"आपल्याला यायचें नसलें तर येऊं नये; मी आपली एकटी जाईन."

अनाथबंधू मनांतल्या मनांत खिन्न होऊन आपल्या पत्नीला कलकत्त्याहून दूर एका खेडेगांवीं मातीच्या ठेंगण्या घरांत घेऊन जाण्यास उद्युक्त झाले. निघतेवेळीं राजकुमारबाबू व त्यांची पत्नी यांनीं मुलीला आणखी कांहीं दिवस राहाण्याबद्दल आग्रह केला. पण मुलगी कांहींच न बोलतां खालीं मान घालून बसलेली पाहून त्यांनीं ओळखिलें कीं तिच्या मनांतून राहावयाचें मुळींच नाहीं.

राजकुमारबाबूंना वाईट वाटून त्यांनीं विचारलें—"बाळे, आमच्या बोलण्याचालण्यांत तर कांहीं असें आलें नाहींना कीं तुझ्या मनाला धक्का बसेल ?"

विंध्येनें बापाच्या तोंडाकडे करुण दृष्टीनें बघितलें व म्हणाली—"एक क्षणभरसुद्धां नाहीं. इथें माझे दिवस मोठ्या सुखांत, मोठ्या आदरानें गेले." ती रडूं लागली पण तिचा संकल्प दृढ राहिला.

आईबापांनीं सुस्कारा टाकिला व मनांत म्हणाले कीं कितीका प्रेम, कितीका आदर कराना, लग्न झालें कीं मुली लोकांच्या.

शेवटीं अश्रुपूर्ण नेत्रांनीं सगळ्यांचा निरोप घेऊन जन्मल्यापासून जिथें आनंदानें काळ घालविला तें पितृसद्म, परिजन, व सखीगण ह्यांना सोडून विंध्या पालखींत बसून निघाली.

## —द्वितीय परिच्छेद—

कलकत्त्यांतील श्रीमंतांचें घर व खेडेगांवांतील गृहस्थाचें घर ह्यांत महदंतर; पण विंध्येनें एक दिवस सुद्धां आपल्या बोलण्यानें किंवा वागण्यानें असंतोष दाखविला नाहीं. उल्हासानें सासूला गृहकृत्यांत मदत करूं लागली. त्यांची गरिबी ओळखून बापानें आपल्या खर्चानें तिच्याबरोबर एक दासी पाठविली होती. विंध्येनें सासरीं पोहोंचतांच तिला परत पाठवून दिलें. तिला भय पडलें कीं आपल्या सासरची गरिबी पाहून ही मोठ्या घरची दासी क्षणोक्षणीं नाक मुरडील.

श्रमाचें काम असलें म्हणजे विंध्येला सासू मोठ्या प्रेमानें "राहूं दे तें" म्हणून सांगे, पण विंध्येनें कंटाळा न करितां नेटानें उत्साहानें तें करावें; अशा रीतीनें तिनें सासूची मर्जी संपादिली, येवढेंच नव्हे तर शेजारीपाजारी देखील तिची वाखाणणी करूं लागले.

परंतु ह्याचा परिणाम सर्वस्वीं संतोषजनक असा झाला नाहीं. ईश्वरी न्याय नीतिबोधपाठावलीच्या प्रथम भागाप्रमाणें सोप्या भाषेंत लिहिलेली उपदेशावली नव्हे. निष्ठुर विघ्नप्रिय सैतान मध्येंच नीति-सूत्रांत घोटाळा घातल्यावांचून राहात नाहीं, म्हणूनच नेहमीं चांगल्या कार्याचें फळ चांगलें होईलच असें नाहीं. अनाथबंधूला एक मोठा व दोन धाकटे भाऊ होते. वडील भाऊ परगांवीं नोकरीवर असे व महिन्याच्या काठीं तो जे पन्नास रुपये पाठवी त्याच्यापर सर्व प्रपंच व धाकट्या भावांचें शिक्षण चालत असे.

हें सांगावयासच नको कीं आजकालच्या दिवसांत पन्नास रुपयांत प्रपंच चालविणेंही कठीण, पण थोरल्या भावाच्या बायकोला गर्व करावयाला पुष्कळ होतें. तिचें नांव श्यामशंकरी. नवरा वर्षभर नोकरींत निमग्न, तेव्हां हिला सालभर विश्रांती घ्यायला अधिकार अर्थात् आलाच. कोणत्याही कामाला हिनें हात लावूं नये. येवढेंच नव्हे तर मिळवत्या नवऱ्याची बायको म्हणून घरां-तल्या सगळ्यांनीं जणूं काय हिचे उपकार मानले पाहिजेत.

विंध्यवासिनी सासरीं येऊन गृहलक्ष्मीप्रमाणें रात्रंदिवस गृहकृत्यांत निमग्न असे ह्याचमुळें श्यामाच्या हीन हृदयांत तिजबद्दल हेवा उत्पन्न झाला.

असें कां हें समजणें कठीण आहे. बहुधा थोरल्या जावेला वाटलें कीं, आपली धाकटी जाऊ मोठ्या घरची असून मी घरांतील हलकें सलकें सुद्धां काम करित्यें हें लोकांना दाखवून लोकांत माझी नाचक्की करूं पहात आहे. कारण कांहींहि असो, महिना पन्नास रुपये मिळविणाऱ्याच्या बायकोला श्रीमंताच्या घरची आपली जाऊ शत्रुवत् भासूं लागली. तिला वाटे ही नम्रतेचा मोठा दिमाक दाखवीत आहे.

इकडे अनाथबंधू गांवांत आल्यानंतर त्यांनीं पुस्तकालय स्थापित केलें, दहावीसजण शाळेंतील मुलें जमा करून त्यांचे अध्यक्ष बनून सभेचा समाचार वर्तमानपत्रांना तारेनें पाठविण्याचा क्रम सुरू केला. येथपर्यंत कीं कांहीं इंग्रजी पत्रांचा खास बातमीदार बनून गांवच्या लोकांना चकित करून सोडलें. पण गरिबीच्या प्रपंचाला एक पैसासुद्धां तो मिळवून आणिना. उलट खर्च मात्र वाढत चालला.

'एखादी नोकरी पत्करावी' म्हणून विंध्येनें एकसारखी टोंचणी लाविली. त्यानें तें ऐकलें न ऐकलेंसें करावें.

बायकोला सांगावें कीं, "माझ्या योग्य नोकरी नाहीं, असें नाहीं परंतु ब्रिटिश सरकार पक्षपात करून सगळ्या मोठमोठा जागांवर इंग्रजांना नेमितें; शेंकडों बंगाली योग्य असले तरी त्यांना आशा नाहीं."

श्यामशंकरी आपल्या दिराला व जावेला उद्देशून प्रत्यक्ष अप्रत्यक्ष रीतीनें वाग्बाणांचा वर्षाव करूं लागली. मोठ्या गर्वानें आपल्या गरिबीचा उल्लेख करून तिनें म्हणावें "आम्ही गरीब माणसें, थोरामोठ्यांची मुलगी, श्रीमंत सासऱ्याचे जांवई, यांचें पोषण आमच्यानें कसें व्हावयाचें ? तिथें होतां ते सुखांत होतां. कोणत्याही प्रकारचें दुःख नव्हतें. इथें डाळभात खाऊन इतके कष्ट सोसायला कुणीं सांगितलें ?"

सासू थोरल्या सुनेला भीत असे. दुर्बल पक्षाच्या बाजूनें बोलण्याचें साहस तिच्यानें होत नसे. धाकटी जाऊ पन्नास रुपये महिन्याचा डाळभात व थोरल्या जावेचीं घालून पाडून बोलणीं गिळून पचवूं लागली.

दरम्यान अनाथचे वडील बंधू थोड्या दिवसांच्या सुटींत घरीं आले. बायकोचें त्वेष आणणारें तें गुणसंपन्न वक्तृत्व रोजच्या रोज ऐकून अगदीं त्रासून गेले. शेवटीं रोजच्या रोज झोपेला व्यत्यय येऊं लागलासें पाहून एके दिवशीं अनाथला बोलावून शांतपणानें व प्रेमानें सांगितलें—"तुला एकादी नोकरी पाहिली पाहिजे. माझ्या एकट्याच्यानें प्रपंचाचें ओझें कसें झेपतां येईल?" अनाथबंधू, पादाहत सर्पाप्रमाणें क्रुद्ध झाला, मनांत म्हणाला "दोन घास जाडया भाताकरितां हीं बोलणीं सोसून घ्यावीं लागतात." तत्क्षणीं बायकोला घेऊन सासुरवाडीस जाण्याचा संकल्प त्यानें केला; पण बायको कांहीं केल्या तयार होईना. थोरल्या भावाच्या अर्ध्या भाकरीवर व भावजयीच्या शिव्यांवर धाकट्या भावाचा हक्क आहे पण सासुरवाडीं राहणें फारच लाजिरवाणें आहे. विंध्यवासिनीला वाटे, सासरीं एखाद्या दीन, हीनाप्रमाणें नम्र होऊन राहणें पत्करलें, पण बापाच्या घरीं किंमत ठेवून घेऊन मान वर करून आपल्याला चालतां यावें.

या सुमारास तेथील हायस्कुलांत तिसऱ्या शिक्षकाची जागा रिकामी झाली. अनाथचे बंधू व विंध्या यांनीं ती जागा पत्करण्याबद्दल एकसारखी टोंचणी सुरू केली. त्याचा परिणाम उलटच झाला. आपला सख्खा भाऊ व आपली धर्मपत्नी अशा तुच्छ जागेला आपणास योग्य समजतात हें पाहून त्याला अधिकच चीड आली व प्रपंचाबद्दल जास्तच वैराग्य आलें. तो लक्ष देईनासा झाला.

हें पाहून त्याच्या थोरल्या भावानें त्याचा हात धरून चार समजुतीच्या गोष्टी सांगून मोठ्या प्रयासानें त्याला शांत केलें. सगळ्यांची खात्री झाली कीं तूर्त याला कांहीं एक सांगण्याची सोय नाहीं. कसें तरी करून ही स्वारी घर सोडून गेली नाहीं म्हणजे मिळविलें.

सुट्टी संपतांच, थोरला भाऊ चाकरीवर गेला. शामानें क्रोधानें गाल फुगवून तोंडाचें एक कुदर्शनचक्रच बनविलें म्हटलें तरी चालेल. अनाथ विंध्येजवळ येऊन म्हणाला—"आजकाल विलायतेला गेल्यावांचून चांगली नोकरी मिळण्याचा संभव नाहीं. मी विलायतेला जाण्याचें मनांत आणिलें आहे. तूं बापापासून कांहींना कांहीं निमित्तानें पैसे घेऊन ये."

एक तर विलायतला जाण्याचें ऐकून तिला आकाश कोसळल्याप्रमाणें झालें, पुन्हा बापापासून कोणत्या निमित्तानें भिक्षा मागावी हें सुचेना, म्हणून मनांत फार खजिल झाली.

अनाथाला सासऱ्यापाशीं स्वतः पैसे मागण्यांत अपमान वाटूं लागला, पण मुलीनें बापापासून छल, कपट करून पैसे कां आणूं नये हें समजेना. अनाथ कांहींना कांहीं कारणांनीं बायकोवर रागावूं लागला. विंध्या मनांतल्या मनांत कुढून आंथरुणावर बसून रडे.

अशा रीतीनें कांहीं दिवस मोठ्या कष्टाचे गेले. शेवटीं अश्विनाचा महिना आला. दुर्गापूजेचे दिवस अगदीं जवळ आले. मुलीला व जावयाला आदरानें आमंत्रण करावें म्हणून राजकुमारबाबूंनीं, यानवाहनादि बरोबर देऊन माणूस पाठविला. एक वर्षानें मुलगी पतीसह पुन्हां घरीं आली. श्रीमंतांच्या घरचा तो सत्कार नको नकोसा झाला. ह्या खेपेला जावयाची बरदास्त पहिल्यापेक्षां अधिक ठेविली होती. विंध्यवासिनी ही फारा दिसांनीं डोक्यावरील पदर काढून अहर्निश स्वजनांसहित उत्सवांत रंगून गेली.

आज षष्ठी, उद्यां सप्तमी; उद्यांपासून पूजेला आरंभ होणार. जिकडे तिकडे धांदल, गडबड, सुरू झाली. दूरच्या जवळच्या नातेवाईकांनीं खोलीन् खोली भरून गेली. ते दिवशीं रात्रीं विंध्येला थकल्यामुळें गाढ झोंप लागली. पूर्वीं ज्या खोलींत निजत ती ही खोली नव्हती. या खेपेस त्यांचा जास्त मान ठेवावयाचा म्हणून आईनें आपली स्वतःची निजावयाची खोली रिकामी करून दिली होती. अनाथबंधू केव्हां येऊन निजले त्याची वार्ताही तिला नव्हती. ती त्या वेळेस गाढ निद्रेंत होती. मोठ्या पहाटेस सनई वाजूं लागली परंतु थकल्याभागल्यामुळें विंध्या जागी झाली नाहीं. विंध्येच्या दोघी मैत्रिणी कमल व भुवन खोलीच्या दारापाशीं येऊन आडून ऐकण्याचा प्रयत्न करीत होत्या. पण आपला प्रयत्न निष्फळ झालासें पाहून त्यांना जें हसूं आलें त्या हसण्याच्या आवाजामुळें विंध्या खडबडून उठली. नवरा केव्हां उठून गेला हें तिला माहीत सुद्धां पडलें नाहीं. लाजली. पलंगावरून उतरली आणि पहाते तों आईची तिजोरीची पेटी उघडी! त्यांत बंडलांची कॅशबॉक्स असे तीही नाहीं!

लगेच तिला आठवण झाली कीं काल संध्याकाळीं आईच्या किल्ल्यांचा जुडगा हरवला म्हणून जिकडे तिकडे बोभाटा झाला होता. ज्यानें किल्ल्या चोरल्या त्यानेंच हें काम केलें यांत शंका राहिली नाहीं. एकदम मनांत आलें कीं त्या चोरापासून आपल्या नवऱ्याला कांहीं इजा तर पोहोंचली नसेलना? छातींत धस्स झालें. इकडे तिकडे बघते तों पलंगाच्या पायापाशीं किल्ल्यांच्या जुडग्याखालीं एक चिठी ठेविलेली.

चिठी नवऱ्याच्या हातची. उघडून वाचून पाहिली. नवऱ्यानें विलायतेस जाण्याकरितां आपल्या मित्रापासून भाड्यापुरते पैसे घेतले, पण तेथील खर्चाकरितां कांहीं उपाय न सुचल्यामुळें गेल्या रात्रीं सासऱ्याचे पैसे अपहरण करून व्हरांड्यांतील जिन्यानें बागेंत उतरून विलायतेस जाण्याकरितां पलायन केलें आहे व आजच पहाटेस बोट रवाना झाली.

पत्र वाचून विंध्यवासिनीच्या शरीरांतील सर्व रक्त गोठून गेलें. तत्क्षणीं ती पलंगाच्या खुराला धरून खालीं बसली. तिच्या शरीरांत-कर्णकुहरांत काल रात्रींच्या झिल्लिखाप्रमाणें शब्द होऊं लागला. त्यांतच अंगणांत शेजारीं-पाजारीं दूरदूरच्या अट्टालिकांमधून शेंकडों सनया वाजूं लागल्या, जणूं काय सर्व वंग देश आनंदानें डोलत आहे.

शरदृतूंतील उत्सवहास्य-रंजित रवि-किरणांनीं कौतुकानें शयनगृहांत प्रवेश केला. दिवस इतका वर आला तरी उत्सवाच्या दिवशीं खोलीचें दार बंद पाहून, भुवन आणि कमल या दोघींनीं हंसत हंसत व दारावर अंगुलीनें प्रहार करीत करीत विंध्येला हांक मारण्यास सुरवात केली. तेवढ्यानेंही कोणीं उत्तर देत नाहीं असें पाहून किंचित् भय पावून उच्च स्वरानें ‘ बिंदी ’ ‘ बिंदी ’ म्हणून हाक मारूं लागल्या.

विंध्यवासिनी कंठ दाटल्यामुळें घोगऱ्या शब्दानें म्हणाली “मीं येत्यें, तुम्ही आतां जा.” आपली सखी अस्वस्थ आहे अशी शंका येऊन त्यांनीं आईला बोलावून आणिलें. आई म्हणाली “ बिंदू, काय होत आहे बाळ; इतका वेळ दार बंद कां?” विंध्या अश्रु निरुद्ध करून म्हणाली “एकदां बाबांना बरोबर

घेऊन ये बरें." आई फारच घाबरली. राजकुमारबाबूंना दारापाशीं घेऊन आली. विंध्येनें दार उघडून ते आंत आल्याबरोबर घाईघाईनें दार बंद केलें.

विंध्येनें जमिनीवर लोळण घेतली, बापाचे पाय धरले, ऊर पिटून रडत रडत म्हणाली "बाबा, क्षमा करा, मी तुमच्या तिजोरींतून पैसे चोरले आहेत!" त्यांच्या तोंडांतून शब्द निघेना. बिछान्यावर तसेच बसले. विंध्या म्हणाली कीं, "यजमानांना विलायतला पाठविण्याकरतां मी हें काम केलें आहे." बाप म्हणाला "आमच्यापाशीं कां नाहीं मागितलेस?"

विंध्या म्हणाली "विलायतला जाण्यांतच विघ्न आणाल म्हणून." राजकुमारबाबू फार रागावले. आई रडूं लागली, मुलगी रडूं लागली. कलकत्त्यांतील सर्व मंगल वाद्यें बेसूर मासूं लागलीं.

ज्या विंध्येनें बापापाशींही कधीं प्रार्थना करूं नये, जी स्त्री आपल्या पतीचा उणेपणा अत्यंत जवळच्या माणसापासूनही गुप्त राखण्याकरितां प्राण खर्ची घालण्यास तयार, तिचा आज एकाएकीं उत्सवप्रसंगीं जनतेमध्यें पत्नी-अभिमान, पितृवात्सल्य, आत्ममर्यादा, चूर्णित होऊन प्रिय, अप्रिय, परिचित, अपरिचित–सर्वांचे लत्ताप्रहार–पादाहत धूलीप्रमाणें निमुटपणें सहन करण्याची तिला पाळी यावी! पूर्वींपासून बेत करून मोठ्या प्रयत्नानें किल्ल्या चोरून बायकोच्या सहाय्यानें चोरी करून रातोरात अनाथबंधू विलायतेस पळून गेले म्हणून आत्मीयजनपरिपूर्ण, कुटुंबवत्सल घरामध्यें जिकडे तिकडे चर्चा सुरू झाली. दाराजवळ उभें राहून भुवन, कमल, आणखी अनेक स्वजन प्रतिवेशी दासदासी सर्व ऐकत होते. जावयांच्या लावून घेतलेल्या खोलींत यजमान यजमानिणीला उत्कंठित मनानें प्रवेश करितांना पाहून सर्वजण कुतूहलानें व साशंक मनानें व्यग्र होऊन तेथें जमले.

विंध्येनें कोणाला तोंड दाखविलें नाहीं. दार बंद करून कांहीं न खातां बिछान्यावर पडून राहिली. तिच्याबद्दल कोणालाही वाईट वाटलें नाहीं. हें कपटजाल रचणारीच्या दुष्ट बुद्धीबद्दल सर्वांना विस्मय वाटला. सगळ्यांना वाटूं

लागलें कीं केवळ अवसर न मिळाल्यामुळें विंध्येचें चरित्र अप्रकाशित राहिलें. आनंदशून्य घरामध्यें पूजेचा उत्सव कसा तरी पार पडला.

—तृतीय परिच्छेद—

अपमानानें व विषादानें मान खालीं घालून विंध्या सासरीं परत आली. सांप्रत पुत्रविरहकातरा सासू व पतिविश्लेष विधुरा वधू ह्यांचा संयोग अधिकच दृढ होत चालला. दोघीही एकमेकीला जवळ झाल्याकारणानें शोकतरूच्या छायेखालीं निमूटपणें व मोठ्या सहिष्णुतेनें घरांतील तुच्छतम कामकाज सुद्धां स्वहातांनीं करूं लागल्या. सासू जितकी जवळ झाली तितकीं आईबापें दूर झालीं. विंध्येला वाटावें सासू दरिद्री तशी मीही दारिद्र्यग्रस्त. आम्ही सम-दुःखी, एक बंधनानें बद्ध; पितामाता ऐश्वर्यशाली, त्यांच्या आमच्या स्थितींत महदंतर. एक तर दरिद्री म्हणून विंध्या त्यांच्यापासून बहुत दूर. त्यांतच चोरी स्वीकारल्यामुळें जास्तच दूर. पुत्रवात्सल्य, येवढा पार्थक्यभार सहन करूं शकतें कीं नाहीं हें सांगणें कठीण!

अनाथबंधू विलायतेला गेल्यावर प्रथम प्रथम रीतसर पत्रें पाठवीत. पण हळूहळू पत्र पाठविणें कमी होत गेलें व मजकुरांत अवहेलनेची छटा अल-क्षित भावें प्रकाशित होऊं लागली. त्यांच्या गृहकार्यरत पण अशिक्षित अशा स्त्रीच्या मानानें विद्या—बुद्धि—रूप—गुणांनीं अत्यंत श्रेष्ठ अशा आंग्ल कुमारी अनाथबंधूंना सुयोग्य, सुबुद्धि, सुस्वरूप समजून आदर करूं लागल्या. अशा स्थितींत, एकवस्त्र परिधान केलेली अवगुंठनवती अगौरवर्णा आपली स्त्री कोणत्याही प्रकारें आपल्याला योग्य नाहीं असें जर अनाथबंधूंना वाटलें तर त्यांत नवल काय? तथापि जेव्हां पैशाची पंचाईत पडली तेव्हां ह्याच बंगाली मुलीला तार करितांना अनाथबंधूंना संकोच वाटला नाहीं व ह्याच बंगाली मुलीनें दोन्ही हातांत दोन दोन काचेच्या बांगड्या ठेवून अंगावरचे सर्व दागिने विकून पैसे पाठविले. खेडेगांवीं सुरक्षितपणें ठेवण्याजोगें ठिकाण नस-णार म्हणून तिचे सर्व मूल्यवान् दागिने माहेरीं होते. सासरहून कुठें कुठें जावें लागतें म्हणून बहाणा करून एकेक करून सर्व दागिने तिनें आणविले.

शेवटीं हातांतले वाळे, रुप्याच्या बांगड्या, बनारसी साडी व शालसुद्धां विकली व मोठ्या नम्रतेनें विनवणी करून, अश्रुजलानें पत्राची प्रत्येक ओळ विकृत करीत करीत नवऱ्याला परत येण्याबद्दल आग्रहानें विनंती केली.

अखेर अनाथबंधू, शेंडी कापलेली, दाढी वाढविलेली, कोट पाटलोण घातलेले बॅरिस्टर बनून कलकत्त्यास येऊन दाखल झाले. हॉटेलांत उतरले. वडिलोपार्जित घरीं उतरणें शक्यच नव्हतें. एक तर योग्य ठिकाण नाहीं. दुसरें गांवच्या लोकांनीं दरिद्री कुटुंबांतील भावांना वाळींत टाकिलें तर फारच जड जाईल. सासुरवाडीचीं माणसें पडलीं आचारनिष्ठ हिंदू. त्यांच्या येथेंही या जातिभ्रष्टाला आश्रय मिळणें कठीण. पण—

पैशाच्या अभावामुळें लवकरच हॉटेल सोडून घर घ्यावें लागलें. पण त्या घरीं बायकोला आणणें प्रशस्त वाटलें नाहीं. विलायतेहून आल्यापासून दोन तीनदां आईला व बायकोला भेटण्याकरितां म्हणून स्वारी काय ती आली; ह्या शिवाय त्यांची गांठ नाहीं.

दोघाही शोकाकुल स्त्रियांना सांत्वनाला एक जागा होती. अनाथबंधू आपल्या देशांत, आत्मीयांपासून फार दूर नाहीं अशा ठिकाणीं होते. त्याच्याचबरोबर अनाथबंधूंच्या अलौकिक बॅरिष्टरी कीर्तीमुळें त्यांच्या गर्वाला सीमाच उरली नव्हती. विंध्यवासिनी आपण आपल्या यशस्वी पतीला योग्य नाहीं असें समजून स्वतःचा धिःकार करूं लागली; पण इकडे गर्वही करीत होती. ती एकीकडे दुःखानें पीडिलेली तर एकीकडे गर्वानें फुगलेली. म्लेंच्छ आचाराबद्दल तिला तिटकारा असे पण नवऱ्याला पाहून तिनें म्हणावें—"आजकाल साहेबासारखे वागणारे लोक कांहीं थोडे नाहींत. त्यांतून आमच्या इथल्यासारखा साहेबी पोशाक कोणालाच शोभत नाहीं. जसे कांहीं थेट विलायती साहेब. बंगाली म्हणून कोणाला ओळखावयाचें सुद्धां नाहीं."

घरचा खर्च चालविणें जेव्हां कठीण झालें तेव्हा अनाथबंधूंनीं मनांत ठरविलें कीं या अभिशापित भारतवर्षांत गुणांची कदर नाहीं; समव्यवसायी ईर्षावश होऊन आपल्या उन्नतीच्या मार्गांत गुप्त रीतीनें अडचणी आणीत

आहेत. जेवणाच्या रिकाबींमधून आमिषाहारापेक्षां उद्भिज आहाराचें परिमाण वाढत चाललें, दग्ध कुक्कुटाचें स्थान भाजलेल्या माशांनीं पटकाविलें, कपड्यांचा कडकडीतपणा कमी झाला, क्षौरमसृण मुखावरील गर्वोज्वलित तेजस्विता म्लान झाली, तीव्र निषादांत मिळविलेली जीवनतंत्री क्रमाक्रमानें कोमल मध्यमापर्यंत उतरली. अशा वेळीं राजकुमारबाबूंच्या परिवारांत एक दुर्घटना घडून आली. तिच्यामुळें अनाथबंधूंच्या जीवनक्रमांत मोठेंच परिवर्तन घडलें. राजकुमारबाबूंचा एकुलता एक मुलगा हरकुमार स्त्रीपुत्रांसह नावेंत बसून मातुलगृहाहून परत येत असतां नावेला अपघात होऊन स्त्रीपुत्रांसह बुडून मेला. ह्या घटनेमुळें राजकुमारबाबूंच्या वंशात विंध्यवासिनीखेरीज नजीकचें कोणीच उरलें नाहीं.

हा दारुण शोकाग्नि किंचित् शांत झाल्यावर राजकुमारबाबू अनाथबंधूंकडे जाऊन म्हणाले, " बाबा, तुम्हांला प्रायश्चित्त घेऊन जातींत आलें पाहिजे. तुमच्याशिवाय मला आतां कोणी नाहीं. " अनाथबंधूंनीं उत्साहानें संमती दिली. मनांत म्हणाले—" बार लायब्ररींत पडून राहणारे जे स्वदेशी बॅरिस्टर आपली ईर्षा करितात व आपल्या अलौकिक बुद्धीमत्तेबद्दल योग्य सन्मान करीत नाहींत त्यांची खोड मोडण्याला अन्य उपाय नाहीं."

राजकुमारबाबूंनीं शास्त्रीमंडळींचा अभिप्राय घेतला; त्यांनीं कळविलें कीं, अनाथबंधूंनीं विलायतेंत गोमांस भक्षण केलें नसल्यास त्यांना जातींत घेण्यास हरकत नाहीं. विदेशीं असतां उपर्युक्त निषिद्ध चतुष्पादाचें मांस ह्यांच्या प्रिय खाद्यांपैकीं जरी होतें तरी त्याचा अस्वीकार करण्यांत यांना मुळींच संकोच वाटला नाहीं. आपल्या प्रिय मित्रापाशीं म्हणाले—"समाज जर जाणून बुजून खोटी गोष्ट बोलावयाला सांगत आहे तर थोडेसें खोटें बोलून त्याला अनुकूल करून घेण्यांत मला कांहींच दोष दिसत नाहीं. ज्या रसनेनें पशुभक्षण केलें, त्या जिव्हेकडून अनृत भाषण, गोमयादि निंद्य पदार्थ भक्षण करवून शुद्ध करून घेणें ही जी आमच्या आधुनिक समाजांतील परिपाठी ती मी मोडूं इच्छित नाहीं."

प्रायश्चित्त करून समाजांत प्रवेश करण्याकरितां एक शुभ दिवस निश्चित झाला. अनाथबंधू केवळ धोतर उपरणें वापरूं लागले, इतकेंच नव्हे तर उपदेश, तर्कादिद्वारा विलायती समाजाच्या तोंडाला कजल व हिंदु समाजाच्या तोंडाला चुना फासूं लागले ह्यामुळें सर्वांना आनंद झाला.

आनंदानें व गर्वानें विंध्यवासिनीचें प्रीतिसुधासिंचित कोमल हृदय उच्छ्वसित होऊन गेलें. ती मनांतले मनांत म्हणाली, " विलायतेहून जे जे येतात ते अगदीं साहेब बनून येतात, बंगाली म्हणून ओळखणें सुद्धां कठीण. पण आमचे स्वामी अगदीं विकारहीन मनानें आले आहेत, येवढेंच नव्हे तर त्यांची हिंदुधर्मावरील श्रद्धा पूर्वीपेक्षां अधिकच वाढली आहे."

ठरलेल्या दिवशीं राजकुमारबाबूंचें घर शास्त्रीपंडितांनीं भरून गेलें. खर्चाच्या बाबतींत मुळींच काटकसर केलेली नव्हती. भोजन व दक्षिणा यांची योजनाहि ठीक झाली होती.

बायकांतही गडबडीला पारावर नव्हती. निमंत्रित परिजनांना वाढण्याच्या व स्वागताच्या धांदलीनें अंगणापर्यंत सर्व घर गजबजून गेलें होतें. त्या कोलाहलपूरित कर्मराशीमध्यें विंध्यवासिनी प्रफुल्ल मुखानें शरत्प्रभारांजित, प्रभातवाताहतकंपित लघुमेघखंडाप्रमाणें आनंदानें इतस्ततः परिभ्रमण करीत होती. आजच्या सर्व संसारघटनेचा नायक तिचा पती. जणुं काय सर्व बंगाल ही रंगभूमी असून अनाथबंधूला प्रेक्षकगणांसमोर जवनिकोद्घाटनानंतर प्रविष्ट करणार आहे. प्रायश्चित्त म्हणजे अपराधस्वीकार, पण तो अनुग्रह समजला जात आहे. अनाथ विलायतेहून येऊन हिंदु समाजांत प्रवेश करीत आहे, म्हणजे जणूं काय हिंदु समाजाचा गौरव करीत आहे; जणूं काय ती गौरवछटा समस्त देशांतून सहस्ररश्मीकडून विच्छुरित होऊन विंध्यवासिनीच्या प्रेमप्रमुदित मुखावर अपरूप महिमाज्योति चमकत आहे. आजपर्यंतच्या तुच्छ जीविताचें समस्त दुःख व अपमान दूर होऊन ती आज जनाकीर्ण पितृगृहीं सकल बंधुबांधवांसमोर वर मान करून गौरवाच्या आसनावर आरूढ झाली आहे. स्वामीच्या महत्त्वानें आज त्या अयोग्य स्त्रीला संसारामध्यें सन्मानास्पद केलें आहे.

प्रायश्चित्तविधी समाप्त झाला. अनाथबंधू जातींत आले. अभ्यागत, बंधुबांधव, स्वजन अनाथबंधूंच्या पंक्तीला बसून यथेष्ट भोजन करिते झाले. आत्मीय स्त्रियांनीं जावयांना बघण्याकरितां घरांत बोलाविलें. जावई प्रसन्न मनानें तांबूल चर्वण करीत करीत हास्यमुखानें आलस्यमंथरगतीनें उपवस्त्र जमिनीवर लोळवीत लोळवीत अंतःपुरयात्रा करिते झाले.

भोजनोत्तर ब्राह्मणांना दक्षिणा देण्याची व्यवस्था चालली होती. ब्राह्मणसभेमध्यें, ब्राह्मण मंडळी आपआपला पक्ष वादानें स्थापित करून पांडित्य दाखवीत आहेत; यजमान क्षणभर विश्रांती घेण्याकरितां पंडितसभेंत बसून पूर्वपक्ष उत्तरपक्ष ऐकत बसले आहेत; इतक्यांत पहारेवाल्यानें येऊन यजमानांच्या हातांत एक कार्ड देऊन म्हटलें—" एक साहेबाची मडम आली आहे."

राजकुमारबाबू दचकून उठले. कार्डाकडे पाहिलें. त्याच्यावर इंग्रजींत लिहिलें होतें—" मिसेस अनाथबंधू सरकार," अर्थात् अनाथबंधूंची स्त्री.

राजकुमारबाबू बराच वेळ त्या अक्षरांकडे बघत राहिले. पण ह्या नेहमींच्या शब्दांचें अर्थग्रहण करूं शकले नाहींत. ह्याच वेळीं विलायतेहून सद्यःप्रत्यागता, आरक्तकपोला, आताम्रकुंतला, आनीललोचना दुग्धफेनशुभ्रा, हरिणगति एक आंग्ल महिला सभास्थलीं उपस्थित झाली. प्रत्येकाकडे पाहूं लागली, पण परिचित प्रियमुख दृष्टीस पडेना. अकस्मात् प्राप्त झालेल्या त्या मडमिणीला पाहून सर्व तर्कवितर्क एकाएकीं थांबला. सभा स्मशानाप्रमाणें निस्तब्ध गंभीर झाली.

अशा समयीं भूमिलुंठ्यमान उपवस्त्र परिधान केलेल्या आलस्यमंथरगामी अनाथबंधूंनीं रंगभूमीवर पुन्हां प्रवेश केला. एका क्षणांत त्या आङ्ग्ल महिलेनें धावत जाऊन त्यांना आलिंगन देऊन त्यांचा तांबूलरागरक्त अधरोष्ठ दांपत्यसंयोगचुंबनचिन्हांनीं मुद्रित केला.

ते दिवशीं सभास्थळीं आणखी संहितापाठ होऊं शकला नाहीं—

  

*** या कथेचा प्रारंभ व शेवट दोन्हीही चित्ताकर्षक आहेत. गेल्या २० वर्षांत युरोपशीं दळणवळण वाढल्यामुळें गोष्टीचें स्वारस्य किंचित् कमी झाल्यासारखें आहे; तथापि अनाथबंधू व त्यांच्या पत्नी हीं दोनही पात्रें समाजांत आज-मितीसही आढळून येण्याजोगीं आहेत. कथा गद्यात्मक असली तरी कवित्वानें ओतप्रोत भरलेली आहे.

"तिला जर स्वहृदयांतील अभ्रभेदी भक्ति-पर्वताच्या—" इ.

"त्या कोलाहलपूरित कर्मराशीमध्यें......जणूं काय बंगाल अनाथबंधूला प्रेक्षकगणासमोर जवनिकोद्घाटनानंतर प्रविष्ट करणार आहे."

"याच वेळीं सद्यःप्रत्यागता, आरक्तकपोला......आंग्ल महिला उपस्थित झाली." इ. कवित्वाचीं उत्तम उदाहरणें आहेत.

या कथेंतील पात्रांचें स्वभाववर्णन कवीनें आपल्या नेहमींच्या पद्धतीला अनुसरून सिद्धांतरूपानें न करितां त्यांच्या उद्गारावरून व संभाषणानें सूचित केलें आहे. ही गोष्टही तरुण मुलामुलींना बोधप्रद होण्याजोगी आहे.



# १५. पोष्टमास्तर

नोकरीच्या सुरवातीलाच पोष्टमास्तरांची नेमणूक उलापूर गांवीं झाली. जवळच एक निळीचा कारखाना होता. त्याचा मालक एक इंग्रज साहेब होता. त्याच्याच खटपटीनें ह्या गांवीं पोष्ट ऑफिसची स्थापना झाली.

गोष्टीचा नायक पोष्टमास्तर कलकत्त्याचा एक तरुण रहिवाशी. ह्या गांवीं येण्यानें पोष्टमास्तरची स्थिती पाण्यांतून काढलेल्या माशाप्रमाणें झाली. एका अंधेऱ्या झोंपडींत त्याचें ऑफिस असे. जवळच एक लहानसें डबकें असून सभोवतीं दाट जंगल. कारखान्यांतील लोकांना प्रायः फुरसतच नसे. व ते एखाद्या सभ्य गृहस्थाला मिळून मिसळून वागण्याला योग्यही नव्हते.

विशेषतः कलकत्त्याच्या मुलांना मिळूनमिसळून वागतां येत नाहीं. अपरिचित ठिकाणीं ते उद्धटच समजले जातात, किंबहुना त्यांचें तेज पडत नाहीं. ह्याच कारणांनीं स्थानिक लोकांशीं त्याचें संघटन नव्हतें. त्याला ऑफिसचें कामही फारसें नव्हतें. कधीं कधीं तो एखाद दुसरी कविता लिहिण्याचा प्रयत्न करी. बोलतांना त्यानें म्हणावें कीं, दिवसभर तरुपल्लवांचें कंपन व आकाशांतील मेघांकडे पहाण्यांत आयुष्य घालविणें किती तरी सुखदायक! पण अंतर्यामीं त्याला वाटे कीं अरबी भाषेंतील गोष्टीप्रमाणें एखादा राक्षस येऊन हें सर्व अरण्य उध्वस्त करून टाकून जिकडे तिकडे पक्के रस्ते व गगनमंडळभेदी उंच उंच इमारती निर्माण करून मेघमंडल दृष्टीआड करून टाकील तर मजसारख्या अर्धमृत भद्र पुरुषाला नवजीवनाचा लाभ करून दिल्याप्रमाणें होईल.

पोष्टमास्तरचा पगार फारच कमी. त्याला हातांनीं स्वयंपाक करावा लागे. तेथलीच एक अनाथ पोर त्याचें कामकाज करी, तिला उरलेंसुरलें देत असे. तिचें नांव रतन. तिचें वय बारातेरा वर्षांचें. लग्नाची फारशी आशा नव्हती.

संध्याकाळचे वेळीं गावांतील घरांतून कुंडलाकार धूर निघत असे. ठिकठिकाणीं रातकिडा किर्र शब्द करूं लागला. बाऊलपंथी याचक करताळ वाजवून मोठमोठ्यानें गाऊं लागला. ज्यानें वेळूंच्या पल्लवांचें कंपन निरीक्षण केलें आहे अशा कवीचें हृदय उत्कंठित झालें आहे; अशा समयीं पोष्टमास्तरनें घरांत एका कोपऱ्यांत मिणमिण जळणारा एक दिवा लावून "रतन" म्हणून हांक मारिली. रतन दाराबाहेर बसून ह्याच हाकेची वाट पहात होती. पण एका हाकेसरशी ती घरांत जाऊन विचारी " बाबू, हाक मारलीत ? " पोष्टमास्तरनें विचारावें " तूं काय करीत आहेस ? "

रतन—" मला चूल पेटवावयाची आहे. "

पोष्टमास्तर—" मग होईल तुझें चूल पेटवणें, आधीं एवढी चिलीम तयार कर बघूं. "

थोडक्याच वेळांत गाल फुगवून विस्तवाला फुंकर घालीत घालीत रतन आली. हातांत चिलीम घेऊन ओढीत ओढीत पोष्टमास्तरनें विचारलें—" कां ग रतन, तुला तुझी आई आठवते काग ? " रतनला कांहीं कांहीं आठवे–कांहीं कांहीं आठवत नसे. आईपेक्षां बाप तिच्यावर अधिक प्रेम करी. बापाची थोडी थोडी आठवण असे. कामावरून बाप संध्याकाळीं घरीं येई अशा एक दोन वेळा तिच्या स्मृतिपटलावर स्पष्ट उमटल्या होत्या. बोलत बोलत ती मास्तरच्या पायाच्या बाजूला जमिनीवर बसे. तिला आपल्या धाकट्या भावाची आठवण होई—पुष्कळ दिवसांपूर्वी पावसाळ्यांत एके दिवशीं डबक्याकाठीं झाडाची फांदी मोडून मासे धरण्याचा खेळ आपण कसें खेळत होतों ह्याची तिला चांगली आठवण होती. मोठमोठ्या घटनांपेक्षां ह्याच लहान सहान गोष्टींची तिला आठवण होई. पुष्कळदां बोलतां बोलतां फार रात्र होई, मग ह्यापुढें स्वयंपाक करण्याचा पोष्टमास्तरला कंटाळा आला म्हणजे रतन घाईघाईनें चूल पेटवून पोळ्या ऊन करी व सकाळचें उरलेलें तोंडी लावणें मिळून दोघांचें संध्याकाळचें जेवण कसेंतरी होई.

कधीं कधीं संध्याकाळच्या वेळेला त्या मोठ्या थोरल्या पोष्टाच्या रिकाम्या इमारतींत कोपऱ्याला टेबलापाशीं खुर्चीवर बसलें असतां मास्तरसाहेबांना घरची आठवण होत असे. धाकटा भाऊ, आई, आजी, यांची आठवण झाली म्हणजे मन फार कष्टी होई. ज्या गोष्टी नेहमीं मनांत येत पण कारखान्यांतील लोकांजवळ बोलाव्याशा वाटत नसत, त्याच एका क्षुद्र अशिक्षित बालिकेपाशीं सांगतांना मनाला यत्किंचितही संकोच वाटत नसे. शेवटीं तर असें झालें कीं, ती मुलगी प्रसंगानें मास्तरांच्या घरच्या माणसांचा उल्लेख करतांना एखाद्या चिरपरिचित माणसाप्रमाणें आई, दादा म्हणूनच त्यांना संबोधित असे. तिनें आपल्या हृत्पटलावर त्यांच्या काल्पनिक मूर्तीही कोरून ठेविल्या होत्या.

पावसाळ्यांत एके दिवशीं दोन प्रहरीं आकाश मेघाच्छादित असतांना किंचित् गार वारा मंदमंद वहात होता. उन्हामुळें, भिजलेलें गवत व झाडांचा पाला ह्यांमधून एक प्रकारचा सुगंध सुटला होता. जणूं काय पृथ्वी उष्ण श्वास टाकीत आहे.

एक दुराग्रही पक्षी दोन प्रहरभर आपली एक फिर्याद निसर्गदेवीच्या दरबारांत अत्यंत करुण स्वरानें पुनः पुनः गाऊन दाखवीत होता. पोष्टमास्तर ते दिवशीं रिकामाच होता. वृष्टिधौत मसृण चिक्कण तरुपल्लवांचा ध्वनी, त्याचप्रमाणें आतपशुभ्र पराभूत भयभीत घनघटांचा देखावा पाहण्याजोगा होता. पोष्टमास्तरला तो पाहून वाटलें—अशा समयीं कोणी आत्मीय जन जवळ असतां ज्याला आपल्या हृदयाशीं कवटाळून धरतां येईल—तर—त्याला असें भासलें कीं, हा पक्षीही वारंवार तेंच सांगत आहे. जनहीन तरुछायानिमग्न मध्यान्हसमयीं तरुपल्लव हीच हाव व्यक्त करीत आहे. कोणाला खरें वाटणार नाहीं, मग जाणणें तर दूरच कीं, ह्या सामान्य निर्धन सब्-पोष्टमास्तरच्या मनांत अशा गंभीर निस्तब्ध मध्यानसमयीं विश्रांतीच्या वेळीं हाच विचार घोळत असणें संभवनीय आहे.

पोष्टमास्तरनें सुस्कारा टाकून 'रतन' म्हणून हाक मारली. रतन ह्या वेळीं पेरूच्या झाडाखालीं बसून कच्चे पेरू खात बसली होती. हांक ऐकतांच धांवत आली व धापा टाकीत विचारलें "काय बाबू हाक मारलीत ?"

पोष्टमास्तर म्हणाला, "तुला मी थोडें थोडें वाचायला शिकवणार आहें." असें म्हणून साऱ्या दोन प्रहरभर, "अ" "आ" प्रभृति अक्षरें शिकवीत बसला.

थोड्याच दिवसांत रतनचीं जोडाक्षरेंही झालीं.

श्रावण महिना सुरू होता. पावसाला मुळींच खळ पडेना. नाले, ओढे, डबकीं तुडुंब भरून गेलीं. रात्रंदिवस एकीकडे पावसाचा आवाज व बेडकांचें ओरडणें; गावांत रस्त्यांनीं जाणेंयेणें देखील बंद झालें. बाजारहाट होड्यांतून करण्याची पाळी आली.

एक दिवस प्रातःकाळींच ढग पुष्कळ आले होते. पोष्टमास्तरची विद्यार्थिनी दारापाशीं पुष्कळ वेळ वाट पाहात बसली होती. पण रोजच्या प्रमाणें हांक मारली नाहीं म्हणून आपलें फाटकें तुटकें पुस्तक घेऊन हळूहळू घरांत आली. पहाते तों पोष्टमास्तर खाटेवर निजला आहे. विश्रांति घेत आहे असें समजून पाऊल न वाजवितां घरांतून बाहेर जाऊं लागली. इतक्यांत "रतन" हा शब्द कानीं पडला. त्याच पावलीं परत फिरली. म्हणाली "बाबूजी, झोंप लागली होती ?" पोष्टमास्तर कंपित स्वरानें म्हणाला, "प्रकृती अस्वस्थ आहे, बघ बरं कपाळाला हात लावून."

अशा एकान्तवासांत आकाश मेघाच्छादित व शरीर अस्वस्थ असतां कोणी तरी आपल्या शुश्रूषेला असेल तर बरें अशी इच्छा होणें अगदींच स्वाभाविक. आपल्या तप्त ललाटाला कोणी कोमल हातानें स्पर्श करीत आहे असा भास होई. आई, आजी, कोणी तरी आपल्या जवळ असावें असें मनांत येई. ह्या एकान्तवासी प्रवाशाच्या मनांतील अभिलाष अगदींच व्यर्थ गेला नाहीं. बालिका रतन आतां बालिका राहिली नव्हती. तत्क्षणीं ती मातृपदाधिष्ठित झाली. वैद्याला बोलावून आणिलें, वेळच्या वेळीं औषध दिलें, सारी रात्र जागून काढली, पथ्याचें करून दिलें व वारंवार विचारलें, "बाबू, आतां थोडें बरें वाटतें का ?"

अशक्तपणा होताच, नुसतें आंथरूण सोडायलाच कित्येक दिवस लागले. मनांत निश्चय केला, हें चालणार नाहीं; कसेंही करून बदली करून घेतलीच पाहिजे. तेथील हवा पाणी मानवत नाहीं, ह्या मुद्यावर लागलीच कलकत्त्यास वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे अर्ज केला.

शुश्रूषा संपल्यावर रतननें दाराबाहेरील आपलें पूर्वस्थान स्वीकारलें. पण तिची पूर्वपरिचित हांक आतां ऐकूं येईनाशी झाली. मधून मधून चोरून आंत पाही तेव्हां पोष्टमास्तर अत्यंत उद्विग्न मनानें खुर्चीवर बसलेले किंवा खाटेवर पडलेले आढळत. रतननें हाकेची वाट पहात बसावें, तेव्हां पोष्टमास्तरनें आपल्या अर्जाची अधीर चित्तानें वाट पहावी. मुलीनें दाराच्या बाहेर बसल्या बसल्या आपले झालेले धडे शेंकडोंदां वाचून टाकावेत. तिला वाटे, न जाणों आपल्याला बोलाविलें म्हणजे जोडाक्षरांचा घोटाळा होऊन जाईल. शेवटीं आठ दिवसांनंतर एके दिवशीं संध्याकाळीं हांक ऐकूं आली. कांपत कांपत रतन घरांत येऊन म्हणाली--

"बाबू, मला हांक मारली ?"

पोष्टमास्तर म्हणाले, "उद्यां आम्ही जाणार."

रतन--"कुठें जाणार, बाबू ?"

पोष्टमास्तर--"घरीं जाणार."

रतन--"परत कधीं येणार ?"

पोष्टमास्तर--"परत येणार नाहीं."

रतननें पुढें कांहीं विचारलें नाहीं. तरी पोष्टमास्तरानें आपण होऊन सांगितलें कीं, मी बदलीचा अर्ज केला होता, पण तो नामंजूर झाला, म्हणून मी राजीनामा देऊन घरीं जात आहें. दिवा मिणमिण जळत होता. एके ठिकाणीं जीर्ण झालेल्या छपरांतून पावसाचें पाणी मातीच्या भांड्यावर टप्टप् पडत होतें.

थोड्या वेळानें रतन हळुहळू उठून स्वयंपाकघरांत स्वयंपाकाची तयारी करण्याकरितां गेली. नेहमींप्रमाणें आज तिची चटपट नव्हती. तिच्या मनांत कांहीं नवीन नवीन विचार येत होते. पोष्टमास्तरांचें जेवण झाल्यावर मुलीनें

एकाएकी विचारलें—"बाबू, तुमच्या गांवीं मला घेऊन जाल ?" पोष्टमास्तर हंसून म्हणाला "तें कशाला ?" हें कां असंभाव्य ह्याचीं कारणें तिला समजावून सांगण्याची आवश्यकता मास्तरांना भासली नाहीं.

रात्रभर स्वप्नांत, जागेपणीं पोष्टमास्तराचे हांसत हांसत बोललेले शब्द घोळत होते. पहांटे उठून पोष्टमास्तरानें पाहिलें तों स्नानाचें पाणी तयार होतें. कलकत्त्यांतील अभ्यासानुसार तो घरींच स्नान करीत असे. तुम्ही केव्हां जाणार म्हणून त्या बालिकेचा प्रश्न विचारण्याचा धीर झाला नाहीं. सकाळींच पाणी लागेल म्हणून तिनें मोठ्या पहांटेसच नदीवरून पाणी आणून ठेविलें होतें. स्नान समाप्त झाल्याबरोबर रतनला हांक मारली. रतन कांहीं न बोलतांच घरांत आली, व काय काम सांगणार तें जाणण्याकरितां एकदां आपल्या धन्याच्या तोंडाकडे कांहीं न बोलतां तिनें पाहिलें. धनी म्हणाला—" रतन, माझ्या जागेवर जे येतील त्यांना मी सांगून ठेवीन बरें. ते तुझा मजसारखाच सांभाळ करतील. आम्ही जातों बरें. तुला कांहीं काळजी करायला नको". हे शब्द प्रेमानें, दयार्द्रबुद्धीनें व मनापासून उच्चारले होते ह्यांत मुळींच संशय नाहीं. पण स्त्रियांचें मन कोण ओळखणार ! रतननें आपल्या मालकाचें रागें भरणें अनेकदां निमुटपणें सोसलें होतें, पण तिला हे कोमल शब्द सहन झाले नाहींत. एकाएकीं स्फुंदून स्फुंदून रडूं लागली व म्हणाली—"छे, छे, तुम्ही कोणाला माझ्याबद्दल कांहीं सांगूं नका, मी येथें रहात नाहीं." पोष्टमास्तरनें रतनला असें वागतांना पाहिलें नव्हतें. तो अगदीं चाकित झाला.

नवा पोष्टमास्तर आला. त्याला सर्व चार्ज देऊन जुना पोष्टमास्तर जाण्यास निघाला. जातांना रतनला हांक मारून म्हणाला—" रतन, तुला आजपर्यंत कांहीं द्यायला झालें नाहीं, आज जातांना हें घे थोडेंसें, तुला कांहीं दिवस पुरेल."

थोडेसे वाटखर्चीपुरते पैसे ठेवून घेऊन महिन्याचा सगळा पगार खिशांतून बाहेर काढिला.

रतन त्याच्या पायावर डोकें ठेवून म्हणाली—" तुमच्या पायां पडून सांगतें, मला कांहीं नको. माझ्याबद्दल कोणी कांहीं मनांत आणायला नको." इतकें

बोलून ती लौकरच निघून गेली. जुन्या पोष्टमास्तरनें सुस्कारा टाकिला. हातांत कापडी बॅग, खांद्यावर छत्री व मजुराच्या डोक्यावर निळ्या पांढऱ्या रंगाच्या पट्यांची टिनची ट्रंक देऊन हळू हळू नावेकडे चालू लागला.

पोष्टमास्तर नावेंत बसल्यावर नाव चालू झाली. वर्षाकाळीं विस्तार पावलेली नदी पृथ्वीच्या बाष्पौघाप्रमाणें भासत होती. पोष्टमास्तरचें हृदय भरून आलें. सामान्य ग्राम्य बालिकेचें कारुण्यमय वदन जणूं काय भूमिमातेच्या विश्वव्यापी मर्मव्यथित वक्त्राप्रमाणें भासूं लागलें. त्या एकाकिनी अनाथ बालिकेला जाऊन बरोबर घेऊन यावें असेंही क्षणभर मनांत आलें. पण त्या वेळीं शिडांत वारा धरला होता. पूर आलेली नदी जोरानें वहात होती. गांव सोडून बरेंच दूर आल्यानें नदीतीरीं असणारें स्मशान दृग्गोचर झालें होतें. द्रुतगती स्रोतवाही विरक्त यात्रिकाचे मनांत वेदांततत्त्वाचा उदय झाला. संसार, संयोग, वियोग, मृत्यु आदि घटनांनीं अत्यंत कष्टमय, परत फिरून तरी फल काय? ह्या भूतलावर कोण कोणाचा? अशा विचारांनीं मनाचें सांत्वन करूं लागला. पण रतनच्या मनांत दार्शनिक ज्ञानाचा उदय कोठून होणार? त्याच पोष्टऑफिसच्या भोंवतीं अश्रु ढाळीत ढाळीत ती घिरट्या घालूं लागली. बहुधा बाबू येतील हा आशातंतू पूर्णपणें उच्छिन्न झाला नव्हता. म्हणूनच आशाबद्ध झाल्यानें ती कुठें दूर जाण्यास समर्थ झाली नाहीं. हायरे बुद्धिहीन मानवहृदया, भ्रांती कांहीं केल्या जात नाहीं. विचार फारच विलंबानें बुद्धि प्रकाशित करतो. प्रबल प्रमाणेंही अविश्वसनीय वाटूं लागतात. मिथ्या आशेला मनुष्य बाहुपाशांनीं निगडित करून हृत्कपाटीं प्राणाप्रमाणें जतन करून ठेवितो. पण शेवटीं एक दिवस सर्व बंधनें तोडून हृदयांतील रक्त शोषून ती पलायन करिते. पुन्हा जागृती, पुन्हा नव्या भ्रांतिपाशांत पडण्याची उत्कट इच्छा!!



# १६. समस्या-पूरण

झिंकडा कोटाचे कृष्णगोपाळ सरकार ज्येष्ठ पुत्रावर आपली जमिनदारी व प्रपंचाचा भार सोंपवून काशीस निघून गेले. गांवचे गोरगरीब लोक त्यांच्या-करितां फार हळहळूं लागले. सगळ्यांनीं म्हणावें—अशी धर्मनिष्ठा, असें दातृत्व कलियुगांत तरी दृष्टीस पडणार नाहीं.

त्यांचे चिरंजीव बिपिनविहारी आजकालचे सुशिक्षित बी. ए., स्मश्रुमंडित, उपनेत्रभूषित, मितभाषी, कोणाशीं विशेष मिसळायला नको असे. त्यांचें वर्तन अतिशय शुद्ध—येथपर्यंत कीं, तंबाकूचा स्पर्श नाहीं कीं पत्ते खेळणें कसें तें ठाऊक नाहीं. चर्या अत्यंत सौम्य पण तितकीच कडक.

त्यांच्या प्रजेला लवकरच त्यांचा अनुभव आला. वृद्ध कृष्णगोपाळ यांचे-कडून पुष्कळ सवलती मिळत; पण यांच्या हातून कोणत्याही सबबीवर वसुलीचा एक पैसाही सूट मिळण्याची आशा नव्हती. नेमलेल्या दिवसाच्या एक दिवस अलीकडे पलीकडे झालें तरी खपेना.

बिपिनबाबूंनीं हातीं कारभार घेतांच त्यांना दिसून आलें कीं, वडिलांनीं पुष्कळ ब्राह्मणांना सारा सोडून दिलेला; कितींना कमी केला त्याची तर गणतीच नाहीं. कोणी त्यांच्याजवळ प्रार्थना केली आन् त्यांनीं ऐकलं नाहीं, असं कधीं झालंच नाहीं. ही त्यांची दुर्बलताच.

बिपिनविहारींनीं सांगितलें कीं, हें केव्हांही होणें शक्य नाहीं. त्यांच्या मनांत खालीं दिलेल्या दोन गोष्टी आल्या.

प्रथमतः जे लोक जमिनीची मालकी उपभोगून घरीं स्वस्थ बसून स्थूल बनले आहेत ते दया करण्याला सर्वथा अयोग्य व कुचकामाचे. अशा लोकांना दान द्यायचें म्हणजे देशांत आळसाला उत्तेजन देणें होय.

दुसरी गोष्ट——आपल्या वाडवडलांच्या समयापेक्षां सांप्रत उपजीविकेचीं साधनें दुर्लभ व महर्गता फार. एखाद्याला अब्रूनें राहायचें म्हणजे पूर्वीपेक्षां

चौपट खर्च पाहिजे. अतएव ज्या तऱ्हेनें वडलांनीं निश्चिंत मनानें मोकळ्या हातांनीं दानधर्म केला तसा आज करून चालायचें नाहीं. उलट आपलें उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न करणें आवश्यक.

कर्तव्यबुद्धीला जें योग्य दिसेल तें करण्याचा बिपिनबाबूंनीं आरंभ केला. कांहीं विशिष्ट धोरण ठेवून ते चालूं लागले.

घरांतून जें बाहेर गेलें होतें तें हळुंहळूं परत घरीं येऊं लागलें. वडलांनीं दिलेल्या दानापैकीं फारच थोडें त्यांनीं तसेंच चालविण्याचें कबूल केलें. जें कांहीं ठेवलें तें सुद्धां निरंतरच्या करारांनीं न ठेवण्याची बिपिनबाबूंनीं खबरदारी घेतली.

कृष्णगोपाळ काशीस होते, तरी पत्रद्वारा, प्रजाजनांच्या रडकथा त्यांच्या कानावर जात. कोणी कोणी तर काशीस जाऊन त्यांच्यापाशीं आपलें रडगाणें गाऊं लागले. कृष्णगोपाळबाबूंनीं मुलाला पत्र लिहिलें, तुमच्या कारभाराबद्दल लोक टीका करतात.

बिपिनबाबूंनीं उत्तरीं लिहिलें कीं, पूर्वी जसा दानधर्म होत असे तसे उत्पन्नाचेही अनेक मार्ग होते. पूर्वी जमीनदार आणि प्रजा यांचा परस्पर संबंध अगदीं भिन्न होता. जसें दान तसेंच प्रतिदानही असे. सांप्रत नवीन नवीन कायदे झाल्यामुळें एका योग्य साऱ्याखेरीज उत्पन्नाचा मार्गच नाहीं. जमिनदाराकडे दुसरे अधिकारही राहिले नाहींत. हल्लींच्या काळांत आम्हीं आमच्या योग्य घेण्याचे बाबतींत दक्षता ठेवली नाहीं तर कसें चालेल? अलीकडे प्रजा आम्हांला अधिक देत नाहीं, आम्हीही त्यांना त्यांच्या हक्काविरहित कांहीं देत नाहीं. हल्लीं त्यांचा आमचा संबंध म्हणजे घेण्यादेण्यापुरता. दानधर्म करूं गेल्यास पुरें पडणार नाहीं. एस्टेटीचें अथवा कुलवैभवाचें रक्षण करणें दुरापास्त होईल.

कृष्णगोपाळबाबूंना परिस्थितींत इतका फरक झालेला पाहून मोठा विस्मय वाटला. त्यांनीं विचार केला कीं आजकालचीं मुलें आजच्या काळाला अनुरूप असेंच वर्तन करीत आहेत. आमच्या वेळचे नियम आज उपयोगीं पडणार नाहींत. आज इथें बसून त्यांच्या कारभारांत हात घालूं लागलों तर ते उघडच

म्हणणार कीं तुमचा कारभार तुम्ही संभाळा. आपल्याला करायचें आहे काय? उरलेले दिवस ईश्वरस्मरणांत गेले म्हणजे मिळविलें.

## द्वितीय परिच्छेद

अशा रीतीनें एका हातीं कारभार चालूं लागला. अनेक फिर्यादी तक्रारींचा निकाल करून टाकून बिपिनबाबूंनीं जमिनदारीची सर्व व्यवस्था आपल्या मर्जीप्रमाणें लाविली.

अनेक कुळांनीं भिऊन जाऊन त्यांच्यापुढें मान वाकविली. केवळ मिर्झा-बिबीचा मुलगा अछिमद्दि विश्वास कांहीं केल्या हार गेला नाहीं.

बिपिनबाबूंचा कटाक्षही सर्वांपेक्षां त्याच्यावर अधिक. ब्राह्मणाला जमीन दान देण्याला कांहींतरी अर्थ आहे, पण हा मुसलमान विनसाऱ्यानें किंवा अल्प साऱ्यानें येवढी थोरली जमीन कशी उपभोगतो हें बिपिनबाबूंला समजेना. एका विधवा यवनीचा मुलगा गांवठ्या गावांतल्या शाळेंत दोन तीन यत्ता शिकलेला ताठ्यानें, गर्वानें कोणाचें ऐकत नाहीं हें गूढ कोणालाही वाटणार.

बिपिनबाबूंना जुन्या कारकुनांकडून समजलें कीं कृष्णबाबूंचा फार दिवसां-पासून त्याच्यावर अनुग्रह, पण ह्या मेहेरबानीचें विशेश कांहीं कारण असल्यास त्यांना त्याचा उलगडा झाला नव्हता. बिपिनबाबूंना वाटलें, अनाथ विधवेची दुःखाची कहाणी ऐकून वडलांना दया आली असावी.

पण बिपिनबाबूंना वडलांचा हा अनुग्रह सर्वांपेक्षां अधिक अयोग्य वाटला. त्यांनीं ह्यांची पूर्वींची दरिद्रावस्था पाहिली नव्हती. हल्लींची त्यांची सुस्थिती व डामडौल पाहून बिपिनबाबूंना वाटलें कीं, वडलांचा सरळ स्वभाव व फाजील दयाळूपणाचा फायदा घेऊन एका अर्थीं त्यांच्या एस्टेटीची ह्यांनीं चोरीच केली आहे.

अछिमद्दी उद्धट तरुण; तो म्हणे कीं प्राण गेला तरी आपला अधिकार तिळमात्र सोडणार नाहीं. उभयपक्षीं युद्धाला सुरवात झाली.

जमिनदाराशीं भांडण्यांत अर्थ नाहीं म्हणून अछिमद्दीच्या विधवा आईनें मुलाला पुष्कळदां समजावून सांगितलें. ज्यांच्या अनुग्रहानें आपण इतके दिवस काढले त्यांच्याच मर्जीवर निर्भर राहणें आपल्याला योग्य. जमिनदाराच्या इच्छेप्रमाणें थोडेंसें सोडून दे म्हणून आईनें सांगून पाहिलें.

अछिमद्दी म्हणाला " आई, तुला ह्यांत कांहीं समजायचं नाहीं."

अछिमद्दी एकामागें एक खटला हरत चालला. जों जों खटला बुडे तों तों त्याचा हट्ट अधिक वाढला; आपल्या एस्टेटीकरितां सर्वस्व त्यानें पणाला लाविलें.

एके दिवशीं मिरझाबिबी मळ्यांतला थोडा भाजीपाला नजराणा म्हणून बरोबर घेऊन कोणाला समजूं नये अशा रीतीनें बिपिनबाबूंना भेटायला आली. तिनें बिपिनबाबूंच्या सर्व शरीरावरून करुणामय वात्सल्यदृष्टिद्वारां जणूं काय हात फिरवून म्हटलें, आपण आम्हांला बापासारखे, अल्ला आपला भला करो. बाबा, अछिमचा नाश करूं नकोस. हा तुझा धर्म नाहीं. त्याला मी तुझ्या पायावर घालतें, त्याचें रक्षण कर. त्याला धाकट्या भावासारखा समज. तुझ्या येवढ्या संपत्तींतला एक कण मात्र त्याला मिळाला म्हणून राग करूं नकोस.

म्हातारी वयपरत्वें स्वाभाविक धीटपणानें बिपिनबाबूंशीं बोलली, पण तो घरोबा बिपिनबाबूंना आवडला नाहीं. ते म्हणाले, " तुम्ही बायको मनुष्य, तुम्हाला ह्या सगळ्या गोष्टी समजायच्या नाहींत. कांहीं सांगायचें असेल तर मुलाला पाठवून द्या."

मिरझाबिबीनें आपल्याला ह्या विषयांत कांहीं समजणार नाहीं, म्हणून स्वतःच्या मुलाकडून ऐकून घेतलेंच होतें, आज बिपिनबाबूंकडून तेंच ऐकिलें, तेव्हां अल्लाचें नामस्मरण करून डोळे पुशीत पुशीत ती घरीं परत गेली.

## तृतीय परिच्छेद

खटला फौजदारींतून दिवाणींत, दिवाणींतून जिल्हा कोर्टांत, तिथून हायकोर्टपर्यंत गेला. अशा रीतीनें सुमारें दीड एक वर्ष लोटलें. अछिमद्दी कर्जामध्यें आकंठ बुडाला, तेव्हां अपील कोर्टांत खटल्याचा निकाल एक दोन किरकोळ बाबतींत त्याच्या सारखा झाला.

'आगींतून निघून फुपाट्यांत' ह्या म्हणीप्रमाणें हिकडे मारवाड्यानें त्याच्यावर हुकुमनामा मिळवला. अछिमद्दीच्या सर्व एस्टेटीच्या लिलावाची तारीख मुक्रर झाली.

तो दिवस सोमवार म्हणजे बाजारचा दिवस. एका लहानशा नदीच्या कांठीं बाजार भरत असे. वर्षाऋतूमुळें नदी भरून चालली होती. कांहीं नावेंतून तर कांहीं तीरावर खरेदी विक्री चालली होती. कळकळीला तर पार नाहीं. पण्य-वस्तूंमध्यें आषाढाचा महिना असल्यामुळें फणसाचें उत्पन्नच विशेष. इलिश मासेही ‡प्रचुर. आकाश मेघाच्छादित, म्हणून पुष्कळशा दुकानदारांनीं चार बांबू पुरून वर कापड ताणून बसविलें होतें.

अछिमद्दीही बाजार करायला आला होता. पण हातीं एक पैसाही नाहीं. आजकाल त्याला कोणी उधार देखील देइनासें झालें होतें. तो एक वाटी आणि ताट कोणापाशीं गहाण ठेऊन पैसे घ्यावे म्हणून आला होता.

बिपिनबाबू संध्याकाळच्या वेळीं हवा खायला म्हणून बाहेर पडले होते. हातांत काठ्या घेतलेले दोघे तिघे शिपाई त्यांच्याबरोबर होते. गोंगाट ऐकून एकदां बाजार पहावा म्हणून बिपिनबाबूंना इच्छा झाली.

बाजारांत प्रवेश करून कौतुकानें एका तेलाच्या घाण्यापाशीं उभे राहून आयव्ययासंबंधीं चौकशी करीत असतां अछिमद्दी एखाद्या वाघासारखी गर्जना करून हात उगारून बिपिनबाबूंच्या अंगावर धाऊन आला.

बाजारच्या लोकांनीं त्याला पकडून ताबडतोब निःशस्त्र केलें. विलंब न लावतां त्याला पोलिसच्या स्वाधीन करण्यांत आलें व बाजारांत क्रयविक्रय पूर्ववत् चालू झाला.

---

‡बंगाल्यांत ब्राम्हणांच्या तीन मुख्य जाती म्हणजे राडी, वैदिक आणि बारींद्र. ह्या तिन्ही जातींत मासे खाण्यास जातिनिर्बंध नाहीं. व्यक्तिशः कोणी खात नसलें तर तें स्वेच्छेनें. इलिशमासा म्हणजे खाण्याच्या दृष्टीनें फार पसंत.

झालेल्या प्रकारामुळें बिपिनबाबूंना मनांतल्यामनांत आनंद झाला कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. ज्या अछिमद्दीला आपण मशकासारखे चिरडून टाकूं असें बिपिनबाबूंना वाटत होतें तो अंगावर हात टाकायला धाऊन आला हा अपमान, बेअदबी त्यांना थोडीच सहन होणार!

बिपिनबाबूंच्या घरांत बायकांना ही बातमी समजली तेव्हां त्यांच्या अंगावर शहारे आले. सर्वजणी म्हणूं लागल्या—काय ग बाई धीटपणा! काय हा हरामखोर! तथापि त्याला योग्य शासन होईलच ह्या आशेनें त्या शांत झाल्या.

इकडे ते दिवशीं संध्याकाळीं त्या विधवेचें अन्नहीन, पुत्रहीन गृह यमसदनाहून भीषण दिसूं लागलें. झालेली घटना सर्वजण विसरले; यथासांग आहारादि आटपून निद्रावश झालीं. एकट्या त्या वृद्धेला पृथिवीच्या सर्व घडामोडींमध्यें आजची घटना विशेष बिकट होऊन बसली. ह्या परिस्थितीशीं झगडावयाला अखिल भूतलावर दुसरें कोणीहि नाहीं. दीपहीन कुटीरप्रांतीं केवळ जीर्ण अस्थिपंजर व तदन्तर्गत भीतकंपित हृदय.

## चतुर्थ परिच्छेद

अशा रीतीनें तीन एक दिवस गेले. उद्यां डेप्युटी मॅजिस्ट्रेटच्या समोर खटला सुनावणीला निघणार होता. बिपिनबाबूंना साक्ष देण्याकरितां जायचें होतें. ह्यापूर्वी जमीनदार कधीं साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत गेले नव्हते, पण बिपिनबाबूंना त्यांत कांहीं विशेष वाटत नव्हतें.

दुसरे दिवशीं पगडी घालून घड्याळाची साखळी लटकावून पालखींत आरूढ होऊन मोठ्या समारंभानें बिपिनबाबूंची स्वारी कचेरीजवळ येऊन दाखल झाली. डेप्युटी मॅजिस्ट्रेटनीं त्यांना सत्कारपूर्वक आपल्या शेजारीं आसन दिलें. कोर्टांत आज पाऊल ठेवायला जागा नव्हती. असा देखावा कोर्टांत अनेक दिवसांत दिसला नव्हता.

खटल्याला सुरुवात होणार इतक्यांत एका शिपायानें येऊन बिपिनबाबूंच्या कानांत कांहींसें सांगितलें. बिपिनबाबू चकित झाले. मला गेलें पाहिजे म्हणून उठून बाहेर आले.

बाहेर येऊन बघतात तों एका वडाचे झाडाखालीं अनवाणी, अंगावर रामनामांकित अंगवस्त्र, हातांत माळ, वृद्ध, कृशतनू वडिलांची स्वारी उभी. ती शांत करुणामय मूर्ती पाहून बिपिनबाबू चकित झाले.

तो दरबारी पोषाख, घट्ट पाटलोण चढवून वडिलांना नमस्कार करायचें बिपिनबाबूंना मोठें कठिण गेलें. डोक्यावरची पगडी नाकापर्यंत आली; घड्याळ खिशांतून बाहेर पडलें. घाईघाईनें सांवरून घेऊन शेजारीं वकिलांच्या घरीं येण्याबद्दल बिपिनबाबूंनीं वडिलांना विनंती केली.

कृष्णगोपाळ म्हणाले—मला काय सांगावयाचें तें इथेंच सांगतों.

बिपिनबाबूंच्या अनुचरांनीं जमलेल्या लोकांना दूर केलें.

कृष्णगोपाळ—अछीम सुटून जाईल असा कांहीं उपाय केला पाहिजे. त्याचें काढून घेतलेलें उत्पन्न पण सोडून द्या.

बिपिनबाबूंनीं चकित होऊन विचारलें—येवढ्याकरितां आपण काशीहून इतक्या दूर आलांत? त्याच्यावर आपला इतका अनुग्रह कां?

कृष्णगोपाळ—तें समजण्यांत तुझा फायदा काय?

बिपिनबाबूंनीं तसेंच सोडलें नाहीं. ते म्हणाले—अयोग्य समजून कित्येक लोकांच्या देणग्या मी परत घेतल्या. त्यांत पुष्कळ ब्राह्मणही आहेत, पण आपण त्यांच्याबद्दल कांहीं बोलला नाहींत. आज ह्या मुसलमानणीच्या मुलाकरतां आपण येथपर्यंत आलांत! आजपर्यंत इतक्या खटपटी करून शेवटीं अछिमला गुन्ह्यांतून मुक्त करून त्याचें उत्पन्न परत दिलें तर लोक काय म्हणतील?

कृष्णगोपाळ क्षणभर स्तब्ध राहिले. शेवटीं कापऱ्या हातांनीं माळ जपीत जपीत कंपित स्वरानें म्हणाले—लोकांच्या उघडकीस या गोष्टी आणायच्या असल्या तर सांग. अछिमद्दिन आमचा मुलगा, तुझा भाऊ.

बिपिनबाबूंनीं आश्चर्यानें विचारलें—यवनीच्या पोटीं?

कृष्णगोपाळ—होय, बाबा.

बिपिनबाबू बराच वेळ स्तब्ध राहून म्हणाले—तें मग बोलतां येईल, आपण आधीं घरीं चला.

कृष्णगोपाळ—छे, आम्ही घरीं तर येऊं शकत नाहीं, आम्ही येथूनच परत जातों. तुझ्या धर्माला येईल तसें कर.

इतकें म्हणून मुलाला आशीर्वाद देऊन अश्रुविरोध करून कांपत कांपत स्वारी परत फिरली.

बिपिनबाबूंना काय करावें, काय बोलावें कांहींच सुचलें नाहीं. तसेच स्वस्थ उभे राहिले. हीच वाटते त्या काळची धर्मनिष्ठा!

शिक्षण आणि शील या बाबतींत आपण वडिलांहून खचित श्रेष्ठ असें मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. मनाचा निश्चय झाला कीं "प्रिन्सिपल" नसल्याचें हें फळ.

बिपिनबाबू कोर्टांत परत आल्यावर एक मळकें फाटकें चिरगुट नेसलेला, ओठ काळे पडलेले, डोळे लाल झालेले, दोघा पाहारेवाल्यांच्या मध्यें बंदिवान म्हणून उभा केलेला अछिम त्यांच्या दृष्टीस पडला—हे बिपिनबाबूंचे बंधू.

डेप्युटी मॅजिस्ट्रेटच्या बरोबर बिपिनबाबूंचा स्नेह होता.

खटला कांहीं तरी करून काढून टाकला गेला. थोडक्याच दिवसांत अछिमची पूर्वस्थिती त्याला प्राप्त झाली. पण त्याचें कारण त्याला स्वतःला कळलें नाहीं व लोकांनाही समजलें नाहीं. आश्चर्य मात्र वाटलें.

कृष्णगोपाळ खटल्याचे वेळीं आले होते ही गोष्ट साऱ्या गांवभर तावडतोब पसरली. सर्वजण तर्कवितर्क कानगोष्टी करूं लागले.

धूर्त वकील मंडळींनीं सर्व गोष्टी अनुमानानें ताडल्या. रामतरण वकिलांना कृष्णगोपाळबाबूंनीं स्वतःच्या पैशांनीं शिक्षण देऊन लहानांचे मोठे केले होते. त्यांना ह्या गोष्टीचा संशय होता. पण आतां खात्री झाली कीं नीट शोध करतां आल्यास सर्व साधू पकडले जातील. कितीका माळ जपीनात, सगळे आमच्याच सारखे. संसारांत जगांत साधू असाधूमध्यें इतकाच फरक कीं साधू कपटी, असाधू निष्कपटी. कांहीं असो, कृष्णगोपाळबाबूंचा जगद्विख्यात दयाधर्म हें सर्व कपट असा निश्चय होऊन रामतारणबाबूंच्या इतक्या दिवसांच्या दुर्बोध समस्येचें पूरण झालें, येवढेंच नसून कोणत्या तर्कशास्त्रानें तें त्यांचें त्यांनाच ठाऊक, त्यांच्या कृतज्ञतेचें ओझेंही त्यांना हलकें झालेंसें वाटलें. त्यांना मोठा संतोष वाटला.

---

# १७. सुभाषिणी

मुलीचें नांव सुभाषिणी ठेवतांना कोणाला माहित होतें कीं, ही मुकी निघेल! तिच्या दोघी मोठ्या बहिणींपैकीं एकीचें सुकेशिनी व दुसरीचें सुहासिनी अशीं नावें ठेविलीं होतीं. त्यांच्याशीं जुळण्याकरितां धाकटीचें सुभाषिणी असें नांव ठेवलें होतें. पण आतां तिला सगळीजणें सुभा या संक्षिप्त नांवानेंच ओळखीत.

तिला बोलतां आलें नाहीं तरी सर्व गोष्टी समजत असतील हें कोणाच्या लक्षांत न येऊन तिचें पुढें कसें होणार याबद्दलची चिंता तिच्या समक्ष व्यक्त करीत.

आपण अभिशापरूपानेंच आईबापांच्या पोटीं जन्मग्रहण केलें आहे, हें ती अगदीं लहानपणापासूनच समजून चुकली होती. याचा परिणाम असा झाला कीं कोणाच्याही दृष्टीस न पडण्याची ती नेहमीं खबरदारी घेत असे. तिला वाटे आपली आठवण कोणाला न होईल तितकी बरी. पण कोणाला कधीं आपलें दुःख विसरतां आलें आहे का? आईबापांच्या मनांत तें रात्रंदिवस जागृत होतें.

विशेषतः तिची आई तिला पाहून फारच विव्हल होत असे. कां बरें होणार नाहीं ? आईला मुलांपेक्षां मुलीच्या ठिकाणीं आत्मत्व अधिक वाटतें. मुलीच्या ठिकाणीं कांहीं कमीपणा दिसला म्हणजे मनांतल्या मनांत तिला लाजल्यासारखें होतें. तथापि मुलीचा बाप वाणीकंठ आपल्या दुसऱ्या दोन्ही मुलींपेक्षां हिच्यावर अधिक प्रेम करी. पण आई मात्र तिला कुलकलंक समजे व तिचा द्वेष करीत असे.

सुभाला वाणी नसली तरी तिचे काळेभोर मोठमोठे डोळे फारच शोभत. मनांत कांहीं विचार आला म्हणजे तिचे ओंठ नवपल्लवांप्रमाणें कांपूं लागत.

आपण आपले मनोगत भाव वाणीच्या द्वारां व्यक्त करीत असतों. तेव्हां पुष्कळदां आपल्याला प्रयास पडतो. भाषांतराप्रमाणेंच ते पुष्कळदां नीट व्यक्त होतही नाहींत. कधींकधीं चूकही होण्याचा संभव. डोळ्यांना भाषांतर करावें लागत नाहीं. मनांत विचार येतांच त्याची प्रतिमा डोळ्यांवर पडते. मनो-

विकार डोळ्यांत प्रतिबिंबित होतात; कधीं प्रसन्न, कधीं तेजस्वी, कधीं म्लान, शांत, तर कधीं अस्तमान चंद्राप्रमाणें अनिमिषभावें स्थिर, केव्हां केव्हां क्षणिक चंचल विद्युल्लतेप्रमाणें दैदीप्यमान.

आपलें अंतरंग प्रगट करण्यास जन्मापासून ज्यांना वाणी नाहीं त्यांची नेत्रभाषा अर्थपूर्ण, गंभीर, निरभ्र आकाशाप्रमाणें उदयास्त व छायाप्रभा प्रतिरूपित करण्यास अत्यंत समर्थ. अशा वाचाहीन प्राण्यांमध्यें अव्यक्त प्रकृती-प्रमाणें गांभीर्य नसतें असें कोण म्हणेल? म्हणूनच कीं काय मुलांना तिच्या-जवळ जाण्याचा धीर होत नसे. तीं तिच्याशीं खेळतही नसत. सुभा निर्जन अशा दोनप्रहरसमयाप्रमाणें नीरवें एकाकी संचार करीत असे.

— २ —

ती ज्या गांवीं रहात असे त्या खेड्याचें नाव चंडीपूर. तेथील नदी बंगा-लच्या मानानें, कुटुंबांतील मर्यादशील मुलीप्रमाणें, संकुचित प्रकृतीची. तिचा विस्तारही फार दूरपर्यंत नाहीं. ती निरलस, कृशतनू, तरंगिणी, कुलमर्यादा रक्षण करून स्वकार्यीं तत्पर असे. दोन्ही तीरांवरील गृहगणांशीं तिचा कांहींना कांहीं संपर्क असे. दोन्ही तट उंच असून लोकालयें व छायाघन वृक्ष यांनीं सुशोभित असत. जणूं काय ग्रामलक्ष्मी उच्च पद सोडून, आत्मभाव विसरून निम्नगा स्रोतस्विनीरूपानें प्रसन्न मनें आपल्या असंख्य मंगलकार्यांमध्यें निमग्न आहे.

वाणीकंठाचें घर अगदीं नदीच्या तीरावर होतें. त्याच्या वखारी, गंजी, गोठे, बाग। कोणाही नौकागामी यात्रिकाचें चित्त आकर्षित केल्यावांचून राहत नसत. पण ह्या सर्व ऐहिक संपत्तीच्या पसाऱ्यामध्यें त्या मुक्या मुलीकडे कोणाचें लक्ष जात असे कीं नाहीं हें सांगणें कठीण आहे. कामकाज संभाळून फुरसत मिळाली कीं ती मात्र नदीच्या कांठीं येऊन बसे.

निसर्ग जणूं काय तिची वाचाहीनता परिपूर्ण करीत होता. प्रकृतीनेंच प्रायः तिजकरितां मुखरता स्वीकारली होती. नदीचा कलरव, लोकांचा कोलाहल, नाविकांचें गान, पक्ष्यांची किलबिल, तरूंचा मर्मरध्वनि एकत्रित होऊन चोहों-

कडील वन्य निनादांदोलनाशीं संमीलत होऊन जणूं काय समुद्रवीचिन्यायानें तिच्या चिरनिस्तब्ध हृत्कपाटावर आघात करीत आहे.

प्रकृतीचा हा विविध शब्द व विचित्र व्यापार ह्या मूक कन्येची भाषा. विश्वव्यापिनी प्रकृतीची मुखरता हीच त्या पक्ष्मलाक्ष आयतनेत्र अशा सुभेचें विलोकित. झिल्लीरवमंडित पृथिवीतलापासून शब्दातीत तारागणाकीर्ण नभोमंडलच्छेदी इंगित, भाव, गान, रुदन, दीर्घनिश्वास मात्र.

नावाडी, कोळी, खायला गेले आहेत, खेड्यांतील लोक निद्रावश झाले आहेत, पक्षी स्तब्ध आहेत, नावा बंद आहेत, जेव्हां अखिल व्यवसायासक्त जगत् अकर्मण्य होऊन भयानक स्वरूप धारण करीत आहे अशा प्रखर माध्यान्ह समयीं केवळ मूकभावापन्न प्रकृति व एकाकी मूककन्या मुग्धत्व स्वीकारून स्तब्ध बसूं शकतात. एक विश्वव्यापी आतपाधःस्थलीं व दुसरी क्षुद्र तरुतलीं.

सुभाला कोणीच बांधव नव्हते असें नाहीं. गोठ्यांत दोन कालवडी होत्या. त्यांपैकीं एकीचें नांव सर्वाशी व दुसरीचें नांव पांगुळी. त्यांनीं आपलीं नांवें त्या बालिकेच्या तोंडून कधीं ऐकिलीं नव्हतीं. पण तिच्या पदशब्दांशीं त्या परिचित होत्या. तिच्या वाचाहीन करुण स्वराचें मर्म त्या भाषेहूनही अधिक सहज समजूं शकत. सुभा कधीं त्यांचे लाड करी तर कधीं रागावे. कधीं कुरवाळी हें त्या माणसांपेक्षां चांगल्या रीतीनें ओळखीत.

सुभानें गोठ्यांत येऊन दोन्ही हातांनीं सर्वाशीच्या मानेला वळखा घालावा, आपले गाल तिच्या कानापाशीं नेऊन घासावेत, पांगुळी तिच्याकडे स्निग्ध दृष्टीनें पाही व तिचें आंग चाटूं लागे. ती बाला नियमानें दिवसांतून तीन वेळ गोठ्यांत जात असे. त्याखेरीज आणखी सुद्धां मधून मधून जाई. घरांत जे दिवशीं कोणी रागावे ते दिवशीं ह्याच दोघी सोबतिणींकडे ती जाई.

तिचें विषण्ण खिन्न वदन पाहून त्या हिचें दुःख ओळखीत व अंगाला अंग घासून शिंगानें हळूहळू तिचे बाहू खाजवून जणूं काय तिच्या अव्यक्त व्याकुलतेचें सांत्वन करीत.

ह्यांखेरीज एक शेळी व मांजराचें पिलूं तिच्या मित्रमंडळींत होतें. पण त्यांच्यावर हिचें इतकें प्रेम नसे. तथापि तीं बहुधा हिच्या मागें असत.

मांजरी तर दिवसारात्रीं जेव्हां तेव्हां सुभाच्या मांडीवर जाऊन निर्भय-पणें निजत असे. सुभा तिच्या मानेवर व पाठीवर हात फिरवी, त्या सुखाचा आस्वाद ती कशी विसरेल !

उच्च श्रेणीच्या प्राण्यांमध्यें सुभाचा आणखी एका व्यक्तीशीं स्नेह होता. पण त्याच्याशीं तिचा संबंध कोणत्या प्रकारचा होता हें जाणणें कठीण आहे. कारण तो पडला भाषाविशिष्ट जीव, म्हणूनच दोघांमध्यें एक्यवाक्यता नव्हती.

गोसाव्यांच्या घरचा हा सगळ्यांत धाकटा मुलगा. त्याचें नाव प्रताप. हा अत्यंत आळशी. त्यानें कांहीं तरी कामकाज करून संसारांत उन्नती करून घ्यावी म्हणून आईबापांनीं पुष्कळ प्रयत्न करून पाहून सर्व आशा सोडून दिली होती.

अशा प्रकारच्या अकर्मण्य माणसांमध्यें एक गुण असतो. आत्मीय जन ह्याच्याबद्दल जरी उदासीन असला, तरी इतरांना हा फार प्रिय असतो. कोणत्याही कामानें बांधला गेला नसल्यानें हा एक प्रकारें सार्वजनिक संपत्ति होऊन बसतो. शहरांतून ज्याप्रमाणें एखाद दुसऱ्या सार्वजनिक बागेची जरूर असते त्याप्रमाणें खेडेगांवांत चार-दोन अकर्मण्य सार्वजनिक माणसांची आवश्यकता असते. कामकाजांत, उत्सवांत जेव्हां एखाद्याची कमतरता पडते तेव्हां अशीं माणसें सहज हातीं येतात.

प्रतापचा मुख्य उद्योग म्हणजे मासे धरणें. ह्यांत पुष्कळसा वेळ सहजच घालवितां येतो. तिसऱ्या प्रहरीं नदीच्या कांठीं बहुधा ह्याच कामांत गुंतलेला तो दृष्टीस पडे. ह्याच निमित्तानें प्रायः सुभाशीं त्याची गांठ पडे. एखादें काम करीत असतां प्रतापला कोणी सोबती मिळाला म्हणजे बरें वाटे. त्यांतून मासे धरतांना वाचाहीन सहचर विशेषच चांगला, म्हणूनच प्रतापला सुभा विशेष आवडे. सर्वजण सुभाला सुभा म्हणत, पण प्रताप आपला विशेष आदर प्रगट करण्याकरितां तिला नुसतें "सू" म्हणूनच हाक मारी.

सुभा चिंचेच्या झाडाखालीं बसे, जवळच, प्रताप गळ टाकून पाण्याकडे बघत बसे. प्रताप आपल्याबरोबर एक पानसुपारीचा डबा आणीत असे व सुभा विडा तयार करून देई. दीर्घकाळपर्यंत तेथें टक लावून पहात बसल्यानें आपण प्रतापला कांहीं विशेष साहाय्य करीत आहोंत असें तिच्या मनांत येत असावें. कसेंतरी करून लोकांना भासवावें कीं आपण कांहीं अगदींच निरुपयोगी त्याज्य वस्तू नाहीं म्हणून ती उत्सुक असे, पण तिला करण्याजोगें कांहींच नव्हतें. ती मनांतल्या मनांत देवाची प्रार्थना करी कीं, देवा मला अशी कांहीं शक्ती दे कीं, जिच्यानें कांहीं अद्‌भुत चमत्कार करून दाखवीन व प्रतापला म्हणावयाला लावीन कीं " वा! मला नव्हतें वाटलें कीं आमची सुभा इतकें करील."

क्षणभर समजूंया कीं सुभा कोणी नागकन्या होऊन हळूहळू पाण्यांतून वर येऊन सर्पमणी आणून घाटावर ठेऊन गेली. प्रतापनें मासे धरणें सोडून बुडी मारून तो पाताळांत गेला आहे व रजनप्रासादामध्यें सुवर्णपर्यंकावर कोणी रूपवती कन्या बसलेली पहातो तों तीच ती वाणीकंठाच्या घरची मुकी मुलगी 'सू'. आमची ' सू ' मणिदीप निस्तब्ध पातालनगरींतील एकुलती एक राजकन्या! असें कां बरें घडून येऊं नये? हें कां अगदीं अशक्य? वास्तविक असंभव असें कांहींच नाहीं; तथापि ' सू 'नें पाताळांत राजवंशांत जन्म न घेतां वाणीकंठाच्या घरीं जन्माला आली व गोसाव्यांच्या प्रतापला मुळींच आश्चर्यचकित करूं शकली नाहीं.

— ३ —

सुभा क्रमाक्रमानें वाढत गेली व आपण आपले ठिकाणीं अनुभव करूं लागली. पूर्णिमेच्या दिवशीं समुद्राच्या प्रवाहानें खळबळ उडवून द्यावी त्याप्रमाणें तिच्या हृदयामध्यें कांहीं एक अनिर्वचनीय चेतनाशक्ति जागृत होऊन तिचें मन तिनें मथित करून टाकिलें. तिनें आत्मनिरीक्षण करून पाहिलें. विचार केला. आपण आपल्याला प्रश्न करून पाहिला, पण समजून आलें नाहीं.

पूर्णिमेच्या दिवशीं मध्यरात्रींच्या सुमारास एके दिवशीं ती आपल्या शयन-घराचें दार उघडून भीतभीत डोकावून पाहूं लागली. सुभेप्रमाणेंच एकाकिनी प्रकृती जणूं काय त्या पूर्णचंद्रनिशीथसमयीं सुप्तजगतीतलाकडे पहात आहे. यौवनदशेमुळें सुख व दुःख अतितीव्र वेगानें तिच्या मनांत संचार करूं लागलीं. पूर्वींपासूनच तिला जग नितान्त निर्जन असें भासत होतें. आतां तर तें ऐकान्त्य अमर्याद वाटून हृदयजडीभाव मूकभाव यांनीं जीवित असह्य होऊन गेलें. अशा ह्या व्याकुल प्रकृतीच्या सीमान्तावरच जणूं काय ही निस्तब्ध विव्हल बालिका उभी आहे.

इकडे मुलीसंबंधानें आईबाप चिंताग्रस्त होते. लोकनिंदा सुरूं झाली. येथ-पर्यंत कीं बहिष्काराच्या गोष्टीही कानावर येऊं लागल्या.

वाणीकंठ सुखवस्तु होता. त्याच्या घरीं दोन्ही सांज भातपोळी होई, म्हणूनच त्याला शत्रू पुष्कळ. स्त्रीपुरुषांमध्यें पुष्कळ खल झाला. वाणी कांहीं दिवस परगांवीं गेला. परत येऊन स्त्रीपुरुषांचें कलकत्त्यास जाण्याचें ठरलें.

जाण्याच्या तयारीला सुरुवात झाली. तुहिनावच्छिन्न प्रभातसमयाप्रमाणें सुभेचें हृदय दुःखानें भरून आलें. अलीकडे कित्येक दिवस कांहीं अनिर्दिष्ट भयानें ती एखाद्या मुक्या जनावराप्रमाणें आईबापांच्या मागें मागें असे. आपल्या मोठमोठ्या डोळ्यांनीं ती त्यांच्या तोंडाकडे निरखून पाही. पण तिच्या कांहींच लक्षांत येईना. अशा स्थितींत एके दिवशीं दोनप्रहरीं प्रताप मासे धरीत असतां हांसून ह्मणाला "काग, सु तुला आईनें नवरा पाहून काढला वाटतं? तुझें लग्न होणार तर? बघ हो आम्हांला विसरून जाऊं नकोस?" इतकें बोलून तो मासे धरण्यांत गुंतला.

मर्मविद्ध हरिणीनें ज्याप्रमाणें व्याध्राकडे बघून मूक भावानें ह्मणावें "मी तुझा काय बरें अपराध केला?" त्याप्रमाणें सूनें प्रतापकडे व्याकूल मुद्रेनें पाहिलें.

ते दिवशीं ती झाडाखालीं बसली नाहीं. ह्यानंतर वाणीकंठ झोंप झाल्या-वर तमाखू ओढीत आपल्या खोलींत बसला होता. सुभा त्याच्या पायाजवळ बसून त्याच्याकडे पहातां पहातां रडूं लागली. तिचें सांत्वन करतां करतां त्याच्या डोळ्यांत अश्रु आले.

दुसरे दिवशीं कलकत्त्यास जाण्याचा बेत निश्चित झाला होता. सुभा आपल्या मैत्रिणींचा निरोप घेण्याकरितां गोठ्यांत गेली. तिनें आपल्या हातांनीं त्यांना चारा घातला, गळ्यांत मिठी घातली व डोळे भरून त्यांच्याकडे पाहिलें. तेव्हां दोन्ही डोळ्यांतून टप्टप् अश्रू पडूं लागले.

ती शुक्लद्वादशीची रात्र. सुभा घरांतून बाहेर पडून नदीतीरावर आपल्या चिरपरिचित तृणमयी भूमिशय्येवर जाऊन लोळूं लागली. जणूं काय धरणी-मातेला कवटाळून म्हणत आहे, हे भूमिमाते, मला सोडूं नको. दोंही हातांनीं आलिंगन देऊन घट्ट धरून ठेव.

कलकत्त्यास एके दिवशीं सुभाच्या आईनें तिला खूप सजविली. तिची आठ-पेडी वेणी घालून सोपानरीच्या आगवळानें बांधून सर्व शरीर दागदागिन्यांनीं मढवून तिचें स्वाभाविक सौंदर्य शक्य तितकें नष्ट करून टाकिलें. सुभाच्या दोन्ही डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या होत्या.

डोळे सुजून खराब होतील म्हणून आईनें पुष्कळ भर्त्सना केली, पण अश्रूं थोडेच मानणार !

मुलगी पहायला स्नेही बरोबर घेऊन नवरा मुलगा स्वतः आला. देवतांनीं पशू बळी घेण्याकरितां स्वतःच यावें तद्वत् हें झालेलें पाहून आईबाप फारच शंकित व चिंताकुल झाले. नेपथ्य चाललें असतां आईनें आरडाओरड, धमकी, शासन वगैरेंचा प्रयोग केल्यानें परीक्षकांपुढें जाईपावेतों अश्रुधारा द्विगु-णित झाल्या.

परीक्षक पुष्कळ वेळ निरीक्षण केल्यावर म्हणाले, दहाजणींसारखी आहे.

विशेषतः मुलीच्या रडण्यावरून त्यांनीं अनुमान केलें कीं, मुलीचें मन कोमल आहे व तर्क बांधला कीं जें मन आज आईबापांच्या विश्लेष दुखानें व्यथित होऊं शकतें तेंच मन आज ना उद्यां आमच्याकडे वळेल. शुक्तिगत मुक्ताफलन्यायानें बालिकेचें अश्रुजल तिचें मोल वाढविण्यास कारणीभूत झालें. ह्याखेरीज कांहींच टीका त्यांनीं केली नाहीं. पत्रिका पाहून एका चांगल्या मुहूर्तावर विवाह झाला.

मूक कन्येला दुसऱ्याच्या हातीं समर्पण करून आईबाप आपल्या गांवीं निघून आले. इहलोकीं त्यांची जाति व परलोक ह्या दोहींचेंही रक्षण झालें. नवऱ्याचा व्यवसाय पश्चिमेकडे असल्यामुळें थोड्याच दिवसांत स्त्रीला तिकडेच घेऊन गेला.

सरासरी आठदहा दिसांत सगळ्यांना कळून चुकलें कीं, मुलगी मुकी. त्यांना तें समजलें नाहीं हा कांहीं तिचा दोष नाहीं. तिनें कोणालाहि फसविलें नाहीं. वास्तविक तिच्या दोन्ही चक्षूंनीं सकल कथा निवेदन केली होती. पण ती कोणाला समजली नाहीं. तिनें चोहोंकडे पाहावें पण कोणीहि उत्तर देऊं नये. जे तिच्या भाषेशीं आजन्म परिचित ते चेहेरे तिला दिसेनात. बालिकेच्या निःशब्द हृदयांत जें अव्यक्त अमर्याद दुःख शब्द करीत होतें तें अंतरंग जाणणाऱ्या एका परमेश्वराखेरीज कोण ओळखणार ?

ह्या वेळीं तिच्या पतीनें डोळे व कान ह्या दोन्ही इंद्रियांच्या साहाय्यानें परीक्षा करून एक वाचाळ मुलगी बायको करून आणिली.



# १८ काबुलीवाला



धाकटी मुलगी पांच वर्षांची होती. तिचें नांव मिनी. तिची वट्वट एकसारखी चालू असे. उपजल्यापासून सरासरी एकादें वर्ष भाषा शिकण्यांत गेलें असेल तेवढेंच, बाकी झोपेचा वेळ सोडून एक क्षण सुद्धां ती गप्प बसत नसे. तिची आई कित्येकदां रागें भरून तिचें तोंड बंद करी, पण माझ्यानें मात्र तें होत नसे. मिनी गप्प बसलेली पाहिली म्हणजे आम्हांला चुकल्यासारखें होई. माझ्याच्यानें तें फार वेळ पहावत नसे. म्हणूनच माझ्यापाशीं तिची बडबड फार मनापासून चालत असे.

एके दिवशीं सकाळीं, मी जी गोष्ट वाचीत होतों तिचा सतरावा भाग चालला होता, इतक्यांत मिनीनें येऊन सुरुवात केली "बाबा, आपला देवडीवाला रामदयाळ काऊला कव्वा म्हणतो. त्याला कांहीं समजत नाहीं खरें ना?" मी तिला जगांत नाना प्रकारच्या भाषा असतात म्हणून सांगायला सुरुवात करणार त्याचें पूर्वींच "बाबा, बघाहो, 'भोळा' म्हणतो, आकाशांत हत्ती असतो, तो सोंडेनें पाणी फेंकतो" म्हणूनच पाऊस पडतो. बाबा, खरें का हो ! भोळा किती बडबड करतो हो ! रात्रंदिवस बडबडतो." माझ्या उत्तराची वाट न पाहातांच तिचा प्रश्न तयार. "बाबा, आई तुमची कोण हो ?"

मनांत मी कांहीं योजिलें होतें, पण तोंडानें मात्र तिला येवढेंच म्हणालों "मिनी जा ग तूं भोळाच्यावरोबर खेळ, मी आतां कामांत आहें."

मिनी माझ्या लिहिण्याच्या टेबलापाशीं माझ्या पायाजवळ बसून दोन्ही हात गर्दीगर्दीनें गुडघ्यावर फिरवून जोराजोरानें एड्डक बेड्डक खेळूं लागली.

गोष्ट वाचतां वाचतां, गोष्टीच्या सतराव्या भागांत कथानायक प्रतापसिंह यानें कांचनमालेला घेऊन अंधेऱ्या रात्रीं कारागृहाच्या उंच खिडकींतून नदींत उडी मारली येथवर मी आलों होतों. आमचें घर रस्त्यावर होतें. एकाएकीं मिनी एड्डक बेड्डक सोडून देऊन दरवाज्यांत धांवत जाऊन 'काबुली, काबुली'

म्हणून ओरडली. अंगांत मळके कपडे, डोक्याला उंचशी टोपी, पाठीवर एक गाठोडें व हातांत काबुली द्राक्षांचे दोनचार करंडे, असा एक उंच काबुली रस्त्यानें हळूहळू चालला होता, त्याला पाहून आमच्या मुलीच्या मनांत काय आलें असेल तें असो, तें जाणणें कठीण आहे. तिनें त्याला मोठमोठ्यानें हांक मारण्यास सुरुवात केली. मी मनांत म्हटलें, खांद्यावर बोजा घेतलेलें हें एक अरिष्टच उपस्थित झालें. हा काबुली आतां येणार व हा वाचीत असलेला भाग तसाच अपुरा टाकावा लागणार.

मिनीचा शब्द ऐकून तो काबुली किंचित् हंसला, व आमच्या घराकडे येण्यास निघाला.

इकडे मिनी मात्र घाबरून घरांत पळून गेली, ती पुन्हां म्हणून दिसली नाहीं. तिच्या मनांत त्याच्या झोळींत आपल्या सारखींच दोन चार मुलें भरलेलीं असतील असें आलें.

इतक्यांत काबुली येऊन किंचित् स्मित करून मला 'सलाम' करून उभा राहिला. मी मनांत म्हटलें कीं, प्रतापसिंह व कांचनमाला जरी मोठ्या संकटांत आहेत तरी एखाद्याला घरीं बोलावून आणून त्याच्यापासून कांहींच न घेणें चांगलें नाहीं. मी थोडीशी खरेदी केली. नंतर अबदुल रहिमान, रशिअन, इंग्रज व सीमान्त प्रान्तासंबंधीं राजकीय धोरण, या विषयांवर थोड्याश्या गोष्टी झाल्या. शेवटीं उठून जातांना त्यानें प्रश्न केला " बाबूजी, आपली मुलगी कोठें गेली ?" मी तिचें निष्कारण भय घालवून टाकण्याच्या अभिप्रायानें तिला घरांतून बोलावून आणिलें. ती एकदां काबुलीच्या तोंडाकडे तर एकदां त्याच्या झोळीकडे संशयानें पहात माझ्या कमरेला वळखा घालून मजजवळ उभी राहिली. झोळींतून थोडा बेदाणा व पिस्ते काढून तो काबुली तिला देऊं लागला, पण ती कांहीं केल्या घेईना. तिला अधिकच संशय येऊन ती माझ्या अंगाला अधिकच चिकटली. तिची पहिली ओळख अशा प्रकारें झाली.

तदनंतर कांहीं दिवसांनीं एके दिवशीं सकाळीं कांहीं विशेष कामाकरितां मी बाहेर पडलों, व पहातों तों काबुली मिनीच्या जवळ व मिनी दाराजवळच्या

बाकावर अशीं तीं दोघें कांहीं तरी गोष्टी बोलत बसलेलीं माझ्या दृष्टीस पडलीं. मिनीची बडबड चालली असून तो काबुली हांसत हांसत ऐकतो आहे व मधून मधून मोडक्या तोडक्या बंगालींत हो, हो म्हणत आहे. तिच्या पांच वर्षांचे आयुष्यांत तिच्या बाबाखेरीज शान्तपणानें ऐकणारा श्रोता तिला कोणी मिळाला नव्हता. तिचा लहानसा साडीचा ओचा बदामबेदाण्यांनीं भरला होता. मी काबुलीकडे पाहून विचारलें " हें तिला कोणीं दिलें ? पुन्हां असें देऊं नकोस." इतकें म्हणून एक अधेली काढून त्याला दिली त्यानें ती मुकाट्यानें झोळींत टाकली. घरीं परत आल्यावर पहातों तों त्या आठ आण्यांनीं सोळा आणे गोंधळ माजविला होता. त्या एवढ्या गोल चकचकीत तुकड्याबद्दल मिनीच्या आईनें तिची खूपच खरडपट्टी काढिली. आईनें तिला विचारलें " तुला ही अधेली कोठून मिळाली ? " मिनी म्हणाली "काबुलीनें दिली." आई म्हणाली "काबुलीपासून तूं ही अधेली कां घेतलीस?" मिनीनें रडण्यास सुरुवात केली. ती म्हणूं लागली "मी मागितली नाहीं. त्यानें आपणहून दिली." इतक्यांत मी येऊन मिनीला त्या संकटांतून सोडवून बाहेर घेऊन गेलों. मला आढळून आलें कीं, मिनीची व काबुलीची ही दुसऱ्यांदाच गांठ असें नाहीं. इतक्या अवधींत त्यानें प्रायः रोज येऊन बदाम पिस्त्यांची लांच देऊन मिनीचें कोमल अंतःकरण आकर्षित केलें होतें. ह्या दोघांमध्यें गप्पागोष्टी व थट्टामस्करीही चालत असे.

रहिमतला पहातांच आमची मुलगी त्याला हांसत हांसत विचारी " कायरे काबुली, तुझ्या झोळींत काय आहे ?" रहमतनें नाकांत व हांसत हांसत उत्तर द्यावें "हाती". त्याच्या झोळींत येवढा थोरला हत्ती येवढीच गोष्ट परिहासाला पुरे होई. दोघांनाही मोठें कौतुक वाटून हांसत. याप्रमाणें शरद् ऋतूंतील प्रभात-समयीं एक वयस्क मनुष्य व एक अति अल्पवयी मुलगी यांचा विनोद व अकृत्रिम हास्य पाहून मलाही कौतुक वाटे. त्या दोघांमध्यें आणखी एक विनोदाचा विषय होता. रहमत मिनीला विचारी "बेटा, तूं सासरीं नाहींस ना जाणार ?" बंगाली समाजांतील मुलींना सासर हा शब्द जन्मापासून परिचित, पण आम्ही थोड्या नव्या चालीचे असल्यामुळें इतक्या लहानपणीं सासर या शब्दाचा मिनीला

परिचय होऊं दिला नव्हता. म्हणूनच रहमतचा प्रश्न तिला सहजपणें समजला नाहीं. पण उत्तर न देतां स्वस्थपणें बसणें तिच्या स्वभावाच्या विरुद्ध. तिनें उलट विचारिलें "तूं सासरीं जाशील?" रहमतनें मूठ मिटून काल्पनिक सासऱ्याकडे उगारून म्हणाला "मी सासऱ्याला चांगला मारीन." हें ऐकून मिनीला वाटलें कीं श्वशूर नांवाचा कोणी दुष्ट प्राणी असतो. ती मोठमोठ्यानें हांसली. हा शरद् ऋतूचा समय. प्राचीन काळीं राजे लोक याच दिवसांत दिग्विजयाला निघत. मी मात्र कलकत्ता सोडून कधींच गेलों नव्हतों. म्हणूनच माझें मन सर्व पृथ्वी हिंडून येत असे. विदेशाचें नांव ऐकतांच माझें मन चंचल होई. तसेंच एकादा विदेशी दृष्टीस पडतांच तेथील नद्या, पर्वत, अरण्यें व झोंपड्या यांचें चित्र माझ्या डोळ्यांसमोर उभें रहात असें व त्यांची स्वाधीनता, त्यांचा उल्हासपूर्ण जीवनक्रम यांची कल्पना मनांत घोळूं लागे.

मी इतका उद्भिजप्रकृती बनलों होतों कीं प्रवासाचें नांव वज्राघाताप्रमाणें वाटे. म्हणूनच सकाळच्या प्रहरीं आमच्या लहानशा घरांत टेबलाशीं बसून ह्या काबुलीशीं गोष्टी सांगत बसण्यांत दूरवर पर्यटन केल्याचें काम होत असें.

निरुंद दऱ्याखोऱ्यांनीं वेष्टित अशा त्या उंचशृंग पर्वताच्या पायथ्याशीं बसून ओझ्यांनीं लादलेल्या उंटांची रांगच्या रांग, व पगडी घातलेले पथिक, कांहीं उंटावर व कांहीं पायीं; कोणाच्या हातांत बर्च्या, तर कोणाच्या हातांत तोड्याच्या बंदुका; असे खालीं उतरून मैदानाकडे चालले आहेत असें मी प्रत्यक्ष पहात आहें असा भास होई. काबुली मेघचंद्रस्वरानें मोडक्या बंगालींत आपल्या देशासंबंधीं गोष्टी सांगे; तेव्हां तें सगळें माझ्या डोळ्यासमोर उभें राही.

मिनीची आई अत्यंत संशयी होती. रस्त्यांत कांहीं गलबला झाला कीं, तिला वाटे आमच्यावरच कांहीं संकट येत आहे. तिला वाटत असे, पृथिवी म्हणजे सर्वत्र चोर, डाकू, साप, वाघ, मलेरिया, झुरळें, घुले ह्यांनींच दाट भरून गेली आहे. इतके दिवस पृथिवीवर राहूनही हें भय तिच्या मनांतून गेलें नव्हतें.

रहमत काबुलीसंबंधानेंही तिचें मन साशंक असे व तिनें मला त्याच्याशीं सावधपणानें वागण्याबद्दल बजाविलें होतें. मी तिचा संशय थट्टेवर घालविला तरी ती मला पर्यायानें प्रश्न केल्यावांचून रहात नसे. तिनें विचारावें, "मुलांना कुणी उचलून नेतच नाहीं कां?" "काबुलांत अजून गुलामगिरी चालूच आहेना?" "येवढ्या थोरल्या धिप्पाड काबुलीला लहानशी मुलगी चोरून घेऊन जाणें मोठें कठीण आहे कां?"

मी म्हटलें, हा व्यापार अगदीं अशक्य नसला तरी असंभवनीय आहे. खऱ्या गोष्टीवर सर्वांची सारखी श्रद्धा बसते असें नाहीं. आमच्या कुटुंबाच्या मनांतील भय गेलें नाहीं, तथापि कांहीं दोष दृष्टीस पडल्यावांचून रहमतला घरीं येणें बंद करणें मला प्रशस्त वाटेना. दरवर्षी माघ महिन्यांत रहमत आपल्या देशीं जात असे. याच सुमारास तो उघ्राणी करण्यांत अगदीं व्यग्र असे. घरोघर जावें लागे तरी एकदांतरी मिनीचें दर्शन घेतल्यावांचून तो रहात नसे. एखाद्याला वाटे कीं, उभयतांमध्यें कांहीं गुप्त कट चालला आहे. जे दिवशीं सकाळीं सवड मिळत नसे ते दिवशीं तो संध्याकाळीं तरी ठेवलेलाच.

अंधकारांत पोकळ कपडे घातलेल्या, पाठीवर मोठी थोरली झोळी घेतलेल्या ह्या उंचच्याउंच काबुलीला पाहून कधीं कधीं मीही मनांत दचकत असें. मिनी "काबुली," "काबुली" करून हांसत हांसत धावत जाई व विषम वयाच्या सोबत्यांमध्यें पूर्ववत् अकृत्रिम परिहार चाललेला पाहून माझें मन उलट प्रसन्नच होत असे.

एके दिवशीं सकाळीं मी आपल्या खोलींत प्रुफें तपासीत बसलों होतों. तो काबुली निरोप घेऊन जाण्यापूर्वी दोन दिवस थंडी कडाक्याची पडली होती अशा वेळीं खिडकींतून टेबलाखालीं माझ्या पायावर ऊन पडलें होतें. हें ऊन आज फारच सुखकारक वाटत होतें. आठ वाजण्याच्या सुमारास फेरीवाले डोक्याला गळबंद बांधून सकाळचें हिंडणें संपवून बहुधा आपल्या घरीं जात होते. एकाएकीं रस्त्यांत गडबड झालेली ऐकूं आली म्हणून बाहेर येऊन बघतों तों आमच्या रहमतला दोन शिपायी बांधून घेऊन चालले आहेत, व

मागून मुलांचा घोळका चालला आहे. रहमतच्या कपड्यावर रक्ताचे डाग होते व शिपायांच्या हातांत रक्तानें भरलेला सुरा होता. मी बाहेर जाऊन शिपायांना थांबवून विचारलें, " हा काय प्रकार ? " कांहीं शिपायांकडून व कांहीं रहमत-कडून समजलें कीं, आमच्या एका शेजाऱ्यानें त्याच्याकडून रामपुरी शाल विकत घेतली होती त्याचे पैसे देणें राहिलें होतें. पण तें देणें तो नाकबूल करूं लागल्यामुळें दोघांत बोलाचाली होऊन रहमतनें त्याला सुऱ्यानें भोसकलें.

रहमत त्या खोटें बोलणाराला उद्देशून नाना प्रकारें अश्राव्य शिव्या देत आहे, इतक्यांत "काबुली" "काबुली" करून हांक मारीत मिनी घरांतून बाहेर येऊन ठेपली. क्षणभर रहमतचा चेहरा प्रफुल्लित झाला. त्याच्या खांद्यावर आज झोळी नव्हती म्हणून तत्संबंधीं तिला आज नेहमींचा प्रश्न करितां आला नाहीं. तिनें लगेंच दुसरा प्रश्न केला," तूं सासुरवाडी जातोस? "रहमत हांसून म्हणाला "होय, तिकडेच जात आहें. " मिनी हांसली नाहींसें पाहून तिच्याकडे हात करून म्हणाला " सासऱ्याला मारलें असतें, पण काय करूं, हात बांधले गेले !!" प्राण-हानी होण्याजोग्या आघाताच्या आरोपाबद्दल रहमतला कित्येक वर्षांची कारा-गृहाची शिक्षा झाली. मी त्या काबुलीची गोष्ट एकप्रकारें विसरून गेलों होतों. आमचा नित्य व्यवसाय चालूं असतां एकामागून एक दिवस गेले. पण तो स्वाधीन वृत्तीचा पर्वतविहारी पुरुष आपले दिवस कारागृहांत घालवीत असेल याचा विचारही येत नसे. आमच्या चंचलप्रकृती मिनीचेंही वर्तन अक्षम्य होतें, हें तिच्या वडिलांनाही कबूल केलें पाहिजे. ती आपल्या पुरातन मित्राला अगदीं विसरून जाऊन तिनें नवीन नवीन मैत्रिणींशीं सख्य संपादन केलें होतें. जशी ती मोठी होत गेली तशी बराचसा काळ आपल्या सख्यांच्या सहवासांत घालवूं लागली.

येथपर्यंत मजल येऊन ठेपली कीं ती आपल्या वडिलांच्या खोलींतही येईनाशी झाली. मला देखील तिच्याशीं बोलण्याचा प्रसंग कमी येऊं लागला.

कित्येक वर्षें निघून गेलीं. पुन्हा शरदृतु आला. आमच्या मिनीचा विवाह निश्चित झाला होता. पूजेच्या सुट्टींतच विवाह करण्याचें ठरलें. दुर्गेच्या बरोबरच

आमची गृहदीपिका पितृभवन अंधःकारमय करून पतिगृहीं जाणार होती. प्रभातप्रभा अति रमणीय पडली होती. वृष्टीनंतर हवा जणूं काय धुवून स्वच्छ झाली होती. रविकिरण सुवर्णमय भासत होते. ते इतके होते कीं, कलकत्त्यांतील गल्ल्यांच्या विटांच्या भिंतींना सुद्धां शोभा आणीत होते.

आमच्या घरीं आज रात्र संपते न संपते तोंच सनई वाजण्यास सुरवात झाली. तिच्या अवाजासरशीं माझें हृदय कापूं लागलें. त्या करुणामय भैरवी रागिणीनें माझें प्रत्यासन्न विश्लेष दुःख द्विगुणित केलें. आजच आमच्या मिनीचा विवाहमुहूर्त. घराच्या प्रत्येक खोलींत व्हरांड्यांत झुंबरें टांगण्याचा आवाज ऐकूं येत होता. गलबला व गडबडीला पारावार नव्हता. मी आपल्या वाचनाच्या खोलींत हिशोब पहात बसलों आहें अशा समयीं रहमतनें येऊन सलाम केला. मी प्रथम त्याला ओळखिलें नाहीं. त्याचे ते लांब लांब केस नाहींत, त्याचें तें पूर्वीचें तेज नाहीं. त्याची हास्यमुद्रा पूर्ववत् होती, व त्यावरूनच मी त्याला ओळखिलें. मी विचारलें " कारे रहमत, केव्हां आलास ? " त्यानें उत्तर दिलें "काल संध्याकाळीं माझी जेलमधून सुटका झाली." हें ऐकून मनाला थोडा धक्का बसला. कोणी खुनी मनुष्य प्रत्यक्ष कधीं पाहिला नव्हता; त्यामुळें ह्याला अशा स्थितींत पहातांच मन अस्थिर झालें. मनांत आलें कीं, आजच्या सारख्या शुभ दिवशीं हा मनुष्य येथून गेला तर बरा.

मी त्याला म्हटलें " आज आमच्या घरीं कार्य आहे, मी थोडा कामांत गुंतलों आहें, तूं आज जा. " माझे शब्द ऐकतांच तो जायला तयार झाला, पण दरवाज्यापर्यंत गेल्यावर थोडें घोटाळल्यासारखें करून म्हणाला, " मुलीला एकदां पाहिलें असतें. " त्याच्या मनांत मिनी जणूं काय जशीच्या तशी आहे. ती पाहिल्यासारखीच "काबुली" "काबुली" करीत धांवत येईल, पूर्वींप्रमाणेंच कौतुकानें विचारील, त्यांत कांहीं फरक पडणार नाहीं. त्याला आपल्या पहिल्या मिनीची आठवण होऊन त्यानें आपल्या देशाच्या स्नेह्यापासून थोडे बदाम व द्राक्षें पुड्यांत घालून आणिलीं होतीं. त्याची ती नेहमींची झोळी त्याजवळ नव्हती. मी पुन्हां म्हटलें " आज घरीं कांहीं कार्य आहे, आज कोणाची भेट

होणार नाहीं." त्याचें मन अगदीं विरस झालें, कांहीं वेळ स्तब्ध उभा राहून त्यानें माझ्याकडे केविलवाण्या मुद्रेनें पाहिलें. "बाबू सलाम" म्हणून सलाम करून बाहेर पडला.

मी थोडा कष्टी झालों. माझ्या मनांत आलें कीं, त्याला परत बोलवावें इतक्यांत पहातों तों तो आपण होऊनच परत फिरला होता व जवळ येऊन म्हणाला, "हा बेदाणा, किसमीस, बदाम ही मुलीकरतां आणिलीं होतीं. तिला द्याल कां?" मी ते घेऊन पैसे द्यायला लागलों, त्यानें माझा हात धरून म्हटलें, "आपली आमच्यावर फार दया. आमची आठवण ठेवा म्हणजे झालें. मला पैसे नको. बाबूजी, तुमच्या येवढीच आमच्या घरीं मुलगी आहे. तिची आठवण होऊन मी तुमच्या मुलीला कांहीं तरी द्यायला हातांत घेऊन आलों. मी कांहीं पैशाच्या लालचीनें आलों नाहीं."

इतकें म्हणून त्यानें आपल्या पोकळ अंगरख्याच्या आंत हात घालून छातीजवळून एक मळक्या कागदाचा तुकडा बाहेर काढला व फार जपून घडी उलगडून दोन्ही हातांनीं माझ्या टेबलावर पसरून सुरकुत्या मोडून धरला. कागदावर एक लहान हाताचा ठसा उमटलेला होता, फोटोग्राफ नाहीं, रंगित चित्र नाहीं, केवळ हाताला थोडासा रंग लावून कागदावर त्याचा ठसा उमटविलेला होता. मुलीचें हें स्मरण-चिन्ह छातीशीं बाळगून रहमत दरवर्षी कलकत्त्याच्या रस्त्यांतून मेवा विकीत फिरत असे. जणूं काय हें अल्प सुकोमल हस्त-चिन्ह त्याच्या विशाल विरही वक्षस्थलावर सुधाक्षेपण करीत होतें. माझे डोळे पाण्यानें भरून आले. तत्क्षणीं हा एक मेवावाला काबुली व मी उच्च कुलांतला बंगाली हा भेदभाव मी विसरून गेलों. तोही पुत्रवत्सलच. त्याच्या त्या पर्वतवासिनी पुत्रीच्या अल्पहस्त-चिन्हानें मलाही मिनीची आठवण करून दिली. मी तत्क्षणींच तिला अंतःपुरांतून बोलावून आणण्याकरितां पाठविलें. बायकांत मोठी गडबड उडून गेली. त्यांनीं नानातऱ्हेच्या शंका काढल्या. पण मी कोणाचेंच कांहीं ऐकिलें नाहीं. केशरी अष्टपुत्री नेसलेली, कपाळावर मळवट भरलेली ती उपवर नववधू मिनी माझ्या पुढें येऊन लाजत लाजत उभी राहिली.

तिला पाहून काबुली प्रथम चकित झाला. पूर्ववत् भाषण करणें असंभव होतें. शेवटीं हांसून म्हणाला, "मुली, सासरीं चाललीस आँ ?"

पण मिनी आतां सासर शब्दाचा अर्थ समजूं लागली होती. आतां ती पूर्वीप्रमाणें उत्तर देऊं शकली नाहीं. रहमतचा प्रश्न ऐकून लज्जित होऊन किंचित् तोंड फिरवून ती उभी राहिली. काबुलीशीं मिनीची जे दिवशीं प्रथम गांठ पडली त्या दिवसाची मला आठवण झाली व मी थोडा उद्विग्न झालों. ती गेली तसा रहमत सुस्कारा टाकून जमिनीवर बसला. त्याच्या मनांत स्पष्ट विचार आला कीं, आपली मुलगी ही मिनीसारखीच इतक्या वर्षांत मोठी झाली असेल. तिच्याशींही आतां पूर्ववत् बोलतां चालतां येणार नाहीं. ती ओळखसुद्धां विसरून गेली असेल. ह्या आठ वर्षांत तिचें काय झालें असेल तेंही कोणीं सांगावें ?

प्रातःकाळीं शरद् ऋतूंतील स्निग्ध ऊन पडलें. सनई वाजूं लागली. रहमत कलकत्त्याच्या एका गल्लींत बसून अफगाणिस्थानांतील रूक्ष पर्वतांचा देखावा पहात होता.

मी एक करन्सी नोट काढून रहमतला दिली व म्हटलें "रहमत, तूं आपल्या देशीं मुलीकडे परत जा. तुझ्या आशिर्वादानें मिनीचें कल्याण होईल." हे पैसे खर्च झाल्यामुळें उत्सवापैकीं एक दोन बाबी मला कमी कराव्या लागल्या. पूर्वसंकल्पाप्रमाणें विजेचा लाईट जसा हवा होता तसा करितां आला नाहीं. बँड पण बंद करावा लागला. घरांतील बायका असंतुष्ट झाल्या. पण मंगल या दृष्टीनें आमचा उत्सव अधिकच उज्वल झाला.

*  *  *

एखाद्या फुलाचें किंवा नैसर्गिक दृश्याचें सौंदर्य जसें पृथःकरण करून पहातां यावयाचें नाहीं तद्वत्च रवींद्रनाथांच्या बहुतेक सर्व लेखांतील माधुरी अमुक एका भागांत आहे असें म्हणतां येणार नाहीं.

या गोष्टीचें कथानक अत्यंत साधें असून भाषाही कवित्वप्रचुर नाहीं. मिनी व काबुली हीं दोनहीं चित्रें उत्कृष्ट वठलीं आहेत. काबुलीसारख्या क्रूर व संस्कार-हीन जातीच्या माणसाचें देखील अंतःकरण किती कोमल व शुद्ध असूं शकतें हें आपल्याला अन्यत्र क्वचित्‌च सांपडेल. आपल्या चालीरीतींत सुधारणा कशा घडवून आणिल्या पाहिजेत हें ह्या गोष्टींत फार खुबीनें सुचविलें आहे. रवींद्र-नाथांच्या लेखांतील हा एक विशेष आहे कीं, कोणकोणत्या सामाजिक सुधारणा केल्या पाहिजेत हें ते सिद्धांतरूपानें न मांडतां तशा तऱ्हेचा प्रसंग आणून कोणाच्याही मनाला धक्का न पोंचेल अशा रीतीनें ते जागजागीं सूचित करतात. या कथेंत "उद्भिजप्रकृती" "मेघमंद्रस्वर" वगैरे शब्द जसेच्या तसेच बंगाली भाषेंतून घेतले आहेत. भाषेमध्यें नवे नवे शब्द, रचना, कल्पना, दृष्टांत वगैरे प्रचारांत आणल्यावांचून भाषेची वृद्धी होणार नाहीं. अर्थात्‌च असे प्रयोग सदभिरुचीला सोडून असल्यास ते रूढ होणार नाहींत.



## १९. क्षुधित पाषाण

मी व माझे एक आप्त पूजेच्या सुटींत देशपर्यटनास निघालों तें संपवून कल-कत्त्यास परत येत असतां आगगाडींत एका गृहस्थाची व आमची गांठ पडली. त्याचा पोषाख पाहून आमचा प्रथम समज झाला कीं, हा कोणीतरी पश्चिमेकडील मुसलमान असावा. त्याचें बोलणें चालणें ऐकून तर अधिकच चकित झालों. विधाता जणूं काय या गृहस्थाचा विचार घेऊनच आपल्या कार्यास प्रवृत्त होत असेल. अशा रीतीनें जगांतील सर्व विषयांवर बोलण्यास या स्वारीनें सुरुवात केली. रशियन लोक हिंदुस्थानावर चाल करून अगदीं जवळ आले आहेत, इंग्रजांचीं कांहीं गुप्त व अगम्य कारस्थानें चाललीं आहेत, एतद्देशीय संस्थानांतील माजून राहिलेला गोंधळ विकोपाला गेला आहे, वगैरे अद्भुत, अश्रुतपूर्व घटना ह्याचे तोंडून ऐकून मनाला वाटलें कीं, आपण अंधेरांत होतों तेंच सुखी होतों. आमचे नवपरिचित वाक्‌पंडित किंचित् हास्यवदन करून म्हणाले— अरे होरेशिओ, तुमच्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होतात त्यांपेक्षां कितीतरी गोष्टी ह्या भूतलावर घडत असतात( There happen more things in heaven and earth, Horatio, than are reported in your newspapers ).

आम्ही प्रथमच घराबाहेर पडलों असल्यामुळें ह्या स्वारीचें पांडित्य पाहून आश्चर्यचकित होऊन गेलों. विषय कितीका क्षुल्लक असेना, ह्यांचा पांडित्य-प्रकर्ष, वेदांवरील भाष्य, पर्शियन कवींच्या उक्ती, आपल्या समर्थनार्थ उद्‌धृत केलेल्या पाहून ह्या पंडितमन्यांबद्दल आमची श्रद्धा अधिकाधिकच वाढत चालली; ह्याचें विशेष कारण म्हटलें म्हणजे आमचे वेद, शास्त्र, पारशी भाषा यांबद्दलचें घोर अज्ञान. माझ्या थिऑसफिस्ट नातेवाईकाची तर खात्रीच झाली कीं, आमच्या सहयात्रिकाचा कांहीं अलौकिक शक्तीशीं संबंध असावा, अथवा मॅग्नेटिक सामर्थ्य, दैविक शक्ति अथवा एखाद्या सूक्ष्म शरीराशीं संपर्क किंवा

असाच कांहींतरी प्रकार असला पाहिजे. त्यांनीं ह्या असाधारण पुरुषाच्या समस्त सामान्य गोष्टी देखील शांतपणें भाक्तिभावानें ऐकून घेतल्या. येवढेंच नव्हे तर, चोरून न कळत टिपणें करून घेतलीं. ह्या असामान्य व्यक्तीनेंही ही गोष्ट पाहिली व ते मनांत फार खुष झाले.

गाडी जंक्शनवर येऊन थांबतांच दुसऱ्या गाडीची वाट पाहाण्याकरितां वेटिंगरूममध्यें आह्मी पुन्हां एकत्र झालों. या वेळीं रात्रीचे दहा वाजले होते. वाटेंत कांहीं घोटाळा झाल्यामुळें गाडी येण्याला फार अवकाश आहे म्हणून ऐकिलें. मी टेबलावर बिछाना पसरून निजण्याच्या तयारींत होतों. इतक्यांत ह्या असाधारण व्यक्तींनीं निम्नलिखित कथा सांगण्यास आरंभ केला. अर्थात् ते दिवशीं आम्हांला झोंप मिळाली नाहीं.

राजकारणाच्या एक दोन बाबतींत माझा मतभेद झाल्यामुळें मी जुनागडची नोकरी सोडून हैदराबादच्या निजामसरकारची नोकरी पत्करिली. मी अल्पवयी सशक्त असल्यामुळें प्रथम 'बरीच' येथें कापसाच्या जकातवसुलीचे कामावर माझी नेमणूक केली.

बरीच हें स्थान फार रमणीय आहे. डोंगराच्या पायथ्याशीं निर्जन निबिड अरण्यांतून सुस्ता ( संस्कृत "पव स्वच्छतो या"चा अपभ्रंश ) नदी उपलमुखरित-मार्गीं एखाद्या निपुण नर्तकीप्रमाणें ठुमकत मुरडत द्रुतगतीनें वहात होती. ह्याच नदीतीरावर फरसबंदी दीडशें पायऱ्यांच्या घाटावर डोंगराच्या पायथ्याशीं एक संगमरवरी दगडाचा प्रासाद बांधिलेला होता. आसपास एकही इमारत नव्हती. बरीचगांवचा कापसाचा बाजार व गांव ह्या ठिकाणापासून बराच दूर होता.

सुमारें अडीचशें वर्षांपूर्वीं दुसऱ्या महमदशहानें आपल्या विलासोपभोगा-करितां ह्या एकांतस्थळीं हा राजवाडा बांधला होता. त्या वेळीं स्नानगृहांतील कारंजामधून गुलाबपाण्याचे फवारे उडत व केस मोकळे सोडलेल्या पारसीक तरुणी तेथील तुषारशीतल संगमरवरी स्निग्ध शिलातलावर बसून कोमल अनावृत्त पदपल्लव, निर्मल जलाशयांत सोडून स्नानापूर्वीं वीणा घेऊन द्राक्षावना-संबंधीं गरील गात बसलेल्या दृष्टीस पडत.

सांप्रत ते फवारे नाहींत, गायनही नाहीं. त्या शुभ्र पाषाणावर शुभ्र पदाघातांचा मधुर ध्वनीही नाहीं. हल्लीं तें भयाण, शून्य, वसतिस्थान आमच्यासारख्या निर्जनवासपीडित सहचरीविरहित कर वसूल करणाऱ्या कलेक्टरच्या योग्य झालें होतें. परंतु, आमच्या ऑफिसांतील वृद्ध कारकून करीमखान यानें त्या प्रासादांत न राहण्याविषयीं पुष्कळदां आग्रहानें सांगितलें. वाटल्यास दिवसा रहा, पण कधींही येथें रात्रीं वस्तीस राहूं नका म्हणून त्यानें बजाविलें. आम्ही त्याचें सांगणें हासण्यावारी घालविलें. नोकरांनीं सांगितलें कीं, "संध्याकाळपर्यंत आम्ही काम करूं, पण रात्रीं राहाणार नाहीं." मी ठीक आहे, म्हणून सांगितलें. या घराबद्दल इतका अपवाद पसरला होता कीं, चोरसुद्धां येथें येण्याचें धाडस करीत नसत.

प्रथम प्रथम ह्या बहिष्कृत पाषाण-प्रासादाची विजनता माझ्या मनावर एखाद्या दडपणाप्रमाणें भासूं लागली. मी होतां होईतों बाहेर रहात असें व अविश्रांत श्रम करून रात्रीं घरीं परत आल्यावर सुखानें झोंप घेईं.

तथापि एक आठवडा गेला नाहीं तोंच या घराबद्दल एक प्रकारचा अपूर्व मोह मजमध्यें उत्पन्न झाला. माझी ती अवस्था वर्णन करणें कठीण व लोकांचा विश्वास बसणेंही कठीण.

तो समस्त प्रासाद एखाद्या सजीव प्राण्याप्रमाणें आपल्या जठरस्थित मोहरसानें हळूहळूं जणूं काय मला जीर्ण करूं लागला.

बहुधा वाड्यांत पाऊल टाकल्यापासूनच या प्रक्रियेस आरंभ झाला असावा. पण जे दिवशीं प्रथम मला या गोष्टीची जाणीव उत्पन्न झाली त्या दिवशींच्या गोष्टीचें मला स्पष्ट स्मरण आहे.

ते दिवशीं ग्रीष्मऋतूला सुरुवात झाली होती. बाजारही मंद.

मला कांहीं काम नव्हतें. सूर्यास्तापूर्वी नदीच्या कांठीं घाटाच्या तळच्या पायरीवर मी आराम खुर्ची टाकून बसलों होतों.

सुस्ता नदीचें पात्र आकुंचित होऊन पाणीहि बरेंच कमी झालें होतें. पलीकडच्या वालुकामय तीराचा बराचसा भाग अपराण्ह काळच्या उन्हानें प्रकाशित झाला होता. अलीकडील तीरावर घाटाच्या पायथ्याशीं पाणी स्वच्छ व

उथळ असल्यामुळें तळांतील वाळू चमकत होती. ते दिवशीं वारा लेशमात्र नव्हता. जवळच्या टेंकडीवर रानतुळशी, पुदीना वगैरे झाडांच्या सुगंधानें तेथील स्तब्ध वातावरण दुमदुमून गेलें होतें.

सूर्य गिरिशिखराच्या पार्श्वभागीं अंतर्धान पावतांच दिनरूपी रंगभूमीवर छाया-जवनिका पडली. सूर्यास्तसमयीं प्रकाश व अंधकार यांचें संमिश्रण पर्वताच्या व्यवधानामुळें चिरकाल दृग्गोचर होण्यासारखें नव्हतें. घोडयावर बसून एक वेळ फेरफटका करून यावें म्हणून मनांत आलें व आतां उठणार इतक्यांत घांटाच्या पायऱ्यांवर पडशब्द ऐकूं आल्याचा भास झाला.

मागें वळून पहातों तों कोणी नाहीं. इंद्रियभ्रम असें समजून पुन्हां बसतों तों एकाएकीं अनेक पावलांचा ध्वनी ऐकूं आला; जणूं काय मोठा जनसमूह गर्दीगर्दीनें पायऱ्यांवरून उतरत आहे; किंचित् भय व आनंद यांनीं माझें सर्व शरीर पुलकित होऊन गेलें. यद्यपि एकही आकृती दृग्गोचर नव्हती तरी, या ग्रीष्म संध्यासमयीं उल्लसितहृदय स्वभावलोल स्त्रीगण अवगाहनार्थ सुस्तेमध्यें अवतीर्ण झालेला प्रत्यक्ष पहात आहें असा भास झाला.

जरी या संध्याकाळीं निस्तब्ध गिरितटावर किंवा या निर्जन प्रासादांत कोठेंही यत्किंचित् ध्वनी नव्हता, तरी प्रस्तराहत स्त्रोतशतधारासदृश शब्द मी स्पष्ट-पणें ऐकिला. स्नानार्थी स्त्रीजन कौतुकानें हांसत हांसत एकमेकींना धरण्या-करितां द्रुतगतीनें माझ्या पार्श्वभागाकडून जात होता. त्यांचाच तो पदशब्द. जणूं काय माझ्याकडे त्यांचें लक्ष गेलें नाहीं. तो जन मला जसा अदृश्य तसा मीही त्यांना अदृश्य. नदी पूर्ववत् स्थिर होती. तथापि मला स्पष्ट भास झाला कीं, वलयशिंतहस्तविक्षेपामुळें नदीचें अनतिगंभीर स्वच्छ जल क्षुब्ध झालें आहे, हांसत हांसत सखीगण परस्परांवर जल सेक करीत आहे व संतरणक्रियेच्या-पदाघातामुळें उद्धृतजलबिंदुसंपात मुक्ताराशीप्रमाणें चमकत आहेत.

माझें हृदय धडधड करूं लागलें. तें उत्तेजित झाल्यामुळें भयानें, आनंदानें का कुतूहलानें हें नीटसें सांगतां येत नाहीं. नीट न्याहाळून पहावें म्हणून फार इच्छा झाली, पण सन्मुख असें कांहींच नव्हतें. मनांत आलें कीं, लक्ष लावून

ऐकिलें असतां सर्व ऐकूं येईल. पण मन एकाग्र करून, कान लावून ऐकूं लागलों तों जंगलांतील रातकिड्याच्या आवाजाखेरीज दुसरें कांहींच ऐकूं येईना. मला वाटलें कीं, दोन अधिक शतकांचा कृष्णवर्ण पडदा माझ्या समोर टांगलेला आहे व मी भीत भीत त्याचा एक कोपरा उचलून पहात आहें. पण जवनिकांतर्गत सभा तिमिराकीर्ण असल्यामुळें दृग्गोचर होऊं शकत नाहीं.

वायू वाहूं लागला व ती संध्यासमयींची निवांत निश्चलता एका क्षणांत नष्ट झाली. सुस्तेचा स्थिर प्रवाह पहातां पहातां वनदेवतेच्या संहृत केशकलापाप्रमाणें दिसूं लागला. संध्याछायावृत समस्त वनभूमी एकसमयावच्छेदेंकरून दुःस्वप्नांतून जागी झाल्याप्रमाणें उठून मर्मररव करीत आहे असा भास झाला. स्वप्न म्हणा अथवा सत्य म्हणा; तें अडीचशें वर्षांपूर्वींच्या जगाचें दृश्य मजसमोर उपस्थित झालेलें मृगजलाप्रमाणें एका क्षणांत अदृश्य झालें. ज्या मायामय रमणी मजजवळून देहहीन द्रुतपदांनीं शब्दहीन उच्च हास्य करीत सुस्तेच्या पाण्यांत स्नानार्थ उतरल्या होत्या त्या आर्द्रवस्त्रजलानिष्कर्षण करीत करीत माझ्या बाजूनें पुन्हां परत जातांना दृष्टीस पडल्या नाहींत. वायू ज्याप्रमाणें गंध उधळून टाकितो त्याप्रमाणें वसंतकालच्या अनिलानें त्यांना जणूं काय उडवून दिलें.

अशा एकांत स्थळीं मला पाहून कवितादेवीनें बहुधा माझें मन आक्रान्त केलें अशी बलवत् शंका माझ्या मनांत उत्पन्न झाली. कापसावरील कर वसूल करून उपजीविका करणाऱ्या मजसारख्या गरिबाला खास त्या सर्वस्वविनाशिनीनें पछाडिलें असलें पाहिजे. रिक्तोदरच सर्व रोगाचें मूळ म्हणून यथेच्छ भोजन करण्याचें ठरविलें.

मी आपल्या आचाऱ्याला बोलावून पुष्कळ तूप मसाला घालून मोगलाई तऱ्हेचा खाना करण्यास सांगितलें.

दुसरे दिवशीं सकाळीं झालेल्या प्रकाराबद्दल हासूं येऊं लागलें. मन प्रसन्न होतें. साहेबासारखी सोला टोपी घालून स्वतः गाडी हांकण्यास बसून खाडखाड करीत आपल्या कामावर निघून गेलों. तो दिवस त्रैमासिक अहवाल धाडण्याचा असल्यामुळें परत घरीं येण्यास उशीर होणार होता. पण संध्याकाळ होते न

होते तोंच कशामुळें तें सांगतां येत नाहीं घरीं जाण्याचा ओढा सुरूं झाला. सगळीजणें वाट पाहात आहेत, तेव्हां आणखी उशीर करण्यांत अर्थ नाहीं, असें मनांत आलें. अहवाल अपुरता टाकून, सोलाटोपी डोक्यावर ठेऊन आमच्या रथचक्रशब्दानें त्या संध्याधूसर तरुच्छायाच्छादित निर्जन मार्गाला विस्मित करीत करीत आमची स्वारी त्या विस्तीर्ण शैलान्तवर्ती दीपरहित प्रासादासमीप येऊन थडकली.

पायऱ्या संपतांच एक विशाल दिवाणखाना असे. त्याचें छत नक्षीकाम केलेल्या भव्य कमानीवर ठेवलेलें असून त्या कमानी मोठमोठ्या खांबांच्या तीन रांगांवर उभारल्या होत्या. ह्या प्रचंड प्रासादांतील निर्जनताभरानें जणूं काय त्या कमानी वाकून गेल्याशा दिसत. सूर्य नुक्ताच अस्तास गेला होता. दिवेही लावले नव्हते. दरवाजा ढकलून मी त्या दिवाणखान्यांत प्रवेश करितों तों जिकडे तिकडे गडबड उडून गेली आहे, असा भास झाला. जणूं काय एकाएकीं जमलेली मंडळी कोणी दरवाज्यांतून, कोणी खिडकींतून ज्याला जिकडे वाट सांपडेल तिकडे पळत सुटली.

माझ्या कोणीही दृष्टीस न पडल्यामुळें मी अगदीं चकित झालों व आंगावर कांटा उभा राहिला. सुवासिक तेलें, व अत्तरांचा वास आल्याचा भास झाला. मी त्या दीपहीन निर्जन प्रचंड घराच्या शिलास्तंभश्रेणीच्या आड उभा राहून पहातों तों कारंज्याच्या फवाऱ्याचें पाणी दुग्धवर्ण शिलातलावर सशब्द पडत आहे. सतारींतून कांहीं अपरिचित गीतध्वनी निघत आहे. मधून स्वर्णालंकारांचा मंजुळ शब्द, नूपुरशिंजित ताम्रघंटांचे कालदर्शक ठोके, दूर अंतरावर नगाऱ्याचा आवाज, झुंबरांच्या लोलकाचा वायुविघट्टननिर्मित टुणटुण ध्वनि, गृहपथांतील पिंजऱ्यांमधून बुलबुल पक्षांचें गायन, बागेंतून पाळीव सारस पक्षांचें आक्रंदन—हें सर्व मिळून मजभोंवतीं जणूं एक अलौकिक नादसृष्टीच उत्पन्न झाली होती. मी एकाएकीं इतका मोहित झालों कीं, हा अवास्तव अगम्य स्पर्शातीत व्यापार काय तो सत्य व बाकी सर्व मृगजलवत् मिथ्या असें निश्चितपणें वाटूं लागलें. मी—जो मी—म्हणजे श्रीयुत

अमुक अमुक श्रीयुतांचा ज्येष्ठ चिरंजीव, जकात वसुलीच्या कामावर दरमहा साडेचारशें रुपये मिळविणारा, सोला टोपी व नितंबलंबी कोट घालून टांग्यांत बसून ऑफिसांत जाणारा, ह्या सर्व गोष्टी मला इतक्या विलक्षण हास्यकारक वाटूं लागल्या कीं, मी त्या निर्जन विशाल अंधेऱ्या घरांत उभा असतां मोठमोठ्यानें हासूं लागलों.

याचवेळीं माझा मुसलमान नोकर केरोसीनचा दिवा घेऊन आंत आला, तो मनांत मला वेडा समजला कीं काय हें ठाऊक नाहीं. पण मी श्रीयुत अमुकचंद्र यांचा ज्येष्ठ मुलगा श्रीयुत अमुकनाथ खास याचें स्मरण झालें. या जगांत किंवा जगाच्या बाहेर कोठें कां होईना, अमूर्त कारंजीं निरंतर उडतात किंवा नाहीं व अदृश्य अंगुलीच्या आघातानें मायातंत्रींतून अनंत रागिणी वाजतात कीं नाहीं हें कवी महाकवी यांनीं ठरवावें; येवढें मात्र खचित कीं मी बरीचच्या बाजारांत कापसाच्या जकातवसुलीच्या कामावर असून दरमहा साडेचारशें रुपये मिळवीत असतों.

मी प्रवासमेजाजवळ केरोसीनच्या दिव्याशीं वर्तमानपत्र हातांत घेऊन बसलों असतां, मला जो कांहीं मिनिटांपूर्वी मोह पडला होता त्याबद्दल मोठ्या कौतुकानें मी हासूं लागलों.

वर्तमानपत्र संपवून मोंगलाई खाना खाल्ल्यावर कोपऱ्यांतील एका लहानशा खोलींत दिवा मालवून हांतरुणावर पडलों.

मजसमोरील उघड्या दरवाज्यांतून वनाच्छादित अरवली पर्वताच्या उर्ध्वदेशीं प्रकाशमान कोट्यवधि योजनें दूर असणारा, एक तारा खाटेवर पडलेल्या मजसारख्या करवसुली कलेक्टरकडे निरखून पहात होता. मलाही विस्मयानें व कौतुकानें त्याजकडे पहातां पहातां केव्हां झोप लागली तें सांगतां येत नाहीं. किती वेळ झोंप लागली हेंही सांगवत नाहीं. एकाएकीं माझे आंगावर रोमांच उभे राहिले व मी दचकून जागा झालों. घरांत कांहीं आवाज झाला म्हणावें तर कांहीं ऐकूं येईना, कोणी घरांत शिरलें म्हणावें तर कोणही दिसेना. तिमिरावृत पर्वताचे वर अनिमेष चमकणारा तारा अस्तास गेला होता. केवळ कृष्ण पक्षां-

तील क्षीण ज्योत्स्ना जणूं काय आपल्या अनधिकृत आगमनाबद्दल लज्जित होऊन म्लानवदन होत्साती वातायनमार्गानें अवतरलेली माझ्या दृष्टीस पडली.

कोणी दृष्टीस पडलें नाहीं, तरी पण कोणी तरी मला हळुहळूं ढकलीत आहे असा स्पष्ट भास झाला. मी जागा होतांच तिनें मला आपल्या मुद्रा-विभूषित अंगुलींनीं मोठ्या सावधपणानें आपल्या मागोमाग येण्यास खुणावलें.

अगदीं शब्द होऊं न देतां मी उठलों. यद्यपि त्या प्रचंड, शून्य, असंख्य-विभागमय प्रासादामध्यें मदितर कोणीहि प्राणी नव्हता तथापि कोणी जागें होईल कीं काय असें पावलोंपावलीं भय वाटत होतें. वाड्यांतील पुष्कळसे विभाग बंदच असत व मी त्यांत कधीं पाऊलही टाकिलें नव्हतें.

त्या रात्रीं निःशब्दपदक्षेप व श्वाससंयम करून त्या अदृश्य मार्गदर्शि-केच्या मागोमाग मी कोणत्या ठिकाणीं गेलों तें आज मला स्पष्ट सांगता येणार नाहीं. कित्येक संकुचित व अप्रकाशित मार्गांनीं, कित्येक दीर्घ गृहपथां-तून, अनेक गंभीर, निर्जन सभागृहांतून, अन्योन्यनिरुद्ध तळघरांमधून मी गेलों त्याचा ठिकाणा नाहीं.

आमच्या अदृश्य दूतीला मी आपल्या डोळ्यांनीं पाहिलें नाहीं तरी, तिची मूर्ति माझ्या मनाला अगोचर नव्हती. पोकळ बाह्यांमधून त्या आरब रम-णीचे संगमरवरी दगडाप्रमाणें श्वेत, कठीण व गोल हात नजरेस पडत होते. टोपीच्या प्रांतभागापासून तोंडावर एक सूक्ष्म वस्त्राचें अवगुंठन असून कटि-बंधाला लटकाविलेली एक कट्यार होती. आरबी गोष्टींतील सहस्ररात्रींतील एक रात्र आज येथें उडून तर आली नसेलना ? जणूं काय अंधेऱ्या मध्यरात्रीं निद्रावश बगदाद शहरांतील निर्वापितदीप संकीर्ण पदपथांतून संकटमय संकेतस्थाना-कडेच मी चाललों आहें !

शेवटीं आमची दूती एका घननील जवनिकेसन्मुख येऊन थबकली व जमिनीकडे बोट दाखवून इशारा करूं लागली. खालीं कांहींही नव्हतें तरी भयानें माझें हृदय स्थगित होऊन गेलें. पहातों तों, त्या पडद्यासमोर किन-खापी पोषाख घातलेला एक हबशी खोजा मांडीवर नग्न तलवार ठेवून दोन्ही

पाय पसरून डुकल्या घेत असलेला माझ्या नजरेस पडला. दूतीनें द्रुतगतीनें पायांवरून उडी मारून पडद्याचें एक टोंक उचलून धरिलें.

फार्सी गालिच्छानें आच्छादित असा आंतील थोडासा भाग माझ्या नजरेस पडला. तक्तावर कोण बसलें आहे हें स्पष्ट दिसत नव्हतें. केवळ केशरी रंगाच्या ढिल्या पायजम्याचे खालीं भरजरी सपात्या घातलेले दोन सुंदर चरण गुलाबी मखमलीच्या आसनावर अलसलुलित भावानें ठेविलेले दृष्टीस पडत होते. मेजाच्या एका बाजूला नीलवर्ण स्फटिकपात्रामध्यें कांहीं आपेल, नाशपाती, नारंगी व प्रचुर द्राक्षघोस नीट जुळवून ठेविले होते. त्याच्या मागें दोन लहानसे प्याले व एक पीतवर्ण मदिरापात्र अतिथीजनाची अपेक्षा करीत होतें. घरांतून कांहीं अपूर्व धूपाचा मादक सुगंध येत होता त्यानें मी अगदीं विव्हल होऊन गेलों.

मी कांपत कांपत त्या खोजाचे पाय ओलांडून जाऊं लागलों इतक्यांत तो दचकून जागा झाला व त्याच्या मांडीवरील तलवार दगडावर पडून आवाज झाला.

एकाएकीं एक भयंकर किंचाळीचा आवाज ऐकून मी दचकून जागा झालों. पहातों तों, मी आपल्या प्रवासी खाटेवर बसलेलों व सर्व शरीर घामानें थबथबलेलें ! अरुणप्रकाशामुळें कृष्णपक्षांतील चंद्रकोर प्रजागराक्लिष्ट रोग्याप्रमाणें पांडुरवर्ण दिसत होती. आमचा वेडा मेहेरअली आपल्या प्रात्याहिक प्रथेनुसार प्रभातसमयीं जनशून्य मार्गानें "हटजाओ हटजाओ" करीत चालला होता.

अशा प्रकारें माझी आरब उपन्यासांतील एक रात्र अकस्मात् व्यतीत झाली. पण एकोनसहस्र अजून बाकी राहिल्या होत्या.

माझ्या दिनचर्येंत व रात्रींत एक प्रकारें कलह उत्पन्न झाला. दिवसा श्रांत, क्लांत शरीरानें काम करीत असतां स्वप्नमय, मोहमय, मायाविनी, रात्र फार भीषण वाटे ! संध्यासमयानंतर कार्यव्यग्रतेमुळें दिवसाचा काळ अत्यंत तुच्छ, मिथ्या व हास्यास्पद वाटूं लागे. दिनावसानानंतर मोहजलामध्यें सांपडून मी अगदीं विव्हल होऊन जाईं. शेंकडों वर्षांपूर्वींच्या एखाद्या अलिखित इतिहासांतील एक अपूर्व व्यक्ति मी बनून जाईं, माझा संकुचित व आंग्लदेशीय कोट व पाटलोण मला रुचतनाशीं होत, डोक्यावर एक लाल मखमली टोपी, पायांत

सैल विजार, फूलदार काबा, रेशमी लांब चोगा, रंगीत अत्तर फांसलेला रुमाल असा पोषाख करून तोंडांतील धूम्रशलाका टाकून देऊन गुलाबपाण्यानें भरलेला लांबलचक नळीचा हुक्का घेऊन उंचशा गादीवर एका तक्तावर बसलों आहें असा भास होई; जणूं काय प्रियजनाची मोठ्या उत्कंठेनें मार्गप्रतीक्षा करीत आहें.

तदनंतर अंधःकार जसजसा वाढत गेला तसतसी जी एक अद्भुत घटना घडून आली तिचें वर्णन करणें अशक्य आहे; जणूं काय एकाद्या चमत्कारजनक कथानकाच्या खंडापैकीं कांहीं अंश वसंतऋतूंतील आकस्मिक वायुप्रवाहानें वहात येऊन ह्या प्रचंड प्रासादांतील विभागांमधून उडत आहेत. कांहीं कालपर्यंत ते दृष्टिगोचर असत पण पुढें दिसेनासे होत. मीही त्या घूर्णमानखंडाच्या मागें हिंडतां हिंडतां समस्त रात्र त्या वाड्याच्या भागाभागांतून फिरत राहिलों.

ह्या खंडस्वप्नरूपी आवर्तामध्यें क्वचित् हिन्याचा सुगंध पसरला आहे, क्वचित् सतारीचा नाद ऐकूं येत आहे, क्वचित् सुरभिजल शीकराकीर्ण वायु इतस्ततः वहात आहे अशा वेळीं विद्युल्लेखेप्रमाणें क्षणमात्र दृष्टीस पडणाऱ्या नायिकेचें दर्शन अनेकदां मला झालें. तिचा केशरी पायजमा, तिच्या गौरवर्ण आरक्त कोमल पायांत वेलबुटीदार नामितशीर्ष पादत्राण, वक्षस्थळीं अतिपिनद्ध भरजरी नक्षीची काचोळी, बद्धकेशशिरोभागीं रक्तवर्ण सोनेरी झालर लाविलेली टोपी, तिचें शुभ्र कपाल व गंडतल यांना फारच सुशोभित करीत होती.

मला तिनें अगदीं वेड लावून टाकिलें. तिचा अभिलाष धरून निद्रेच्या पातालरूपी राज्यांत स्वप्नसृष्टींतील मायापुरीच्या दुर्गम मार्गांनीं गल्लीगल्लींतून घरनाघर तिच्या मागोमाग मी हिंडलों.

कधीं कधीं संध्याकाळचे वेळीं दोन्ही बाजूंस दिवे जळत ठेवून आरशासमोर मोठ्या उत्कंठेनें एखाद्या शहाजाद्याप्रमाणें पोषाख करीत असतां एकाएकीं माझ्या पार्श्वभागीं त्या इराणी तरुणीची मूर्ती आरशांत प्रतिबिंबित झालेली क्षणभर माझ्या दृष्टीस पडे. झटकन् मान फिरवून आपल्या काळ्याभोर विशाल नयनांनीं

औत्सुक्यपूर्ण, सस्नेह, उद्वेगमय कटाक्षपात करून आपल्या सरस सुंदर बिंबाधरानें अव्यक्त आलापाचा भास उत्पन्न करून आपल्या तनु, ललित चंचलयौवन-कुसुमित देहलतेचा ऊर्ध्वभाग द्रुतगतीनें आवृत करून एका क्षणांत वेदना, वासना, विभ्रम हास्य, नेत्रकटाक्ष, आभरणशोभा इत्यादिकांच्या ठिणग्यांची वृष्टी करून निमिषार्धांत दर्पणांतच ती अदृश्य झाली. गिरिकाननांतील समस्त सुगंध लुटून आणिलेल्या वायूची झुळूक येऊन आमचे दोन्ही दिवे मालवून टाकले—मी पोषाखधारणविधी सोडून वेशगृहासंन्निध असलेल्या शय्येवर पुलकितदेहीं निमीलितनेत्र पडून राहीं. चोहोंकडे त्याच वातावरणामध्यें अरवली-गिरिकुंजांतील मिश्रगंध जिकडे तिकडे पसरला असतांना चुंबनादि अनेक शृंगारचेष्टा, कोमलकरस्पर्श यांनीं तो अंधकार जणूं काय उद्भासित झालेला भासे. अनेक कलध्वनी कानीं पडत, कपालपटावर मधुर उच्छ्‌वासगंधक्षेपाचा अनुभव होई, व कपोलभागीं सुवासिक मृदु वसनांचलाचा वारंवार स्पर्श झाल्यानें कोणी ललना वीजनचेष्टा करीत आहेसा भास होई. हळुहळूं एक मोहिनी नागीण आपल्याला मजभोंवतीं गुंडाळून घेऊन माझें शरीर जखडून टाकी व मी दीर्घ निश्वास सोडून आपलें श्रांत शरीर पलंगावर ठेवून निद्रावश होऊन जाई.

एके दिवशीं अपरान्हकाळीं घोड्यावर बसून फेरफटका करून यावें म्हणून संकल्प केला—न जाण्याविषयीं कोण आग्रह करीत होतें तें सांगतां येत नाहीं—पण ते दिवशीं मी कोणाचें ऐकिलें नाहीं. एका काष्ठयष्टीवर आमची साहेबी टोपी, आनितंबलंबी कोट लोंबत होता; ती काढण्याचा उपक्रम आमचा नोकर करूं लागला, इतक्यांत सुस्ता नदीची वाळू व अरवली पर्वतावरील शुष्कपर्णमय घूर्णावात जोरानें येऊन, आमचा कोट व टोपी चक्रगतीनें फिरवीत फिरवीत घेऊन चालला. त्या वायुप्रवाहाबरोबरच मधुर कलहास्यध्वनी हृत्तंत्रीच्या प्रत्येक पडद्यावर आघात करून उंच होत होत अस्ताचलावर जाऊन अश्राव्य झाला.

ते दिवशीं घोड्यावर बसणें झालें नाहीं. दुसऱ्या दिवसापासून तो कोट व टोपी घालण्याचें कायमचें सोडून दिलें.

पुन्हां त्याच दिवशीं मध्यान्हरात्रीं बिछान्यावर उठून बसलों; तों कोणी स्फुंदस्फुंदून रडत आहे असें ऐकूं आलें. जणूं काय माझ्या खाटेखालीं, पृष्ठ-भागाच्या खालीं, त्या भव्य इमारतीच्या पायाच्याहि खालून एखाद्या अंधेऱ्या सांद्र कबरीमधून कोणी रडतरडत बोलत होतें. "तुम्ही मला येथून घेऊन जा. निष्ठुर माया, घोर निद्रा, निष्फल स्वप्न ह्यांचें आवरण छिन्न करून आपल्या हृदयस्थलीं मला ठेऊन अश्वारूढ होऊन, अरण्यांतून, पर्वतांतून, नदी उतरून आपल्या सूर्यप्रकाशित घरीं मला घेऊन जा, व माझा उद्धार करा."

मी कोण? मी कसा उद्धार करूं? ह्या परिवर्तमान स्वप्नप्रवाहांतून वांचवून तीरावर नेण्यास सांगणारी तूं मज्जमान कामना सुंदरी कोण? हे दिव्य-रूपिणी, तूं कोठील व कधीं होतीस? तूं कोणत्या गृहहीन मरुवासिनीच्या पोटीं, खर्जुरीद्रुमकुंजाचे ठायीं, कोणत्या शीतल प्रवाहाचे तीरीं जन्मग्रहण केलेंस? तुला कोणता बेडयूइन् चोर, वनलतेपासून नवकलिकेला तोडून न्यावें त्याप्रमाणें, मातृ-उत्संगापासून वियुक्त करून विद्युद्गति अश्वावर बसवून तप्त वालुकारण्याच्या पार नेऊन कोणत्या राजधानींतील दासीविक्रयस्थलीं घेऊन गेला? तुझी नवविकसित, सलज्ज, कातर यौवनशोभा पाहून, स्वर्णमुद्रा देऊन तुला समुद्रापार नेऊन सोन्याच्या शिबिकेंत बसवून, कोणत्या बादशहाच्या भृत्यानें आपल्या प्रभूच्या अंतःपुराकरितां उपहार म्हणून अर्पण केलें असावें बरें? तेथील इतिहास काय वर्णावा! सारंगीचा मधुर ध्वनी, नूपुरांचें क्वणित, शिराजची सुवर्ण मदिरा, तलवारींचें झळकणें, विषमय नेत्रकटाक्ष! अहाहा! तें असीम ऐश्वर्य, तो चिरंतन कारावास; तुझ्या दोन्ही बाजूंस रत्नवलयमंडित विद्युत् चपलहस्तांनीं दोन दासी चामर वारीत असतील. राजाधिराज सार्वभौम नृपति तुझ्या मणिमुक्ताखचित—पादुकामृत शुभ्र पादपद्मांवर लोळत असेल! बाहेरच्या दारावर देवदूताप्रमाणें पोषाख केलेला हबशी यमदूत नग्न तलवार हातांत धरून पहारा करीत असेल. तदनंतर हे मरुलतामंजरि! रक्तकलुषित मदमत्सरग्राहाकुल ईर्षाफेनिल, भीषणोज्ज्वल, ऐश्वर्याब्धीच्या वीचींनीं तुला

मृत्युमुखांत लोटिलें असावें. अथवा त्याहून निष्ठुर अशा एखाद्या ऐश्वर्यभूमी-वर टाकून दिलें असावें !

इतक्यांत तो वेडा मेहेरअली ओरडूं लागला, "दूर व्हा, हटा, सर्व माया आहे, सर्व असत्य आहे." डोळे उघडून पाहिलें तों सकाळ झालेली ! चपराशानें येऊन डांकेनें आलेले कागदपत्र दिले. आचाऱ्यानें येऊन विचारिलें, "आज काय करावयाचें ?"

मी म्हटलें ! "छे, आज या घरांत राहावयाचें नाहीं." त्याच दिवशीं सामानसुमान घेऊन ऑफिसांत गेलों. ऑफिसांतील वृद्ध नोकर करीमखान, मला पाहून किंचित् हांसला. त्याला हसतांना पाहून मी थोडा विरमलों, पण कांहीं न बोलतां कामास प्रवृत्त झालों.

जसजसा संध्याकाळचा समय नजीक येऊं लागला, तसतसें माझें मन अस्थिर होऊं लागलें. आपल्याला कोठेंतरी जायचें आहे असें मनांत येऊं लागलें. हिशेब तपासण्याचें काम अनावश्य कसें भासूं लागलें, निजामाचें राज्यसुद्धां तुच्छ वाटूं लागलें, सर्व वर्तमान वस्तू, माझ्या सभोंवतालीं जें कांहीं दृष्टीस पडत होतें, ऐकूं येत होतें, चाललें होतें, तें सर्व अत्यंत दीन, निरर्थक, निरुपयोगी असें भासूं लागलें.

मी आपली लेखणी खालीं ठेविली, वही बंद केली, व तत्क्षणीं टांग्यांत बसून चालूं लागलों. पाहातों तों टांगा बरोबर गोरज मुहूर्तावर त्या पाषाण-प्रासादाच्या द्वारापाशीं येऊन आपोआप थांबला. घाईघाईनें पायऱ्या चढून मी घरांत प्रवेश केला.

आज जिकडे तिकडे स्तब्धता व अंधःकार पसरला होता, जणूं काय घरांतील विभाग रागानें विवर्णवदन झाले आहेत.

माझ्या मनाला पश्चात्ताप झाला व हृदय उद्विग्न झालें. पण कोणापाशीं मी सांगणार ? कोणाची क्षमा मागणार ? मला कोणीहि दिसेना.

मी शून्य मनानें त्या अंधकारांत खोलीन् खोली हिंडून पाहिली. कोणाला तरी उद्देशून गावें असें वाटूं लागलें. म्हटलें "हे अग्नि, ज्या पतंगानें तुजपासून दूर पळून जाण्याची इच्छा केली, तो अधुना मरणेच्छा धरून आला आहे. त्याला क्षमा कर, त्याचे दोन्ही पक्ष दग्ध कर; त्याला भस्म कर !"

एकाएकीं वरून माझ्या गालावर दोन अश्रुबिंदू पडले. ते दिवशीं अरवली पर्वताच्या शिखरावर पुष्कळसे मेघ जमले होते. अरण्यांतील अंधःकार व सुस्तेचें कज्जल जल भयभीत होऊन संकटाची जणूं काय वाट पहात आहे. जलस्थल, आकाश एकाएकीं कंपायमान झालें; अकस्मात् सुदूरस्थित, पथहीन महारण्यांतून झंझावात सों सों करीत विद्युत्-दंत विकासित करून एखाद्या उन्मत्त राक्षसाप्रमाणें शृंखला तोडून सैरावैरा धांवत आहेसें वाटलें. प्रासादांतील मोठमोठे दिवाणखान्याचे दरवाजे धाडधाड आपटूं लागले. जणूं काय मोठ्या आवेगानें रडतरडत छाती फोडून घेत आहेत.

सर्व नोकर आज ऑफिसांत होते. दिवा लावण्यासहि कोणी नव्हतें. ती अमावास्येची रात्र, ढगांनीं आकाश दाटलेलें, जिकडेतिकडे निबिड अंधःकार पसरलेला, अशा समयीं एक रमणी पलंगाखालीं गालिछावर उपडी पडलेली, दोन्हीं हातांनीं आपले मोकळे केस उपटीत आहे, तिच्या गौरवर्ण कपाळांतून रक्त वहात आहे, मधूनमधून ती मोठमोठयानें हांसल्यासारख्या किंचाळ्या फोडीत आहे, केव्हां केव्हां मोठ्या आक्रोशानें रडत आहे. दोन्हीं हातांनीं आपल्या निचोलहीन अनावृत वक्षस्थलावर आघात करीत आहे, उघडया खिडक्यांतून वारा घों घों करीत वहात असतां, वृष्टी मुसळधार चालू असून तिचें सर्व आंग भिजून गेलें आहे असा मला स्पष्ट भास झाला.

रात्रभर पाऊस लागून राहिला होता, रुदनहि थांबलें नव्हतें, मी विव्हल होऊन त्या अंधारांत खोलीन् खोली हिंडून पाहिली, पण व्यर्थ. कोठेंहि कोणी दिसेना. सांत्वना तरी कोणाची करणार? हा घोर दुःखावेग कोणाचा? हा प्रचंड अभिमान कशाकरितां? हें अशम दुःखाविष्करण कोठून?

त्या वेड्याचा चीत्कार कानीं पडला. " हटा, दूर व्हा, सर्व अनृत, सर्व असत्य. " डोळे उघडून पाहिलें, पहाट झालेली व मेहेरअली ह्या अशा घोर दुर्दिनांधःकारांत नित्यनियमाप्रमाणें प्रासादप्रदक्षिणा करितांना आपला अभ्यस्त चीत्काररव करीत आहे. एकाएकीं मनांत आलें कीं, हा मेहेरअलीहि मज-प्रमाणें कधीं तरी ह्या प्रासादांत राहात असावा व आतां वेड लागलें असून येथें रहात नसला तरी ह्या पाषाणराक्षसानें आकृष्ट होऊन प्रत्यहीं प्रत्यूषे प्रदक्षिणा करीत असावा.

मी तत्क्षणीं त्या वृष्टीस न जुमानतां त्या वेड्याच्या जवळ धांवत गेलों व विचारिलें " अरे मेहेरअली, काय असत्य रे ? " तो कांहींच उत्तर न देतां, मला ढकलून देऊन अजगराच्या मुखाभोंवतीं घूर्ण्यमान मोहाविष्ट पक्ष्याप्रमाणें चीत्कार करीत करीत वाड्याभोंवतीं प्रदक्षिणा घालूं लागला. जणूं काय आप-ल्याला सावध करण्याकरितां वारंवार मोठमोठ्यानें " हटा, दूर व्हा, सर्व असत्य, सर्व अनृत, " म्हणून म्हणत फिरूं लागला.

मी तसाच पाऊस पडत असतां वेड्यासारखा ऑफिसांत जाऊन करीमखानाला बोलावून आणून, " याचा अर्थ काय तें मला स्पष्ट सांग, " म्हणून म्हटलें.

त्या वृद्ध नोकरानें जें सांगितलें त्याचा सारांश येणेंप्रमाणें:-- एके समयीं या प्रासादांत अनेक आतृप्तवासना, उन्मत्तसंभोगज्वाला उठत असत. तो चित्तदाह, त्या निष्फलकामनांच्या अभिशापानें ह्या इमारतीचा दगडान्‌दगड क्षुधित व तृषित झालेला आहे. सजीव मनुष्य प्राप्त होतांच लालूंच लागलेल्या पिशाच्चाप्रमाणें त्याला भक्षण करूं पहातो. ज्या कोणीं त्रिरात्र ह्या वाड्यांत वास केला त्यांपैकीं केवळ मेहेरअली बाहेर पडला आहे पण तोहि वेड लागलेला. आजपर्यंत ह्याच्या तडाक्यांतून कोणी वांचलेला नाहीं. मी विचारिलें, " माझ्या उद्धाराचा कांहींच मार्ग नाहीं कां ? " तो वृद्ध म्हणाला, " एकच मार्ग आहे, पण तो फार कठीण आहे. मी आपल्याला तो सांगतों. पण आधीं ह्या गुलबागेंत एक पारशीक तरुण क्रीतदासी रहात असे. तिचा इतिहास प्रथम ऐकिला

पाहिजे. इतकी आश्चर्यकारक व हृदयद्रावक घटना आजपर्यंत पृथ्वीवर कोठेंहि घडली नसेल. "

इतक्यांत हमालांनीं येऊन सूचना दिली कीं, गाडी आली. " इतक्या लवकर? " घाईघाईनें बिछाना बांधितों तों गाडी येऊन थडकली. त्या गाडीच्या पहिल्या वर्गांतील डब्यांतून एक सुतोत्थित इंग्रज खिडकींतून तोंड बाहेर काढून स्टेशनाचें नांव वाचीत होता. आमच्या सहयात्री बंधूंना पहातांच ' हॅलो ' असें ओरडून म्हणाला व आपल्या डब्यांत यांना घेतलें. आम्ही दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत शिरलों. ही स्वारी कोण व ह्यांच्या गोष्टीचा अंत कसा झाला हेंहि समजण्यास मार्ग नव्हता.

मी म्हटलें, " त्या धूर्तानें आम्हांला मूर्ख समजून आमची गम्मत करून पाहिली. गोष्ट अथपासून इतिपर्यंत बनावट ! " ह्या माझ्या अनुमानावर वाद होऊन आमच्या थिऑसफिस्ट बांधवाचें माझ्याशीं आमरण वांकडें आलें.



# मेघ व सूर्य



आदले दिवशीं पाऊस पडून गेला होता. आज क्षांतवर्षण प्रातःकाळीं म्लान सूर्य व मेघखंड मिळून परिपक्वप्राय आउश धान्याच्या शेतांवर पर्याय-क्रमानें जणूं काय चित्रकाराप्रमाणें रंग देत होते.

विसृत श्याम चित्रपट एक वेळ आलोकस्पर्शानें उज्ज्वल पांडुवर्ण धारण करी, तर पुन्हां दुसऱ्या क्षणीं गाढ स्निग्धतेनें रंजित होई.

ज्या समयीं आकाशरूपी रंगभूमीवर मेघ व सूर्य हीं दोनच पात्रें आपापल्या परी अभिनय करीत होतीं त्या समयीं अधःस्थलीं संसाररूपी रंगभूमीवर किती ठिकाणीं, किती अभिनय चालला होता त्याची गणतीच नाहीं.

आम्ही ज्या ठिकाणीं एका क्षुद्र जीवन-नाटकाचा पडदा उचलिला त्या ठिकाणीं एका गांवीं रस्त्यावर एक घर दिसत होतें. बाहेर रस्त्याच्या तोंडाशीं थोडासा भाग काय तो पक्का बांधिलेला व त्याच्या दोन्ही बाजूंला जीर्ण विटांच्या भिंतींनीं बांधिलेल्या कांहीं खोल्या होत्या. रस्त्यांमधून गजांच्या खिडकींतून एक तरुण मुलगा उघड्या आंगानें खाटेवर बसून डाव्या हातानें ताडाचा पंखा घेऊन वारा घेत घेत माशा हाकीत व उजव्या हातांत पुस्तक घेऊन वाचीत बसलेला होता.

बाहेर रस्त्यांत एक रेघारेघाची साडी नेसलेली बालिका ओट्यांत कांहीं काळीं काळीं जांभळें घेऊन एकेक खातखात वर निर्दिष्ट केलेल्या गजांच्या खिडकी-समोर घिरट्या घालीत होती. तोंडावरून स्पष्ट दिसत होतें कीं, आंतल्या बाजूला जो मुलगा खाटेवर बसून पुस्तक वाचीत होता, त्याच्याशीं बालिकेची दाट ओळख असली पाहिजे. कोणत्या तरी युक्तीनें तिच्या मनांत त्याचें लक्ष आपल्याकडे ओढून त्याला भासवावें कीं, आपण कशीं छानछान जांभळें खाण्यांत गर्क आहों व तुझ्याकडे मुळींच लक्ष देखील नाहीं.

दुर्दैवानें खोलींत बसलेल्या अध्ययनरत तरुणाला डोळ्यांनीं कमी दिसत होतें. इतक्या दुरून त्या बालिकेची नीरव उपेक्षा त्याला समजण्याजोगी नव्हती. त्या बालिकेला हें ठाऊक होतें, तथापि बराच वेळ मागेंपुढें करून निःशब्द उपेक्षेच्या ऐवजीं तिनें जांभळांच्या बियांचा उपयोग करण्यास सुरुवात केली. त्या मंददृष्टी युवकापासून आपल्या अभिमानाच्या विशुद्धतेचें रक्षण करणें इतकें दुःसह !

जेव्हां दोन चार बिया सुदैवानें नेम चुकून दरवाजाला लागून 'टक्' करून आवाज झाला तेव्हां त्या पाठरत युवकानें मान वर करून पाहिलें. त्या कपटी मुलीला तें समजतांच तिनें दुप्पट लक्षपूर्वक ओटयांतून काळीं जांभळें काढून त्यांतून चांगलीं चांगलीं निवडण्याचें ढोंग केलें. मुलानें भ्रुकुटी आकुंचित करून निरखून पाहिलें, तेव्हां बालिकेला ओळखलें. पुस्तक खालीं ठेवून उठून खिडकीपाशीं जाऊन हास्यमुखानें हाक मारिली—" गिरिबाला—"

गिरिबाला अविचलित मनानें आपल्या ओटयांतल्या जांभळांची पारख करण्याच्या कामांत पूर्ण व्यग्र आहेसें दाखवून हळुहळू एकेक पाऊल टाकीत पुढें चालली.

क्षीणदृष्टी युवकाला समजण्याचें बाकी राहिलें नाहीं कीं, कांहींतरी अज्ञात अपराधाची ही शिक्षा दिली जात आहे. लागलाच बाहेर येऊन म्हणाला—" काग, आज आम्हांला जांभळें दिलीं नाहींस ? "

गिरिबालानें तें ऐकिलें न ऐकिलेंसें करून खूप धुंडाळून पारखून एक जांभूळ पसंत करून अत्यंत निश्चिंत मनानें तें खाण्यास आरंभ केला.

हीं जांभळें गिरिबालेच्या बागेंतील, त्या युवकाचा दैनिक उपहार. कोणी सांगावें कीं, ही गोष्ट ती विसरून गेली कीं, सर्व जांभळें आज तिनें आपल्या करितांच तोडून आणिलीं होतीं ? पण आपल्या बागेंतलीं फळें पाडून आणून दुसऱ्याच्या दरवाज्यापाशीं येऊन दुसऱ्याच्या नजरेस पडतील अशा रीतीनें खाण्याचा काय अर्थ तेंहि नीटपणें समजण्यासारिखें नाहीं. तेव्हां मुलगा जवळ येऊन त्यानें हात धरिला. गिरिबालानें प्रथम आंग वांकडेंतिकडें करून हात सोडवून निघून जाण्याचा प्रयत्न केला, तदनंतर डोळ्यांत पाणी आणून रडूं लागली व पदरांतील जांभळें जमिनीवर टाकून निघून गेली.

सकाळच्या चंचल मेघ व चंचल सूर्यानें संध्याकाळीं शांत व श्रांत भाव धारण केला होता; शुभ्रस्फीत मेघ आकाशाच्या प्रांतभागीं स्तूपाकार होऊन पडला होता. अपराण्हकालचा अवसन्नप्राय उजेड, झाडांचीं पानें, डबक्यांतील वर्षाऋतूंतील सृष्टीच्या अंगप्रत्यंगावर झगझग् करीत होता. पुन्हां तीच बालिका त्याच खिडकीसमोर व तो तरुण मुलगा खोलींत बसलेला. फरक इतकाच कीं, या वेळीं बालिकेच्या पदरांत जांभळें नाहींत व युवकाच्या हातांत पुस्तक नाहीं. ह्यापेक्षांहि अधिक गूढ प्रभेद थोडासा होता.

ह्या वेळींहि ती बालिका त्या विशिष्ट स्थानीं येऊन कोणत्या विशेष निमित्तानें इतस्ततः करीत होती हें सांगणें कठीण. आणखी विशेष कारण काय असेल तें असो, खोलींत बसलेल्या युवकाशीं कांहीं बोलायचें आहे असेंहि बालिकेच्या व्यवहारावरून यत्किंचित् अनुमान निघण्यासारिखें नव्हतें. बहुधा, सकाळीं जीं जांभळें टाकून ती निघून गेली त्यांना कांहीं अंकुर फुटला आहे कीं नाहीं हें बघण्याच्या हेतूनें ती आली असावीसें दिसतें.

परंतु, अंकुर बाहेर फुटण्याचीं जीं अनेक कारणें असतील त्यांत एक प्रमुख कारण हें होतें कीं, तीं फळें सांप्रत त्या तरुण मुलाच्या सन्मुख खाटेवर राशीभूत होऊन पडलीं होतीं; याप्रमाणें बालिका ज्या वेळीं वांकून कांहीं एक अनिर्देश्य काल्पनिक पदार्थ शोधण्यांत गुंतली होती, त्या वेळीं तो युवक मनांतल्या मनांत हंसत मोठ्या गंभीरपणानें एकेक जांभूळ निवडून निवडून खात होता. शेवटीं जेव्हां एखाद दुसरी बी पायावर येऊन पडली तेव्हां गिरिबालाला समजलें कीं, आपल्या अभिमानाचा तो प्रतिकार करीत आहे. पण हें कां योग्य? ज्या वेळीं आपल्या क्षुद्र हृदयांतील समस्त गर्व–विसर्जन करून ती आत्मसमर्पण करण्याचा अवसर पहात आहे, अशा समयीं तिच्या त्या अत्यंत दुर्धर मार्गीं बाधा देणें निष्ठुरता नव्हे कां? आपलें देणें द्यायला आली आहे ही गोष्ट पकडली जातांच बालिका किंचित् लाल होऊन पलायन् करण्याच्या बेतांत होती; इतक्यांत त्या तरुण मुलानें येऊन तिचा हात धरिला.

सकाळच्या प्रमाणेंच ह्या वेळींहि आंग वांकडेंतिकडें करून हात सोडवून पळून जाण्याची त्या बालिकेनें पुष्कळ खटपट केली पण रडली नाहीं. उलट लाल होऊन मान खालीं घालून त्या पीडा देणाऱ्या मुलाच्या पृष्ठभागीं डोकें टेकून मोठमोठ्यानें हांसूं लागली व जणूं काय पराभूत बंदिवानाप्रमाणें गज मारिलेल्या कारागृहांत तिनें प्रवेश केला.

आकाशांत मेघ व सूर्य यांची लीला जशी सामान्य तशीच भूतलींहि त्या दोघांची क्रीडाहि सामान्य व तशीच क्षणिक. पुनश्च आकाशांत मेघ व सूर्य यांची क्रीडा जशी एका अर्थीं सामान्य नव्हे व खेळहि नव्हे, क्रीडेप्रमाणें भासमानमात्र, तद्वत् ह्या उपरिनिर्दिष्ट दोन जीवांचा कर्महीन वर्षाऋतूंतील क्षुद्र इतिहास संसारांतील शेंकडों घटनांच्या मानानें तुच्छसा वाटण्यासारखा आहे; पण तो तसा तिरस्करणीय नाहीं. जी चिरंतन अदृष्ट अविचलित गंभीर विराट्शक्ती युगयुगांतरांना ग्रथित करीत आहे, तीच पुरातन शक्ति त्या बालिकेच्या सकाळसंध्याकाळच्या हास्यरुदनांमध्यें जीवनव्यापी सुखदुःखाचें बीज अंकुरित करीत होती. तथापि बालिकेचा हा अकारण अभिमान केवळ प्रेक्षकांच्या दृष्टीनें नव्हे तर, ह्या क्षुद्र नाटकांतील प्रधान पात्र जो उक्त युवक त्याच्या दृष्टीनेंहि अर्थहीन असा दिसत होता. ही बालिका एखादे दिवशीं रागावे तर, एखादे दिवशीं अत्यंत स्नेहप्रकाश करी, कधीं नित्योपहार आणून देई, तर कधीं मुळींच देत नसे. याचें कारण शोधून काढणें सोपें नाहीं. एखादे दिवशीं जणूं काय ती आपली समस्त कल्पना, भावना, नैपुण्य एकत्रित करून त्या युवकाला संतोष देण्याकरितां प्रवृत्त होई, पुन्हां एखादे दिवशीं आपलें समस्त क्षुद्र सामर्थ्य, समस्त काठिण्य संहत करून त्याला आघात करण्यास प्रवृत्त होई. त्याचा परिणाम झाला नाहीं तर तिचा कठोरपणा द्विगुणित होई. कृतकृत्य झाल्यास तें काठिण्य अनुतापाच्या अश्रुजलानें शतधा विगलित होऊन अजस्र स्नेहधारांनीं प्रवाहित होई.

ह्या तुच्छ मेघ–सूर्यक्रीडेचा पूर्वइतिहास द्वितीय परिच्छेदामध्यें संक्षिप्त रूपानें विवृत करणार आहोंत.

## द्वितीय परिच्छेद

गांवांत अन्य उद्योगधंदा म्हटला म्हणजे, उसाचें गुऱ्हाळ, पक्ष, कट, चर्चा, खोटे खटले, सनदांचा विचार, स्वभाव–आलोकन, साहित्यचर्चा करणारीं केवळ शशिभूषण आणि गिरिबाला.

ह्यांच्यामध्यें कोणताहि औत्सुक्य किंवा उत्कंठेचा विषय नाहीं, कारण गिरिबालाचें वय दहा वर्षांचें व शशिभूषण सद्यविकसित एम्. ए., बी. एल्. दोघे शेजारी येवढेंच कायतें !

गिरिबालाचे वडील हरकुमार एके काळीं आपल्या गांवचे पट्टणीदार होते. सांप्रत दुस्थितींत पडल्यामुळें सर्व विकून टाकून त्यांच्या बाहेरच्या जमीदारीची नायबी त्यांनीं पतकरली होती. ज्या परगण्यांत ते रहात, त्या परगण्याची नायेबी तें जन्मस्थानच असल्यामुळें विशेषशी पहावी लागत नसे.

शशिभूषण एम्. ए. पास झाल्यावर कायद्याच्या परिक्षेंत उत्तीर्ण झाले. पण कोणत्याच कामाला त्यांनीं सुरुवात केली नव्हती. लोकांत मिसळणें किंवा सभेंत दोन शब्द बोलणें हेंहि त्यांच्यानें होईना. डोळ्यांनीं कमी दिसे, म्हणून परिचित लोकांनाहि ओळखतां येत नसे, त्यामुळें भृकुटि आकुंचित करून पहावें लागे; त्यामुळें लोकांत तें औद्धत्य समजलें जाऊन त्यांच्यावर टीका होत असे.

कलकत्यास जनसमुद्रामध्यें मनानें एकटे राहण्यांत शोभा आहे, पण खेडेगांवांत तेंच गर्विष्ठपणाचें लक्षण समजलें जातें. शशिभूषणचे वडिलांनीं पुष्कळ प्रयत्न करून पाहून हताश झाल्यानंतर शेवटीं आपल्या रिकामटेकड्या मुलाला आपल्या गांवच्या लहानशा एस्टेटीचें रक्षण करण्याकरितां ठेविलें. शशिभूषणला गावच्या लोकांकडून पुष्कळ पीडा, उपहास, लांछना सोसावी लागली.

लांछनेचें आणखी एक कारण होतें. शांतिप्रिय शशिभूषण लग्नाला संमति देईना. उपवर मुलींचे आईबाप ही त्यांची अनिच्छा केवळ दुःसह अहंकार समजून त्याला क्षमा करण्यास तयार नव्हते.

शशिभूषणला जों जों उपद्रव अधिक होऊं लागला तों तों शशिभूषण आपल्या विवरांत दडून बसूं लागला. तो एका कोपऱ्याच्या खोलींत खाटेवर कांहीं इंग्रजी पुस्तकें घेऊन बसून राही. जेव्हां इच्छा होई तेव्हां वाचीत बसे. एस्टेटीचें रक्षण कसें होत होतें तें एस्टेटीलाच ठाऊक !

हें पूर्वींच सांगण्यांत आलें आहे कीं, मनुष्यांमध्यें त्याचा संपर्क म्हणजे केवळ गिरिबालाशीं.

गिरिबालाचे भाऊ शाळेंत जात. परत आल्यावर आपल्या मूढ बहिणीला कधीं विचारीत, " पृथ्वीचा आकार कसा आहे ? " एखादे दिवशीं प्रश्न करीत, " पृथ्वी मोठी कीं सूर्य मोठा ? " ती जेव्हां चुकीचीं उत्तरें देई तेव्हां तिचा उपहास करून तिचा भ्रम घालवीत. सूर्य पृथ्वीहून मोठा हें मत गिरिबालाला प्रमाणाभावीं अग्राह्य वाटे व हा संशय तिनें कधीं साहस करून प्रकट केला तर तिचे भाऊ तिची आणखी उपेक्षा करून म्हणत—" जा ! आमच्या बुकांत लिहिलें आहे आणि तूंच. ..."

छापील पुस्तकांत ही गोष्ट लिहिली आहे, हें ऐकून गिरिबाला अगदीं निरुत्तर होऊन जाई. दुसरें कांहीं प्रमाण आवश्यक आहे असें वाटत नसे.

परंतु मनांतल्या मनांत प्रबळ इच्छा होई कीं आपणहि दादासारखीं पुस्तकें वाचावींत. कधीं कधीं आपणच खोलींत बसून एखादें पुस्तक उघडून बडबड करीत वाचण्याचा आव आणी व उगीचच पानें उलटीत जाई.

काळीं काळीं, छापील, लहान लहान, अपरिचित अक्षरें जणूं काय रहस्य-शाळेच्या महाद्वारीं आपापला जमाव करून खांद्यावर ' इकार ' ' उकार ' ' रेफादि ' शस्त्रें घेऊन पहारा करीत आहेत; गिरिबालेच्या कोणत्याहि प्रश्नाला कोणी उत्तर देत नाहींत. " कथामाला " आपल्या व्याघ्र, शृगाल, अश्व-गर्दभांची एकहि गोष्ट कौतुहलकातर बालिकेला व्यक्त करून दाखवितात. " आख्यामंजरी " आपलीं समस्त आख्यानें घेऊन मौनव्रत धारण केल्या-सारखी निःशब्द तिच्याकडे पहात होती.

गिरिबालानें आपल्या भावांशीं शिकण्याची गोष्ट काढिली होती, पण भावांनीं ती गोष्ट ऐकून सुद्धां घेतली नाहीं. एक शशिभूषण काय तो तिला सहाय्यकारी.

गिरिबालेला " कथामाला " व " आख्यानमंजरी " जितकी दुर्भेद्य व रहस्यपूर्ण होती तितकाच शशिभूषणहि प्रथम प्रथम तिला दुर्भेद्य वाटत होता. लोखंडी गज बसविलेल्या रस्त्यांवरील लहानशा बसायच्या खोलींत तो मुलगा एकटा खाटेवर पुस्तकें भोंवतालीं ठेवून बसून राही. गिरिबाला गजाला धरून बाहेर उभी राहून आश्चर्यानें ह्या नतपृष्ठ, अध्ययनरत अद्भुत युवकाला निरखून पहात असे. पुस्तकांची संख्या पाहून मनांत निश्चय करी कीं, शशिभूषण आपल्या भावांपेक्षां अधिक विद्वान्. ह्याहून विस्मयजनक गोष्ट तिच्या दृष्टीनें काय असणार ? ' कथामाला ' प्रभृति पृथ्वीवरील मुख्यमुख्य पाठ्य-पुस्तकें शशिभूषणनें समग्र वाचून टाकिलीं होतीं ह्याबद्दल तिला मुळींच शंका नव्हती. म्हणूनच शशिभूषण जेव्हां पुस्तकांचीं पानें उलटी तेव्हां ती स्तब्ध उभी राहून त्याच्या ज्ञानाचें आश्चर्य करी.

शेवटीं ह्या विस्मयमग्न बालिकेनें क्षीणदृष्टी शशिभूषणचें मन आकर्षित केलें. शशिभूषण एके दिवशीं एक चांगल्या बांधाईचें पुस्तक उघडून म्हणाला, "गिरिबाला, चित्र पहायला ये." गिरिबाला तत्क्षणीं पळून गेली.

किंतु दुसरे दिवशीं पुनः रेघारेघाची साडी नेसून त्या गजांच्या बाहेर तशीच गांभीर्यानें लक्ष लावून शशिभूषण वाचीत असतां निरखून पाहूं लागली. शशिभूषणनें आजहि हांक मारिली, पण पाठीवर वेणी सुटलेली तशीच पळून गेली.

अशा रीतीनें त्यांच्या परिचयाचा सूत्रबंध होऊन क्रमाक्रमानें परिचयघनिष्ट होऊन केव्हां तिनें गजाच्या आंत प्रवेश केला, व पुस्तकांच्या राशींत आप-ल्याला स्थान मिळविलें, त्या तारखेचा निर्णय करणें इतिहाससंशोधन मंडळींचें काम आहे.

शशिभूषणजवळ गिरिबालेच्या शिक्षणाला आरंभ झाला, हें ऐकून सगळीं हांसूं लागतील. हे मास्तर आपल्या क्षुद्र छात्रीला केवळ धुळाक्षरें, शब्दार्थ व व्याकरण शिकवीत असें नाहीं; अनेक मोठमोठ्या काव्यांचा अर्थ करून सांगत व तिला तिचें मतहि विचारीत. बालिकेला काय समजे तें परमेश्वराला ठाऊक; पण तिला हौस वाटे यांत शंका नाहीं. तें समजो, न समजो, तिच्या बाल हृदयावर कांहींतरी कल्पनाचित्र उमटे. स्तब्धपणें डोळे लावून मनापासून ऐके, मधूनमधून एखादाएखादा अगदीं असंगत प्रश्नहि करी व कधीं कधीं अकस्मात असंलग्न प्रसंगांतर होई. शशिभूषण त्यामुळें कधीं रागावत नसे. मोठमोठ्या काव्यांसंबंधीं ह्या क्षुद्र समालोचकाची निंदा, प्रशंसा, टीका, भाष्य ऐकून त्याला मोठी गम्मत वाटे. त्या सगळ्या गांवांत ही गिरिबालाच काय ती त्याचा एकटा समजदार मित्र.

गिरिबालाशीं शशिभूषणचा प्रथम परिचय झाला त्या वेळीं तिचें वय आठ वर्षांचें होतें. हल्लीं ती दहा वर्षांची झाली होती. ह्या दोन वर्षांत ती इंग्रजी व बंगाली दोनहि वर्णमाला शिकून चार दोन पुस्तकेंहि तिनें सहज वाचून टाकिलीं होतीं. शशिभूषणलाहि खेडेगांवांतील दोन वर्षें नितांत संगहीन विरस अशीं वाटलीं नाहींत.

## तृतीय परिच्छेद

गिरिबालेचा बाप हरकुमार याच्याशीं शशिभूषणचें फारसें सरळ नव्हतें. हरकुमार प्रथम प्रथम ह्या एम्. ए., बी. एल्. कडे फिर्यादीअर्यादी संबंधींत सल्ला विचारण्याकरितां येत. एम्. ए., बी. एल्. त्यांत फारसें मन घालीनात व नायबसाहेबांपाशीं कायद्याचें अज्ञान स्वीकारण्यांत संकोच मानीत नसत. नायबसाहेब शशिभूषण कपट करीत आहे असें मनांत समजत. अशा रीतीनें दोन वर्षें गेलीं.

सांप्रत एका हट्टी कुळाला शासन करणें भाग झालें होतें. नायबमहाशय त्याच्या नांवानें निरनिराळ्या भागांत निरनिराळे आरोप ठेवून फिर्याद दाखल करण्याच्या हेतूनें अभिप्राय घेण्याकरितां शशिभूषणच्या बरेच मागे

लागले होते. सल्ला देणें दूरच राहिलें उलट शांतपणानें पण दृढतेनें एक दोन गोष्टी अशा बोलले कीं, त्या त्यांना रुचल्या नाहींत.

इकडे पुन्हां कुळावरील एकाहि खटल्यांत त्यांना यश आलें नाहीं. त्यांच्या मनानें पक्कें घेतलें कीं, शशिभूषणनें त्या हतभागी कुळाला मदत केली. ह्या माणसाला लवकरच गांव सोडून द्यायला लावीन म्हणून त्यांनीं प्रतिज्ञा केली.

शशिभूषणच्या शेतांत गुरें शिरूं लागलीं, त्याच्या गवताच्या रानाला आग लागूं लागली. शेताच्या बांधांबद्दल भांडणें उपस्थित होऊं लागलीं, कुळें सरळ-पणानें वसूल देईनात. उलट शशिभूषणवर फिर्याद करण्याचा धाक घालूं लागलीं. येथपर्यंत कीं, अंधारांत रस्त्यावर त्याला मारतील, त्याच्या राहत्या घराला आग लावून देतील असें लोकांत बोलूं लागले.

शेवटीं शांतिप्रिय, निरिच्छ-प्रकृति शशिभूषणबाबूंनीं गांव सोडून कल-कत्यास पळून जाण्याचा बेत केला.

जाण्याची तयारी करूं लागले अशा समयीं गांवांत जॉइंट मॅजिस्ट्रेटसाहे-बांचा तंबू लागला. पहारेवाले, शिपाई, खानसामा, कुत्रीं, घोडीं, सैस, भंगी यांनीं गांवांत धुमाकूळ माजविला. मुलांचे थवे वाघाच्या मागोमाग कोल्ह्यासारखे भीतभीत साहेबांच्या मुक्कामाभोंवतीं कुतूहलानें साशंक मनानें घिरट्या घालूं लागले.

नायबमहाशय आतिथ्य सदराखालीं खर्च लिहून साहेबांच्याकरितां कोंबडीं, अंडीं, तूप, दूध वगैरेचा बंदोबस्त करूं लागले. जॉइंट मॅजिस्ट्रेटसाहे-बांना ज्या परिमाणांत खाद्य द्रव्यें अवश्य होतीं त्यापेक्षां पुष्कळ जास्त आण-वून अक्षुण्णमनानें सरबराई करून दिली; परंतु सकाळीं साहेबांचा भंगी येऊन साहेबांच्या कुत्र्याकरितां चार शेर तूप मागूं लागला तेव्हां दुर्दैवानें त्यांना तें सह्य झालें नाहीं. मेहेतरला उपदेश केला कीं साहेबांचा कुत्रा देशी कुत्र्याच्या मानानें पुष्कळ अधिक तूप विनापश्चात्ताप पचवूं शकतो तरी इतक्या प्रमा-णांत स्निग्ध पदार्थ त्याच्या स्वास्थ्याच्या दृष्टीनें कल्याणकारक नाहीं.

मेहेतरानें जाऊन साहेबांना सांगितलें कीं कुत्र्याला मांस कुठें मिळेल म्हणून चौकशी करायला नायबसाहेबांच्या इथें गेलों तों जातीचा भंगी म्हणून अपमान करून सर्व लोकांच्या समक्ष मारहाण करून मला हांकून दिलें. साहेबांचा सुद्धां अपमान करायचा राहिला नाहीं.

एकतर ब्राह्मणांचा जात्यभिमान साहेब लोकांना सहजच असह्य होतो; त्या उप्पर आपल्या मेहेतराचा अपमान करण्याचें साहस त्यानें केलेलें; मग साहेबांना हें थोडेंच सहन होणार! तत्क्षणीं चपराशाला हुकुम केला कीं नायबला बोलावून आण.

नायब कांपत कांपत दुर्गेचा जप करीत करीत साहेबांच्या तंबूसमोर येऊन उभे राहिले. साहेब तंबूतून पुटपुटत बाहेर येऊन नायबला उच्च स्वरांत विचारलें—" तूं मी कीं कारण वशटो आमार मेठरके दूर करिया छे ? "

हरकुमारनें घाबरून जाऊन हात जोडून म्हटलें कीं, साहेबांच्या मेहेतरला दूर करीन ही स्पर्धा कधींही मी केली नाहीं. कुत्र्याकरितां चार शेर घी एकदम मागून बसल्यामुळें प्रथम मी कुत्र्याच्या कल्याणाकरितां नम्रतेनें समजूत घातली, पण लगेच घृत संग्रह करून आणण्याकरितां निरनिराळ्या ठिकाणीं लोक पाठविले आहेत.

साहेबांनीं विचारलें, कोणकोण पाठविले आहेत, अन् कुठकुठें पाठविले आहेत?

हरकुमारनीं तत्क्षणीं जें नांव तोंडाला आलें तें सांगून टाकिलें. तो तो मनुष्य त्या त्या गांवीं गेला आहे कीं नाहीं त्याचा तपास करण्याकरितां लगें-च्च्या लगेंच साहेबांनीं लोक पाठविले व नायबला तंबूत बसवून ठेविलें.

लोकांनीं दुपारीं येऊन सांगितलें कीं तूप आणायला कोणीं कुठें गेलेला नाहीं. नायबचें सगळें सांगणें खोटें व मेहेतर जें बोलला तेंच सत्य ह्याबद्दल साहेबांना संदेह उरला नाहीं. साहेबांनीं रागानें गर्जना करून भंग्याला हांक मारून म्हणाले, ह्या शालकाचा ( साल्याचा ) कान धरून तंबूच्या भोंवतीं फेरी घालायला लाव. मेहेतरनें कालक्षेप न करितां चारी बाजूंनीं जमलेल्या लोकांसमक्ष साहेबांच्या आज्ञेचें पालन केलें.

पहातां पहातां ही गोष्ट घरोघर झाली. हरकुमार घरीं येवून अन्नग्रहण न करितां मुमूर्षूप्रमाणें पडून राहिला.

जमिदारीकामानिमित्तानें नायबसाहेबांना पुष्कळ शत्रू होते, व त्यांना या घटनेमुळें आनंद झाला. पण कलकत्त्यास जाण्यास उद्यत झालेल्या शशिभूषणनें हें ऐकतांच त्याचें सर्व आंग लाल झालें व रात्रभर त्याला झोंप आली नाहीं.

दुसरे दिवशीं सकाळीं शशिभूषण हरकुमारबाबूंच्या घरीं गेला. हरकुमार त्याचा हात धरून व्याकुळ होऊन रडूं लागला. "साहेबांच्या नांवानें मानहानीचा दावा आणिला पाहिजे, मी तुमचें वकीलपत्र घेऊन मांडतों" म्हणून शशिभूषण म्हणूं लागला.

खुद्द मॅजिस्ट्रेटसाहेबांवर दावा करावयाचा हें ऐकून प्रथम हरकुमार भिऊन गेला; पण शशिभूषण कांहीं केल्या आग्रह सोडीना.

हरकुमारांनीं विचार करितों म्हणून सांगितलें. पण त्यांनीं जेव्हां पाहिलें कीं, ही गोष्ट सगळीकडे जाहीर झाली आहे व आपल्या शत्रूंना मोठा आनंद होत आहे तेव्हां त्यांच्याच्यानें राहवेना व ते शशिभूषणला शरण गेले—हरकुमार म्हणाला, "बाबू, मी ऐकितों कीं, तुम्ही निष्कारण कलकत्त्याला जावयाचा बेत केला आहे. तें होणार नाहीं. तुमच्यासारखा एखादा मनुष्य गांवांत असला म्हणजे आम्हांला किती धीर असतो ! कांहीं होवो, मला ह्या घोर अपमानांतून मुक्त करा."

## चतुर्थ परिच्छेद

जो शशिभूषण लोकांच्या दृष्टिआड कोणाशीं संबंध न ठेवितां एकेकटा राहून आपला बचाव करीत असे तो आज कोर्टांत येऊन दाखल झाला. मॅजिस्ट्रेटनें त्याची फिर्याद ऐकून आपल्या खाजगी बैठकींत बोलावून आणून अत्यंत आदरपूर्वक सांगितलें "शशिबाबू, हा खटला आपसांत मिटविणें ठीक नाहीं कां होणार ?"

शशिबाबूंनीं टेबलावर पडलेल्या एका कायद्याच्या पुस्तकाच्या मलपृष्ठाकडे कपाळाला आठ्या घालून क्षीण दृष्टीनें लक्षपूर्वक बघतबघत म्हटलें, "आमच्या अशिलाचें समाधान अशानें होणार नाहीं. आमच्या अशिलाचा अपमान चार लोकांसमक्ष झाला आहे. त्याअर्थी हा खटला गुप्तपणें मिटवायचा काय म्हणून?"

साहेबांनीं चार दोन गोष्टी सांगून पाहिल्या. त्यांनीं ओळखिलें कीं, ह्या अल्पभाषी, अल्पदृष्टी युवकाला सहज विचलित करणें दुरापास्त. साहेब म्हणाले, "ठीक आहे बाबू, पाहतां येईल याचा परिणाम किती दूरवर होतो तो!"

इतकें बोलून मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं मुकदम्याची तारीख बदलून गांवतपासणीकरितां बाहेर पडले.

इकडे जॉइंटसाहेबांनीं जमिदाराला पत्र लिहिलें कीं, "तुमच्या कारभाऱ्यानें आमच्या नोकराचा अपमान करून आमची अवज्ञा केली आहे. आम्हांला आशा आहे कीं, तुम्ही याचा योग्य विचार कराल."

जमिदारानें अत्यंत घाबरून जाऊन हरकुमाराला तत्क्षणीं बोलाविलें. कारभाऱ्यानें साद्योपान्त समस्त घटना खुलासा करून सांगितली. जमिदार अत्यंत विरक्त होऊन म्हणाले, "साहेबांच्या भंग्याला जर चार शेर तूप पाहिजे होतें, तर निमूटपणें तत्क्षणीं तुम्ही कां दिलें नाहीं? तुमच्या बापाच्या पदरचें कांहीं जात होतें का?"

हरकुमाराला ही गोष्ट नाकबूल करतां येईना व तसें केल्यानें त्यांच्या पैतृक संपत्तीला कोणत्याहि तऱ्हेनें बाध येण्याचा संभव नव्हता. अपराध–स्वीकार करून हरकुमारबाबू म्हणाले, "माझी गृहदशा मंद म्हणून मला ही अशी दुर्बुद्धी झाली."

जमिदार म्हणाले, "बरें, पुन्हां साहेबांवर फिर्याद करावयाला तुम्हांला कुणी सांगितलें?"

हरकुमार म्हणाले, "धर्मावतार! फिर्याद करायची माझी इच्छा नव्हती. तो आमच्या गांवचा शशी, त्याला कुठूनहि कोणाचें काम मिळेना. तो माझ्या मागें लागून माझी बहुतेक संमति न घेतांच हा गोंधळ घालून बसला."

हें ऐकून जमिदारबाबू शशिभूषणवर अत्यंत क्षुब्ध झाले. मनांत म्हणाले, अयोग्य, नवीन वकील, हुज्जतखोर, कांहींतरी करून लोकांच्या नजरेस येण्याची खटपट करीत आहे. कारभाऱ्याला हुकुम दिला कीं, खटला काढून घेऊन कसें तरी करून त्वरित छोट्याबड्या मॅजिस्ट्रेट युगुलाला शांत केलें पाहिजे.

साहेबांच्या करितां थोडीं फळें वगैरे, शतिल भोज्य पदार्थ, भेट बरोबर घेऊन नायब जॉइंट मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या घरीं हाजर झाले. साहेबांना सांगितलें कीं, " साहेबांच्यावर फिर्याद करणें हें आधींच त्यांच्या स्वभावाविरुद्ध. केवळ, शशिभूषण नावांचा गांवांतला एक अजातस्मश्रू पोरकट नवीन वकील आहे, त्याचा कावा न ओळखून हें मी केलें." साहेब शशिभूषणवर अत्यंत विरक्त व नायबांच्यावर प्रसन्न झाले. साहेब म्हणाले, "रागेर माथाय नायेब बाबूके "डंड विटान" करि या तिनि दुःखित आच्छेन" ( रागाच्या आवेशांत नायबबाबूंना शिक्षा केल्याबद्दल आपण दुःखित आहोंत). साहेब मजकूर बंगाली भाषेची परीक्षा उत्तीर्ण होऊन साधारण मनुष्याशीं थोडेथोडे बोलूं शकत.

नायब म्हणाले, " कधीं आईबाप रागानें शासनहि करितात, तर कधीं आदर करून पोटाशींहि धरितात. त्यांना मुलांना किंवा आईबापांना दुःख देण्याचें कांहींच कारण नाहीं."

यानंतर जॉइंटसाहेबांच्या समस्त भृत्यवर्गाला यथायोग्य पारितोषिकें देऊन हरकुमारबाबू साहेबांच्या बरोबर खेड्यांतून पहाणीकरितां गेले. मॅजिस्ट्रेटसाहेब कारभाऱ्यांच्या तोंडून शशिभूषणच्या अहंकाराच्या गोष्टी ऐकून म्हणाले, " मी तुम्हांला चांगले माणूस म्हणून समजतों. तुम्ही खाजगी रीतीनें न मिटवितां एकाएकीं आमच्यावर दावा केलांत, ह्याचें आम्हांला फार आश्चर्य वाटलें. आतां आम्हांला सर्व गोष्ट समजली."

शेवटीं साहेबांनीं नायबला विचारिलें, " शशीचा कॉंग्रेसशीं संबंध आहे कीं नाहीं ?" नायबसाहेबांनीं कांहींएक न कचरतां जबाब दिला—" हो."

साहेबांना आपल्या साहेबी बुद्धिनें " हा सर्व कॉंग्रेसचा खेळ " हें तेव्हांच समजलें. मोठ्या कुशलतेनें " अमृत बाजारांत " लेख लिहून सरकारची

नालस्ती करिण्याकरितां कॉंग्रेसचे क्षुद्र चेले गुप्तरीतीनें सर्वत्र संचार करीत आहेत. ह्या एकंदर क्षुद्र कंटकांचें एकदम दलन करून टाकण्याकरितां मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या हातांत ब्रिटिश गव्हर्नमेंट अधिक सत्ता देत नाहींत, म्हणून भारतवर्षीय गव्हर्नमेंट अत्यंत "दुर्बल" समजून मनांतले मनांत धिःकार करूं लागले. परंतु कॉंग्रेसं-वाला म्हणून शशिभूषणचें नांव मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या लक्षांत राहिलें.

## पंचम परिच्छेद

संसारामध्यें ज्या वेळेस मोठमोठ्या घडामोडी प्रबल आवेगानें गर्जना करून उठतात, त्याच वेळेस लहान लहान व्यापारहि आपलें क्षुद्र जाल जगतांवर विस्तृत करण्याचा अधिकार बजावीत असतात.

शशिभूषण मॅजिस्ट्रेटवरील फिर्यादीचे कामीं विशेष व्यग्र होऊन अनेक पुस्तकांमधून कायदे काढून पहात आहे, मनांतल्या मनांत वक्तृत्व पाजळून बघत आहे, काल्पनिक साक्षीदारांची फेरतपासणी करीत आहे व कोर्टांतील जनसमूह व युद्धकांडांतील भावी पर्वाध्याय मनांत येऊन कंपित, धर्मार्द्र होऊन गेला आहे, अशा वेळीं त्याची क्षुद्र शिष्या, आपलें जीर्ण पुस्तक, शाई सांडलेलें नोटबुक, बागेंतून आणिलेलीं जांभळें, कधीं फळें, आईच्या कोठींतील लोणचें, कधीं खोबऱ्याच्या वड्या, कधीं मोदक, कधीं कांहीं, कधीं कांहीं, घेऊन येऊन नियमित वेळीं दारापाशीं येऊन उभी रहात असे.

प्रथम कांहीं दिवस बघते तों शशिभूषण एक चित्रहीन मोठें थोरलें पुस्तक उघडून त्यांत गर्क होऊन पानें उलटीत असे; ती जो मन लावून धडा करी, तिकडे त्याचें लक्षहि नसे. इतर वेळीं शशिभूषण जीं दुसरीं अनेक पुस्तकें वाची, त्यांतून थोडा थोडा भाग तिला समजून देण्याचा प्रयत्न करी, पण ह्या स्थूलकाय काळ्या पुठ्याच्या बुकांतून गिरिबालाला ऐकण्याजोगी एखादुसरी देखील गोष्ट नसावी ? तें असो, पण हें पुस्तक कां इतकें मोठें ? व गिरिबाला कां इतकी लहान ?

प्रथम गुरूचें लक्ष आकर्षित करण्याकरितां एकेक अक्षर पृथक् पृथक् करून मान हालवीत डोलत डोलत गिरिबालानें मोठमोठ्यानें वाचण्यास आरंभ केला.

त्याचा विशेष उपयोग होत नाहींसें पाहिलें, तेव्हां त्या काळ्या मोठ्या पुस्तका-वर मनांत फार रागावली व एखाद्या कुत्सित कठोर निष्ठुर माणसाकडे बघावें तद्वत् बघूं लागली. हें पुस्तक गिरिबालाला मूल समजून तें जणूं काय अवज्ञा करीत होतें ह्मणून त्याचें प्रत्येक दुर्बोध पत्र दुष्ट माणसाचा आकार धरून तिच्याकडे बघत आहेसें तिला दिसलें. तें पुस्तक जर एखादा चोर चोरून घेऊन गेला तर, आपण त्याला आईच्या कोठींतले सगळे खायचे जिन्नस बक्षीस देऊं असें तिच्या मनांत आलें. त्या पुस्तकाचा नाश व्हावा ह्मणून देवाजवळ अनेक असंगत असंभव प्रार्थना केल्या, पण देवानें ऐकिल्या नाहींत व वाचकांना ऐकविणेंहि आवश्यक नाहीं.

तेव्हां दु:खित होऊन ती मुलगी पुस्तकें हातांत घेऊन गुरुगृहीं जाण्याची बंद झाली. ह्याप्रमाणें एकदोन दिवस गेल्यावर आपण न गेल्याचा परिणाम काय झाला हें पाहण्याकरितां दुसऱ्याच निमित्तानें शशिभूषणाच्या घरासमोरील रस्त्यावर येऊन पहाते तों शशिभूषण तें काळें पुस्तक ठेवून देऊन उभा राहून हावभाव करून लोखंडी गजांना उद्देशून विजातीय भाषेमध्यें वक्तृत्वतेचा प्रयोग करून पहातांना तिच्या दृष्टीस पडला; जणूं काय जज्जसाहेबांचें मन कसें विरघळेल याची परीक्षा त्या गजांवर करून पहात होता. संसारानभिज्ञ, ग्रंथविहारी शशिभूषणाला वाटलें, पुरातन कालीं डिमास्थिनीज, सिसेरो, बर्क, शेरिडन् प्रभृति वाक्पटु वक्तृत्वाच्या जोरावर जें कार्य करून गेले, ज्याप्रमाणें शब्दशरांनीं अन्यायाला छिन्नविछन्न, अत्याचाराला लांछित व अहंकाराला त्यांनीं धूलिसात् करून टाकिलें, तसें आजकालच्या दुकानदारीच्या काळांतहि तें असंभव नाहीं. प्रभुत्वमदगर्वित, उद्धत इंग्रजांना कशा रीतीनें जगाच्या समोर लज्जित व अनुतप्त करितां येईल, या गोष्टीचा शशिभूषण तिलकूची गांवांतल्या जीर्ण क्षुद्र गृहांत बसून विचार करीत होता. आकाशांतील देवता-गण ऐकून हंसत होते, कीं त्यांचे दिव्य चक्षु पाण्यानें भरून आले होते तें सांगता येणें कठीण.

कसेंहि असो, गिरिबाला त्या दिवशीं त्याच्या दृष्टीस पडली नाहीं. ते दिवशीं तिच्या पदरांत जांभळें नव्हतीं. पूर्वी एकदां जांभळाची बी फेकितांना ती पकडली गेल्यापासून त्या जांभळासंबंधीं तिला फार संकोच वाटूं लागला होता. येथपर्यंत कीं, जर कधीं शशिभूषणनें " गिरी, आज जांभळें नाहींत " म्हणून विचारलें तर तिला तो उपहास वाटून रागानें "जा " ह्मणून पळून जाण्याचा उपक्रम ती करी. आज जांभळाच्या बीच्या अभावीं तिला दुसरी युक्ती करावी लागली. सहसा दूर बघितल्यासारखें दाखवून बालिका मोठ्या स्वरानें ह्मणाली, "स्वर्ण, तूं जा कशी, मी आतां आलें."

पुरुषवाचकांच्या मनांत येण्याचा संभव आहे कीं, ती बालिका स्वर्णलता नामक दूर असलेल्या आपल्या सखीला उद्देशून तें बोलली असावी; पण स्त्रीवर्गाच्या सहज लक्षांत येण्याजोगें आहे कीं, दूर कोणीहि नव्हतें, लक्ष्य अत्यंत निकट! पण अरेरे, त्या दृष्टिमंद युवकाचे ठिकाणीं तें लक्ष्य विफलित झालें. शशिभूषणनें ऐकिलें नाहीं, एवढेंच नाहीं, तर त्याला वाटलें कीं, बालिका खरोखरच क्रीडेला उत्सुक—म्हणून खेळ सोडून अध्ययनाकरितां हाक मारून आणणें त्याला योग्य वाटलें नाहीं. ते दिवशीं तोहि कांहीं गोष्टींचा मनांतल्यामनांत विचार करून खिन्न झाला होता. बालिकेच्या क्षुद्र हातांनीं लक्ष्य विद्ध झालें नाहीं, तसेंच त्याच्या शिक्षित हस्ताचें महत् संधानहि व्यर्थ गेलें. वाचकांना ही गोष्ट विदित आहेच.

जांभळांच्या बियांत हा तरी गुण आहे कीं, एकएक करीत पुष्कळशा मारितां येतात. चार निष्फळ झाल्या तर पांचवी तरी संकल्पित ठिकाणीं जाऊन पोहोंचेल. किंतु हजार जरी काल्पनिक स्वर्ण असल्या तरी तिला " आतां येतें " म्हणून आश्वासन दिल्यावर अधिक वेळ उभें राहतां येत नाहीं. राहिलें कीं, स्वर्णच्या अस्तित्वासंबंधीं लोकांना साहाजिकच संदेह उत्पन्न होणार. म्हणून तो उपाय निष्फल होतांच गिरिबालाला विलंब न करितां तेथून जावें लागलें. तथापि स्वर्ण म्हणून कोणी दूरस्थित सखी असून तिचा संगलाभ करण्याची अभिलाषा मनापासून असतांना ज्याप्रमाणें वेगानें उल्हासानें पावलें

स्वाभाविकच पडावींत तसें गिरिबालेच्या गतींत हें दिसून आलें नाहीं. जणूं काय सखी तिच्या पृष्ठभागीं आहे.

मागून कोणी येतें आहे कीं काय, हें जाणण्याकरितां जी चेष्टा करावयास पाहिजे ती केली; जेव्हां खात्री झाली कीं, कोणी येत नाहीं, तेव्हां आशेचा अवशिष्ट क्षीण, भग्नांश घेऊन एकवार मागें फिरून निरखून पाहिलें; व कोणीहि दिसलें नाहीं तेव्हां ती क्षुद्र आशा व शिथिलपत्र पाठ्यपुस्तकाचे तुकडे तुकडे करून रस्त्यांत टाकून दिले. शशिभूषणनें जी विद्या तिला दिली होती ती जर कोणत्या तरी रीतीनें परत देतां आली असती तर, संभव आहे कीं, परित्याज्य जांभळांच्या बियांप्रमाणें शशिभूषणच्या दारासमोर समस्त बियांस शब्दनिक्षिप्त करून ती निघून आली असती. बालिकेनें प्रतिज्ञा केली कीं, शशिभूषणची पुन्हां गांठ पडण्यापूर्वी त्याच्यापाशीं शिकलेलें सर्व मी विसरून जाईन. तो जे प्रश्न विचारील त्याचें उत्तर देतां येणार नाहीं. एक, एक, एकसुद्धां नाहीं. मग शशिभूषण कसा खजिल होईल !

गिरिबालेचे दोन्ही डोळे पाण्यानें भरून आले. शिकलेलें विसरून गेल्यावर शशिभूषणला कसा तीव्र पश्चात्ताप होईल, हें मनांत घेऊन तिच्या पीडित हृदयाचें थोडेंसें सांत्वन झालें, व केवळ शशिभूषणच्या दोषामुळें विस्मृतशिक्षा त्या हतभागिनी भविष्यत् गिरिबालेची कल्पना घेऊन तिला आपल्याबद्दल करुणा वाटूं लागली. आकाशांत ढग जमूं लागले. वर्षाऋतूंत मेघ प्रत्यहीं येतात. गिरिबाला रस्त्याच्या प्रांतभागीं एका झाडाच्या आड उभी राहून अभिमानानें फुगून जाऊन रडूं लागली. असें अकारण रडणें प्रतिदिवशीं किती मुली रडतात ?

## षष्ठ परिच्छेद

शशिभूषणचें कायद्यासंबंधीं संशोधन व वक्तृत्वपरिशीलन हीं कोणत्या कारणांनीं व्यर्थ गेलीं हें वाचकांना विदित आहेच ! मॅजिस्ट्रेटवरील फिर्याद अकस्मात् बंद पडली. हरकुमारबाबूंची त्यांच्या जिल्ह्यांतील बेंचावर मॅजिस्ट्रेटचे जागीं योजना झाली. एक मळीन चापकान व पगडी घालून हरकुमार

आजकाल प्रायः जिल्ह्याचे ठिकाणीं जाऊन साहेब सुभे यांना नियमानें सल
करून येऊं लागले.

शशिभूषणच्या त्या काळ्या मोठ्या पुस्तकाला गिरिबालेनें दिलेला अभि
फलित होऊं लागला. तें एका अंधेराच्या कोपऱ्यांत अनादृत विस्मृतभावें
खात पडलें. पण त्याचा अनादर पाहून ज्या गिरिबालेला आनंद व्हावा
गिरिबाला तरी कुठें आहे ?

शशिभूषण जे दिवशीं प्रथम कायद्याचीं पुस्तकें बंद करून बसला,
दिवशीं एकाएकीं त्याला आठवण झाली कीं, गिरिबाला आली नाहीं. त्या
एका मागून एक कित्येक दिवसांचा इतिहास त्याच्या डोळ्यांसमोर उ
राहिला. "एके दिवशीं कशी अगदीं पहाटे गिरिबाला नववर्षाऋतूंतील
भरून बकुळीचीं फुलें घेऊन आली, तिला पाहूनहि जेव्हां आपण पुस्तकां
दृष्टि काढिली नाहीं, तेव्हां तिच्या श्वासोच्छ्वासांत कसा फरक पडला;
आपल्या पदराला टोंचलेला सुईदोरा बाहेर काढून खालीं मान घालून ए
फूल घेऊन ती माळ कशी गुंफूं लागली; माळ किती सावकाश गुंफीत हो
—पुष्कळ वेळानें ती कशी गुंफून झाली—गिरिबालेची घरीं जाण्याची वेळ झा
तरी देखील शशिभूषणचें वाचन संपलें नाहीं; गिरिबाला माळ खाटेवर ठे
म्लान मुखानें कशी निघून गेली, तिचा अभिमान प्रतिदिन कसा वा
गेला, केव्हांपासून ती आपल्या घरांत न येतां समोरच्या रस्त्यानें मधून म
दृष्टीस पडून निघून जाई व शेवटीं कधींपासून तिनें त्या रस्त्यानें जाणें
बंद केलें," ह्या सर्व गोष्टींचा विचार शशिभूषणचे मनांत घोळूं लागला. तिनें
रस्त्यानें जाणें बंद करून आज बरेच दिवस झाले होते. गिरिबालेचा अ
मान इतके दिवस टिकण्याचा संभव नाहीं असेंहि मनांत आलें. शशिभू
दीर्घश्वास टाकून हताश कर्तव्यहीन होऊन भिंतीला टेकून बसला. एक ती
छात्री न आल्यानें त्याचीं सर्व पुस्तकें नितांत रुचिहीन होऊन गेलीं. पुस्
पुनःपुनः घेऊन दोनचार पानें वाचून पुन्हां ठेवून द्यावें लागे. लिहि

आजकाल प्रायः जिल्ह्याचे ठिकाणीं जाऊन साहेब सुभे यांना नियमानें सलाम करून येऊं लागले.

शशिभूषणच्या त्या काळ्या मोठ्या पुस्तकाला गिरिबालेनें दिलेला अभिशाप फलित होऊं लागला. तें एका अंधेराच्या कोपऱ्यांत अनादृत विस्मृतभावें धूळ खात पडलें. पण त्याचा अनादर पाहून ज्या गिरिबालेला आनंद व्हावा ती गिरिबाला तरी कुठें आहे ?

शशिभूषण जे दिवशीं प्रथम कायद्याचीं पुस्तकें बंद करून बसला, तेच दिवशीं एकाएकीं त्याला आठवण झाली कीं, गिरिबाला आली नाहीं. त्या वेळीं एका मागून एक कित्येक दिवसांचा इतिहास त्याच्या डोळ्यांसमोर उभा राहिला. "एके दिवशीं कशी अगदीं पहाटे गिरिबाला नववर्षाऋतूंतील ओटी भरून बकुळीचीं फुलें घेऊन आली, तिला पाहूनहि जेव्हां आपण पुस्तकांतून दृष्टि काढिली नाहीं, तेव्हां तिच्या श्वासोच्छ्वासांत कसा फरक पडला; तिनें आपल्या पदराला टोंचलेला सुईदोरा बाहेर काढून खालीं मान घालून एकेक फूल घेऊन ती माळ कशी गुंफूं लागली; माळ किती सावकाश गुंफीत होती,—पुष्कळ वेळानें ती कशी गुंफून झाली—गिरिबालेची घरीं जाण्याची वेळ झाली, तरी देखील शशिभूषणचें वाचन संपलें नाहीं; गिरिबाला माळ खाटेवर ठेवून म्लान मुखानें कशी निघून गेली, तिचा अभिमान प्रतिदिन कसा वाढत गेला, केव्हांपासून ती आपल्या घरांत न येतां समोरच्या रस्त्यानें मधून मधून दृष्टीस पडून निघून जाई व शेवटीं कधींपासून तिनें त्या रस्त्यानें जाणेंहि बंद केलें," ह्या सर्व गोष्टींचा विचार शशिभूषणचे मनांत घोळूं लागला. तिनें त्या रस्त्यानें जाणें बंद करून आज बरेच दिवस झाले होते. गिरिबालेचा अभिमान इतके दिवस टिकण्याचा संभव नाहीं असेंहि मनांत आलें. शशिभूषण दीर्घश्वास टाकून हताश कर्तव्यहीन होऊन भिंतीला टेकून बसला. एक ती क्षुद्र छात्री न आल्यानें त्याचीं सर्व पुस्तकें नितांत रुचिहीन होऊन गेलीं. पुस्तक पुनःपुनः घेऊन दोनचार पानें वाचून पुन्हां ठेवून द्यावें लागे. लिहितां

लिहितां क्षणोक्षणीं चकित होऊन रस्त्याकडे, दाराकडे प्रतीक्षापूर्वक दृष्टीनें पाही; अशा रीतीनें लिहिणें बंद पडे.

शशिभूषणला शंका आली कीं, गिरिबाला आजारी असावी. गुप्त रीतीनें शोध करितां समजलें कीं, ती शंका निराधार !

गिरिबाला आजकाल बाहेर पडत नसे. तिच्याकरितां वर निश्चित झाला होता. गिरीनें जे दिवशीं वाचनपुस्तकाचे तुकडे तुकडे करून चिखल झालेल्या रस्त्यावर टाकून दिले, त्याच्या दुसरे दिवशीं सकाळीं आपल्या ओच्यांत निरनिराळे फराळाचे जिन्नस घेऊन घरांतून बाहेर पडून घाईघाईनें ती चालली होती. फार उकडत असल्यानें रात्रभर झोंप न येऊन हरकुमार पहाटेपासून बाहेर येऊन उघड्या आंगानें तंबाखू ओढीत बसले होते. त्यांनीं गिरीला विचारिलें, " कुठें चाललीस ? " गिरीनें सांगितलें, " शशिदादाच्या घरीं. " हरकुमारबाबूंनीं रागावून सांगितलें, " शशिदादाच्या घरीं जात जाऊं नकोस. घरीं जा !" इतकें बोलून, सासरीं जायचे दिवस आले, इतकी मोठी झाली तरी लज्जेचा अभाव, असें म्हणून मनांतल्यामनांत रागावले. त्या दिवसापासून तिचें बाहेर जाणें बंद झालें. पुन्हां तिचा अभिमानभंग होण्याला अवसर मिळाला नाहीं. आंब्याच्या वड्या, खोबरेपाक व बर्फी भांडारांत जागच्याजागीं परतलीं. पाऊस पडूं लागला, बकुळीचीं फुलें झडून पडलीं, पेरू पिकले, शाखा-स्खलित चंचुक्षत परिपक्व काळ्याभोर जांभळांचा प्रतिदिन तरुतलीं सडा पडूं लागला. तें छिन्नप्राय वाचनपुस्तक मात्र पुन्हां दिसलें नाहीं.

## सप्तम परिच्छेद

गांवांत गिरिबालाच्या विवाहानिमित्त जे दिवशीं वाजंत्री वाजूं लागलीं तेच दिवशीं अनिमंत्रित शशिभूषण नावेंतून कलकत्त्यास जाण्यास निघाला.

खटला काढून घेतल्या दिवशांपासून हरकुमार शशिभूषणला विष दृष्टीनें बघत असे. त्याचें कारण इतकेंच कीं हरकुमारची मनांतल्यामनांत खात्री होती कीं, शशिभूषण आपल्याबद्दल घृणा करीत असेल. त्याचीं सहस्र काल्पनिक प्रमाणें हरकुमारबाबूला त्याच्या चेहेऱ्यावर, त्याच्या दृष्टींत, त्याच्या व्यवहारांत

दिसत होतीं. त्याला वाटे कीं, गांवांतले सगळे लोक हळुंहळूं आपला अपमान-वृत्तांत विसरून गेले आहेत व हा एक शशिभूषणच कायतो त्याची स्मृती जागृत ठेवीत आहे; असें मनांत येऊन हरकुमारबाबूंना शशी डोळ्यांसमोर नकोसा झाला. तो दृष्टीस पडतांच त्यांच्या अंतःकरणांत लज्जा, संकोच व त्याच्याच बरोबर क्रोध उत्पन्न होई. शशीला गांव सोडायला लावीन म्हणून हरकुमार प्रतिज्ञा करून बसले होते.

शशिभूषणसारख्या माणसाला गांव सोडावयाला लावणें फारसें कठीण नाहीं. नायब महाशयांची प्रतिज्ञा लवकरच सफल झाली. एके दिवशीं प्रातःकालचे समयीं, पुस्तकांचें ओझें व दोनचार टिनच्या ट्रंका घेऊन शशी नौकेवर चढला. गांवांशीं जें एक प्रेमपाशबंधन तेंहि आज समारंभानें छिन्न होत होतें. सुकुमार बंधनानें आपल्या हृदयाला किती दृढतेनें वेष्टन करून धरून ठेविलें होतें हें ह्यापूर्वी त्याला संपूर्ण रूपानें समजलें नव्हतें. आज जेव्हां नौका चालूं झाली, गावांतील वृक्षांचे शेंडे अस्पष्ट दिसूं लागले व उत्सवांतील वाद्यध्वनी क्षीण होऊं लागला, डोळे पाण्यानें भरून आले, छाती भरून आली, गळा दाटला, कपाळावरील शिरा उडूं लागल्या व सर्व जग छायानिर्मित मायामरीचिके-प्रमाणें अत्यंत अस्पष्ट भासूं लागलें.

वारा प्रतिकूल व जोरानें वाहात होता म्हणून नौका जरी स्रोताच्या अनु-कूल दिशेनें जात होती तरी गती अति मंद होती. या समयीं नदीमध्यें एक अरिष्ट उद्भवलें व त्यामुळें शशिभूषणाच्या प्रवासांत एक विघ्न झालें.

घाट स्टेशनापासून सदर महकूमापर्यंत एक नवीन स्टीमरलाईन हल्लीं सुरू झाली होती. त्यांची स्टीमर सशब्द पक्षसंचालन करीत लाटांवरून प्रवाहाच्या उलट दिशेनें जात होती. जहाजावर नवीन लाइनीवरील अल्पवयस्क मॅनेजर-साहेब व थोडेसे उतारू. उतारूंमध्यें शशिभूषणच्या गांवचे कोणी कोणी होते.

एका महाजनाची नौका कांहीं अंतरावरून शीड उभारून या स्टीमर-बरोबर येण्याची खटपट करीत होती. मधूनमधून जवळ येई, पुन्हां मागें पडे. हळुंहळूं नाविकांचा जोर कमी झाला. त्यांनीं प्रथम एका शिडामागून दुसरें, दुस-

त्यामागून तिसरें देखील उभारून पाहिलें. वाऱ्याच्या वेगानें सुदीर्घ डोलकाठी सन्मुख आनत होऊन पडली व विदीर्ण तरंगराशी नावेच्या दोन्हीं पार्श्वभागीं अट्टकलरव नृत्य करीत करूं लागला. नौका बेलगाम अश्वाप्रमाणें सुटली. ज्या ठिकाणीं स्टीमरचा मार्ग किंचित् वांकडा होता, त्या ठिकाणीं जवळचा मार्ग घेतल्यामुळें नौका स्टीमरला टाकून पुढें गेली. मॅनेजरसाहेब स्पर्धेनें नौकेची प्रतियोगिता पहात होते. नौकेला जेव्हां पूर्ण वेग प्राप्त होऊन ती दोन एक हात स्टीमरच्या पुढें निघून गेली, त्या वेळीं साहेबांनीं बंदूक घेऊन त्या विस्तीर्ण शिडा-कडे रोखून झाडली. एका क्षणांत शीड फाटलें, नौका बुडाली; स्टीमर नदीच्या वांकामुळें दिसेनाशी झाली.

मॅनेजरसाहेबांनीं असें कां केलें हें सांगणें कठीण ! ह्या आंग्लनंदनाच्या मनांतील भाव आम्हां बंगाल्यांना कुठून नीटसा समजणार? एक तर त्या देशी शिडाचें धाष्टर्य त्यांना सहन झालें नाहीं, किंवा स्फीतविस्तीर्ण पदार्थ बंदुकीच्या गोळीच्या द्वारां निमिषमात्रांत विदीर्ण करण्याचें हिंस्र प्रलोभन त्यांना झालें असावें, किंवा ह्या गर्विष्ठ नौकेच्या वस्त्रखंडावर गोळी झाडून निमिषार्धांत हिची लीला समाप्त करण्यांत एखादा प्रबळ पैशाचिक हास्यरसहि असेल. निश्चयानें कांहींच सांगतां येत नाहीं. पण हें खचित कीं, इंग्रजांच्या मनांत एक विश्वास होता कीं, ही रसिकता दाखविण्यांत आपण शासनार्ह असें कांहींच करीत नाहीं, व अशीहि समजूत कीं, ज्यांची नौका गेली व वेळेनें प्राणहि गेले, त्यांची मनुष्यांत गणना नाहीं.

साहेबांनीं ज्या वेळीं बंदूक उचलून गोळी सोडिली, त्या वेळीं शशिभूषणची नौका या घटनेच्या अगदीं समीप होती. झालेला प्रकार शशिभूषणनें प्रत्यक्ष पाहिला. त्यानें ताबडतोब नौका घेऊन जाऊन नाविक व उतारूंना वर काढिलें. केवळ एक व्यक्ति आंत बसून स्वयंपाकाचा मसाला वाटीत होती ती पुन्हां दिसली नाहीं.

शशिभूषणच्या हृत्पिंडांमध्यें उत्तप्त रक्त वाहूं लागलें. कायद्याची गति अत्यंत मंद ! तो ( कायदा ) एखाद्या बृहत् जटिल लोहयंत्राप्रमाणें, तोलून

पुरावा घेणार व निर्विकार मनानें शासनविभाग करणार! त्यामध्यें मानव हृदयांतील उद्वेग नाहीं; क्षुधेला भोजन, इच्छेला उपभोग व दोषाला शासन ह्यांचा संबंध व क्रम विच्छिन्न करणें शशिभूषणच्या दृष्टिनें सारखेंच अस्वाभाविक! असे अनेक अपराध आहेत कीं, जे प्रत्यक्ष घडले असतां तत्क्षणीं आपल्या हातानें त्यांचा प्रतिकार न केल्यास अंतर्यामीं विधाता पुरुष जणूं काय आंतल्याआंत समक्ष पहाणाराला दग्ध करून टाकतो. अशा वेळीं कायद्याचें स्मरण करून सांत्वनालाभ करण्याची मनाला लाज वाटूं लागते. परंतु यंत्रतुल्य कायदा व यंत्रमय जहाज, मॅनेजरसाहेबांना शशिभूषणपासून दूर घेऊन गेलें. त्यांच्या हातून जगावर आणखी काय काय उपकार झाले होते हें सांगतां येत नाहीं. पण त्या प्रवासांत निःसंशय शशिभूषणच्या भारतवर्षीय प्लीहाचें रक्षण झालें.

जे नाविक वांचले त्यांना घेऊन शशिभूषण गांवीं परत आला. नौकेंत असलेले जूटचे गठ्ठे काढण्याकरितां माणसांना सांगून नाविकांना मॅनेजरच्या विरुद्ध पोलिसांत फिर्याद करण्यास त्यानें उपदेश केला.

नाविक कांहीं केल्या संमति देईनात! ते म्हणाले, "नौका तर बुडालीच आहे, आतां आम्हीं कशाला बुडूं? आधीं पोलिसला दक्षिणा दिली पाहिजे, नंतर कामकाज, आहारनिद्रा सोडून ह्या कचेरींतून त्या कचेरींत, तर त्यांतून ह्यांत भटकावें लागेल, त्या उपर साहेबांच्यावर फिर्याद केल्यानें काय आपत्ति येईल, व त्याचें फळ काय होईल तें भगवानाला ठाऊक!" शेवटीं जेव्हां समजलें कीं, शशिभूषण स्वतः वकील, फिर्यादीचा खर्च स्वतः सोसणार आहेत व नुकसानभरपाई मिळण्याचा पूर्ण संभव, तेव्हां ते कबूल झाले. परंतु शशिभूषणच्या गांवचे जे लोक स्टीमरवर होते ते कांहीं केल्या साक्ष देण्यास तयार होईनात! ते शशिभूषणला म्हणाले "महाशय, आम्हीं कांहींही पाहिलें नाहीं. आम्हीं जहाजाच्या मागल्या भागांत होतों. यंत्राची कटकट व पाण्याच्या कलकलीमुळें त्या ठिकाणाहून बंदुकीचा आवाज ऐकूं येण्याचा देखील संभव नव्हता."

आपल्या देशच्या लोकांचा मनांतल्यामनांत धिःक्कार करून शशिभूषणनें मॅजिस्ट्रेटकडे फिर्याद केली.

साक्षीदारांचें कांहीं कारण पडलें नाहीं. मॅनेजरसाहेबांनीं आपण बंदूक सोडिल्याचें कबूल केलें. त्यांनीं सांगितलें कीं, "आकाशांत एक पक्षी उडत होता, त्याच्यावर नेम धरिला होता. स्टीमर त्या वेळीं पूर्ण वेगानें जात होती, व त्याच वेळीं नदीचे वळणांत शिरली. तदनंतर आपल्याला समजलेंहि नाहीं कीं, काक मेला कीं बक मेला कां, नौका बुडली ! अंतरिक्षांत व पृथ्वीवर इतक्या शिकारी वस्तू असतांना कोणी बुद्धिमान् पुरुष इच्छापूर्वक " डर्टी रॅग " मलिन वस्त्रखंडावर एक पै किंमतीच्या छऱ्याच्या गोळीचा देखील अपव्यय करणार नाहीं.

मॅनेजरसाहेबांची कोणतीहि कसूर नाहीं, म्हणून खटला निकालांत काढिला गेला. मॅनेजरसाहेब चिरूट फुंकित क्लबांत व्हिस्ट खेळण्याकरितां निघून गेले. जो मनुष्य होडींत मचाला वाटीत बसला होता, त्याचें प्रेत नऊ मैलांवर खालीं जाऊन लागलेलें सांपडलें. शशिभूषण संतापानें घरीं परत आला.

जे दिवशीं शशिभूषण परत आला तेच दिवशीं नौका सजवून गिरीबालेला सासरीं घेऊन जात होते. जरी कोणीं त्याला बोलाविलें नव्हतें तरी, शशिभूषण हळुंहळू नदीतीरावर येऊन दाखल झाला. घाटांवर ज्या ठिकाणीं लोकांची गर्दी होती, त्या ठिकाणीं न जातां कांहीं अंतरावर पुढें जाऊन शशिभूषण उभा राहिला. नौका घाट सोडून ज्या वेळीं त्याच्या समोरून गेली, तेव्हां नववधू गिरिबालेला डोक्यावर पदर घेऊन मान खालीं घालून बसलेली पाहून शशि विस्मित झाला. गांव सोडून जाण्यापूर्वीं कसें तरी करून एक वेळ शशिभूषणला भेटावें म्हणून गिरिबालेची फार इच्छा होती, पण आपले गुरु जवळच तीरावर उभे आहेत हें तिला समजलें देखील नाहीं. तिनें एक वेळ मान वर करून देखील पाहिलें नाहीं; केवळ निःशब्द रोदनानें दोन्हीं गालांवरून अश्रुजल वहात होतें.

नौका हळुंहळू दूर जाऊन दिसेनाशी झाली. पाण्यावर सूर्याचे किरण चकचक करीत होते, जवळच्या आंब्यावर एक पापिया उच्छ्वसित कंठानें वारंवार गाऊनहि मनाचा आवेग निःशेष करूं शकला नाहीं. नौका, सामान व लोक

घेऊन ह्या तीरावरून त्या तीरावर जाऊंयेऊं लागली. घाटावर पाण्याला आलेल्या बायका गिरीच्या श्वशुरालययात्रेसंबंधीं मोठमोठ्यानें चर्चा करूं लागल्या. शशिभूषणनें चष्मा काढून डोळे पुसून त्याच मार्गानें त्याच गजांच्या खिडकीच्या क्षुद्र घरांत प्रवेश केला. एकाएकीं "शशिदादा" म्हणून गिरीचा शब्द ऐकल्याचा त्याला भास झाला—पण ती कुठें आहे ? कोठें ती गिरी ? ती घरांत नाहीं, रस्त्यांत नाहीं, गांवांत नाहीं-त्याच्या अश्रुजलाभिषिक्त हृदयांतरीं—

## अष्टम परिच्छेद

शशिभूषणनें पुन्हां सामानसुमान बांधून कलकत्त्यास जाण्याची तयारी केली. कलकत्त्यास कांहीं काम होतें असें नाहीं. तेथें जाण्यांत कांहीं विशेष उद्देश होता असेंहि नाहीं. म्हणूनच रेल्वेनें न जातां नदीनें जाण्याचा त्यानें बेत केला.

वर्षाऋतूंत बंगालप्रांतांत चारी दिशांना लहान मोठ्या हजारों जलसंचयांचें जाळें पसरलेलें असतें. सरल श्यामल वंगभूमींतील शिरा उपशिरा परिपूर्ण होऊन, तरुलता, तृणगुल्म, झाडेंझुडपें, धान्य, अंबाडी, ऊंस, इत्यादिकांनीं बंगाल देश उन्मत्त यौवनप्राचुर्यानें जणूं काय एकवार उद्दाम उच्छृंखल होऊन गेला आहे.

शशिभूषणची नौका त्या समस्त संकीर्ण वक्र जलप्रवाहामधून जात होती. पाणी त्या वेळीं कांठाबरोबर आलें होतें. काशवन, शरवन व ठिकठिकाणीं शल्यक्षेत्र जलमय होऊन गेलीं होतीं—गांवांतील झाडेंझुडपें, आमराई एकवार जलप्रवाहांत उभी आहेसें भासत होतें. देवकन्यांनीं जणूं काय बंगालदेशांतील तरुमूलवर्ति आलबालें जलसिंचनानें परिपूर्ण करून टाकिलीं आहेत.

प्रस्थानाच्या आरंभीं स्नानचिक्कण वनश्री उन्हामुळें उज्ज्वल, हास्यमय भासत होती, पण लवकरच ढग येऊन वृष्टीला आरंभ झाला. त्या वेळीं जिकडे बघावें तिकडें भयाण एकाकार दिसूं लागलें. जलनिमज्जनसमयीं गुरें ज्याप्रमाणें जलवेष्टित, मलिन, कर्दममय, संकीर्ण गोष्ठ प्रांगणांमध्यें दाटीनें, करुण नेत्रांनीं सहिष्णुतेनें उभीं राहून श्रावणांतील वृष्टींत भिजत असतात, त्याप्रमाणें

वंगभूमी आपल्या कर्दममय, धारासिक्त, रुद्ध वनामध्यें मूक, विषण्ण पीडित होऊन अविश्रान्त भिजूं लागली. शेतकरी विरलीं डोक्यावर घेऊन बाहेर पडले, बायका भिजतभिजत थंड वाऱ्यामुळें आंग चोरून घेऊन ह्या झोंपडींतून त्या झोंपडींत, कामानिमित्त जात येत आहेत, निसरड्यामुळें घाटांवर मोठ्या सावधपणानें पाय टाकून ओलेत्यांनीं पाणी आणीत आहेत व घरांत असलेले पुरुष दरवाज्यांत बसून तमाखू ओढीत आहेत, फारच जरूरीचें काम असल्यास धोतर कमरेला गुंडाळून हातांत वहाणा व डोक्यावर छत्री घेऊन बाहेर पडत आहेत, अबला—स्त्रियांच्या—डोक्यावर मात्र रौद्रदग्ध, वर्षाप्लावित वंग देशच्या सनातन पवित्र रिवाजानुसार कांहींहि आच्छदन नाहीं.

वृष्टि जेव्हां कशानेंहि थांबेना, तेव्हां नौकेंत अडकून पडलेल्या शशिभूषणनें विरक्त होऊन पुन्हां रेल्वेंतून जाण्याचें निश्चित केलें. एके ठिकाणीं एका प्रशस्त निरामय जागीं येऊन नौका बांधून ठेवून शशिभूषण आहाराच्या तजविजीला लागला.

“ बुडत्याचा पाय खोलांत ”—तो केवळ खोल जागेचा दोष नव्हे, बुडणाराची प्रवृत्तीहि कारण असते. शशिभूषणनें ह्याच्या सत्यतेचें एके दिवशीं प्रमाण दिलें.

दोन्हीं नद्यांत जेथून पाणी शिरत होतें, त्या तोंडांशीं वास बांधून कोळ्यांनीं एक भलें मोठें जाळें पसरून केवळ एका बाजूनें नौका जाण्यायेण्याला वाट ठेविली होती. फारा दिवसांपासून ते हें करीत असत, व त्याबद्दल पैसेहि भरीत. दुर्दैवानें ह्या वर्षीं ह्याच मार्गानें एकाएकीं जिल्हापोलीस सुपरिंटेंडेंट बहादुरांचें शुभागमन झालें ! त्यांची बोट येतांना पाहतांच कोळ्यांनीं आधींपासून बाजूंच्या वाटेकडे इशारा करून मोठ्या आवाजानें त्यांना सावध केलें. पण मनुष्यनिर्मित कोणत्याहि प्रतिबंधाला मान देऊन बाजूला होण्याचा साहेबांना अभ्यास नाहीं. त्यांनीं जाळ्यांवर बोट घातली ! जाळ्यानें अवनत होऊन बोटीला मार्ग दिला. किंतु तिचें सुकाणूं अडकून राहिलें. थोडक्याच वेळांत व अल्प श्रमानें तें सोडवितां आलें.

पोलीससाहेब अत्यंत गरम व लाल झाले. बोट बांधून ठेविली. त्यांची मूर्ति पहातांच कोळी धापा टाकीत पळून गेले. साहेबांनीं त्यांच्यापैकीं राहिलेल्यांना जाळें तोडून टाकण्यास हुकूम केला. त्यांनीं तें सातआठशें रुपयांचें जाळें तोडून तुकडे तुकडे केले. जाळ्यावर राग काढून शेवटीं कोळ्यांना पकडून आणण्याचा हुकूम सोडिला ! शिपायांनीं पळालेल्या चारजणांचा शोध न लागल्यामुळें जे चारजण हातीं आले त्यांना धरून आणिलें. ते, ‘ आपण निरपराधी आहोंत ’ म्हणून हात जोडून विनवण्या करूं लागले. पोलीसबहादूर त्या बंदिवानांना बरोबर घेऊन चलण्याबद्दल हुकूम देत होते. अशा समयीं चष्मा घातलेला शशिभूषण कोटाचीं बटनें सुद्धां न घालितां लगबगीनें जोडा चटचट् वाजवीत वाजवीत पोलीसच्या बोटीसमोर येऊन उभा राहिला व कांपऱ्या आवाजानें म्हणाला, “ कोळ्यांचें जाळें तोडून चारजणांना गिरफ्दार करण्याचा तुम्हांला कांहीं एक अधिकार नाहीं. ”

पोलीसबहादूर शशीला हिंदी भाषेंत कांहीं विशेष असन्मानकारक शब्द बोलतांच शशी उंच बोटीवरून साहेबांच्या बोटींत उडी टाकून साहेबांच्या आंगावर तुटून पडून पोरासारखें, वेड्यासारखें मारीत सुटला.

त्याच्या नंतर काय झालें तें त्याचें त्यालाच ठाऊक नाहीं. पोलीसठाण्यावर येऊन जागा झाला. त्या वेळीं लिहिण्याला देखील संकोच वाटतो कीं, जो प्रकार घडला त्यामुळें मानसिक सन्मान किंवा शारीरिक आराम ह्या दोहोंचाहि बोध झाला नाहीं.

## नवम परिच्छेद

शशिभूषणच्या वडिलांनीं वकील, बॅरिस्टर देऊन शशीला प्रथम जामिनावर मोकळें करून घेतलें. त्यानंतर फिर्यादीची चौकशी सुरूं झाली.

ज्या कोळ्यांचें जाळें नष्ट झालें होतें, ते शशिभूषण ज्या परगण्यांत राहात होता, त्याच परगण्यांतील एका जमीदाराची प्रजा. कधींकधीं विपत्काळीं ते शशीकडून कायद्याचा सल्लाहि घेऊन जात. ज्यांना साहेबांनीं बोटींत घालून आणिले होते तेहि शशिभूषणला अपरिचित नव्हते.

शशीनें त्यांना साक्षी देण्याकरितां हांक मारून आणिलें, तेव्हां ते भयभीत होऊन गेले. स्त्रीपुत्रपरिवार घेऊन ज्यांना संसारयात्रा चालवावयाची त्यांचें पोलिसांशीं वांकडें होऊन कसें चालणार? एकाहून अधिक प्राण कोणाच्या शरिरांत आहेत? जें नुकसान व्हावयाचें तें तर होऊन चुकलें! आतां पुन्हां साक्षीचें समन्स बजावून घ्यायचें?

सर्वजण म्हणाले, "ठाकूर, तुम्ही आम्हांला मोठ्या संकटांत घातलेंत!"

पुष्कळ सांगितल्यावर, समजाविल्यावर खरीखरी हकीगत सांगण्याचें त्यांनीं कबूल केलें.

इतक्यांत कांहीं बेंचाच्या कामानिमित्त हरकुमार जिल्हाधिपतींना सलाम करण्याकरितां गेले, त्या वेळीं पोलीससाहेब हांसत हांसत म्हणाले, "नायेब बाबू, मी ऐकितों तुमची प्रजा पोलीसच्या विरुद्ध खोटी साक्ष द्यायला तयार झाली आहे!" नायब चकित होऊन म्हणाले, "हां! हें कां कधीं संभवेल?"

संवादपत्र-वाचकांना अवगत आहे कीं, खटल्यांत शशिभूषणची बाजू कांहीं केलें तरी टिकली नाहीं.

कोळ्यांपैकीं एकानें येऊन सांगितलें कीं, पोलीससाहेबांनीं आपलें जाळें तोडिलें नाहीं. बोटीवर हांक मारून ते त्यांचीं नांवेंगांवें लिहून घेत होते.

येवढेंच नव्हे तर, त्यांच्या गांवच्या चार परिचित गृहस्थांनीं साक्ष दिली कीं, ही गोष्ट घडली त्या ठिकाणीं लग्नांतील वऱ्हाडीमंडळींच्या निमित्तानें ते गेले होते व शशिभूषणनें निष्कारण पुढें होऊन पोलीस चौकीदारांवर जो हल्ला केला तो त्यांनीं समक्ष पाहिला.

शिवी दिल्यामुळें आपण बोटींत शिरून साहेबांवर हात टाकिल्याचें शशिभूषणनें स्वतः कबूल केलें. पण त्याचें म्हणणें पडलें कीं, जाळें तोडून टाकण्यास लावणें व कोळ्यांना उपद्रव हें मूळ कारण!

ह्या स्थितींत कायद्याच्या दृष्टीनें शशिभूषणला जी शिक्षा झाली त्यांत अन्याय म्हणतां येत नाहीं. तथापि शिक्षा वाजवीपेक्षां फाजील झाली असें म्हटलें पाहिजे. शशीवर तीनचार आरोप होते, आघात, अनधिकार प्रवेश,

पोलीसच्या कर्तव्यांत व्याघात इत्यादि सर्व गुन्ह्यांबद्दल शशिविरुद्ध पुरावा भरभक्कम होता.

शशिभूषण आपल्या क्षुद्रगृहांत आपलीं प्रिय पुस्तकें टाकून पांच वर्षे शिक्षा भोगण्याकरितां तुरुंगांत गेला! त्याचे वडील अपील करूं लागले त्या वेळीं शशीनें वारंवार निषेध केला. तो म्हणाला, "जेल चांगला! लोखंडी बेड्या असत्य तरी बोलणार नाहींत. पण जेलच्या बाहेर जें स्वातंत्र्य आहे, तेंच आपल्याशीं प्रतारणा करून आपल्याला विपत्तींत टाकितें आणि सत्संगाविषयीं म्हणाल तर, जेलमध्यें मिथ्यावादी कृतघ्न पुरुषांची संख्या कमी. कारण स्थान-परिमित, बाहेर विस्तृत!"

## दशम परिच्छेद

शशिभूषण जेलमध्यें गेल्यानंतर थोड्याच दिवसांत त्याचे वडील वारले. घरीं आणखी कोणी नव्हतें. एक भाऊ पुष्कळ दिवसांपासून वऱ्हाडांत उद्योगधंदा करी. देशीं येणें त्याच्यानें होत नसे. तेथेंच तो घरदार करून स्थायिक होऊन राहिला होता. गांवीं जी थोडीफार विषयसंपत्ति होती, त्यांतलि अधिकांश नायब हरकुमारबाबूंनीं अनेक खटपटी करून हस्तगत केली होती.

जेलमध्यें पुष्कळशा कैद्यांना ज्या प्रमाणांत हालअपेष्टा सोसाव्या लागतात त्याहून पुष्कळांशीं अधिक दुर्दैवानें शशिभूषणला सोसाव्या लागल्या. तथापि पांच वर्षांचा दीर्घकाळ समाप्त झाला.

शशिभूषण पुन्हां एक वेळ वर्षासमयीं जीर्ण शरीर व शून्य हृदय घेऊन कारागृहाच्या वेशीबाहेर येऊन उभा राहिला! स्वाधीनता प्राप्त झाली, पण त्याखेरीज कारागृहाबाहेर त्याचें कोणी किंवा कांहींहि नव्हतें. गृहहीन आत्मीयहीन समाजहीन अशा एकाकी शशीला हा विस्तीर्ण जगत्संसार शून्यवत् भासूं लागला.

जीवनयात्रेच्या विच्छिन्न सूत्राला पुन्हां कोठून आरंभ करावा, याचा विचार करीत असतां एक, दोन घोड्यांची गाडी शशीच्या दृष्टीस पडली. एक नोकर गाडीवरून खालीं उतरून जवळ येऊन चौकशी करूं लागला—

" आपलेंच नांव शशिभूषणबाबू ? " तो म्हणाला " होय. " नोकरानें लगेच गाडीचें दार उघडलें व तो बसण्याची वाट पहात उभा राहिला.

आश्चर्यचकित होऊन त्यानें विचारलें " मला कोठें नेणार ? "

तो नोकर म्हणाला, " आमच्या मालकानें आपल्याला बोलाविलें आहे."

पथिकांचे कौतुहल दृष्टिपात असह्य होऊन अधिक विचारपूस न करितां शशिभूषण गाडींत जाऊन बसला. त्याच्या मनाला वाटलें कीं, ह्यांत कांहींतरी भ्रम आहे; पण पुन्हां विचार आला कीं, कुठें तरी गेलें पाहिजे—कांहीं झालें तरी नूतन जीविकेला आरंभ तर केला पाहिजे.

ते दिवशींहि मेघ व सूर्य आकाशांत जणूं काय परस्परांची शिकार करण्या-करितां उद्यत होऊन फिरत होते. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं वर्षाजलप्लावित, दाट, श्यामवर्ण शस्यक्षेत्रें चंचल छाया व आलोकामुळें विचित्र दिसत होतीं. बाजाराजवळ एक मोठा रथ पडला होता, त्याला लागून एका वाण्याच्या दुका-नांत वैष्णव भिक्षुक मृदंग करताळ घेऊन गाणें गात होते.

" येईं, येईं, परतुनि येईं, अनाथनाथा ! सत्वरिं येईं,
क्षुधित, तृषित, तापित आम्ही ! झडकरिं येईं."

गाडी पुढें गेली, तसें गाणेंहि दुरून ऐकूं येऊं लागलें—

" अतिकठोर परतुनि येईं, करुणाकर ! सुकुमारा येईं,
हे सजल जलद, मेघश्यामा ! चारुगात्रा झडकरिं येईं."

गायन हळुंहळूं क्षीणतर अस्फुटतर होतहोत ऐकूं येईनासें झालें ! पण गाण्याच्या सुरानें शशिभूषणाच्या हृदयांत एक प्रकारें तळमळ उत्पन्न केली. त्यानें मनांतले मनांत गुणगुण करीत पदाला पद जुळवून पद्यरचना तयार केली. तें कशानेंहि थांबेना !

" हे सुखधामा ! परतुनि येईं, दुःखमोचना ! येईं, येईं,
हे सुखदुःख मंथनधन ! नको बघूं अंत आतां;
हे चिरवांछित ! येईं आतां, हे चिरसांचित ! येईं,
हे चंचल, हे चिरंतन, हृदयांतरिं येईं,

मञ्जुजपाशीं परतुनि येईं, मम नेत्रपथिं येईं;

मत् शयनीं, स्वप्नीं, भोजनिं, वसनीं, इ. इ."

गाडी ज्या वेळीं एका प्राचीन वेष्टित उद्यानामध्यें प्रवेश करून एका दुमजली वाड्यासमोर येऊन थांबली, तेव्हां शशिभूषणचें गायनहि थांबलें. कांहीं प्रश्न न करितां नोकराच्या सांगण्याप्रमाणें त्यानें घरांत प्रवेश केला.

ज्या खोलींत शशी येऊन बसला, त्या खोलीच्या चारी बाजूंला कांचेच्या मोठमोठ्या कपाटांत, निरनिराळ्या रंगांचीं, निरनिराळ्या पुठ्यांचीं पुस्तकें ठेविलेलीं होतीं, हें दृश्य पाहून त्याचें पुरातन जीवन द्वितीयवार कारामुक्त होऊन आनंदित झालें. हा सोनेरी अक्षरांनीं अंकित, नानावर्णांनीं रंजित ग्रंथसमूह, आनंदलोकांत प्रवेश करण्याचें सुपरिचित रत्नखचित महाद्वारवत् शशीला भासला.

टेबलावरहि पुस्तकें बरींचशीं पडलीं होतीं. क्षीणदृष्टी शशिभूषणनें वांकून त्यांच्याकडे बघितलें. एक विदीर्ण स्लेट, एक जुनी अंकलिपी, जुन्या हिशेबाच्या वह्या, कथामाला, काशी रामदासाचें महाभारत.

स्लेटीच्या लांकडी चौकटीवर शशिभूषणच्या हातचें शाईनें मोठ्या अक्षरांनीं लिहिलेलें नांव! "गिरिबाला देवी." बुकांवरहि त्याच हातांनीं लिहिलेलें नांव.

आपण कोठें आलों आहोंत हें शशिभूषणच्या लक्षांत आलें. त्याची छाती थडथड करूं लागली. खिडकींतून बाहेरच्या बाजूस पाहिलें.—त्या ठिकाणीं काय दृष्टीस पडलें? तें गज बसविलेलें क्षुद्र घर, तो नतोन्नत ग्रामपथ, ती रेघांची साडी नेसलेली लहान मुलगी—व ती आपली शांतिमय निश्चिन्त, निभृत, जीवनयात्रा.

या काळचें तें सुखमय जीवन कांहीं असामान्य वा अधिक नव्हतें; दिवस एका मागें एक क्षुद्र कार्यांत, क्षुद्र सुखांत, अज्ञातवासांत जात, व त्याच्या स्वतःच्या अध्ययनकार्यांत एका बालिकाछात्रीचें अध्यापनकार्य तुच्छ घटना-मध्येंच गणलें जाईल. पण गांवच्या गांवांतील तें निर्जन दिन-यापन, ती क्षुद्र

शांति, तें क्षुद्र सुख, त्या क्षुद्र बालिकेचें क्षुद्र मुख, तें सर्व स्वर्गाप्रमाणें, देश-कालातीत, आयत्ततेच्या पलीकडील, केवळ मनोराज्याच्या कल्पनाछायेमध्यें शोभूं लागलें. त्या काळचें तें चित्र व स्मरण आजच्या वर्षाम्लान प्रभातआलोकाशीं व मनांतील मृदुगुंजित त्या कीर्तनगायनांशीं मिश्रित होऊन एक प्रकारें संगीतमय ज्योतिर्मय पूर्वरूपधारणा करून मनामध्यें उत्थित झालें. त्या अरण्य-वेष्टित, कर्दमाक्त, संकीर्ण ग्रामपथांमधील तें अनादृत व्यथित बालिकेचें अभि-मानमालिन मुख, जणूं काय ईश्वरनिर्मित, असाधारण आश्चर्यकारी, अतिगंभीर, आर्तवेदनापरिपूर्ण स्वर्गीय चित्राप्रमाणें त्याच्या मानसपटावर अंकित झालेलें दिसलें. त्याच्याच बरोबर कीर्तनाचा करुणस्वर ऐकूं येऊं लागला व मनांत आलें कीं, जणूं त्या ग्रामबालिकेच्या मुखावर एक विश्वहृदयाचें अनिर्वचनीय दुःख आपत्तिछाया निक्षिप्त करीत आहे. शशिभूषण आपल्या दोन्हीं बाहूंमध्यें तोंड लपवून त्या टेबलावरील स्लेटपाटीवर डोकें टेकून बराच वेळपर्यंत अनेक दिवसांच्या स्वप्नाचा अनुभव घेऊं लागला.

बऱ्याच वेळानें मृदुध्वनीनें दचकून उठून मान वर करून बघितलें. त्याच्या सन्मुख रुप्याच्या ताटांत फल, मूल, मिष्टान्न घेऊन गिरिबाला जवळच उभी राहून नीरवें वाट पहात होती. शशीनें मान उचलतांच निराभरण, शुभ्रवसना विधवावेशधारिणी गिरिबालानें शशीला गुडघे टेंकून प्रणाम केला.

विधवेनें उठून शीर्णमुखानें म्लानवर्ण, कृशशरीर, शशिभूषणकडे सकरुण, स्नेहमय दृष्टीनें बघितलें, त्या वेळीं शशीच्या दोनहि डोळ्यांतून पाणी येऊन गालांवरून खालीं पडत होतें.

शशिभूषणनें तिला कुशल विचारण्याचा प्रयत्न केला पण शब्द उमटेना. निरुद्ध-अश्रु-बाष्पांनीं वाक्यपथ बलात्कारानें अवरुद्ध केला होता. कथा व अश्रु उभयतां निरुपायानें हृत्स्थलीं, कंठद्वारीं कुंठित होऊन राहिले. ती कीर्तनकार मंडळी भिक्षा मागत मागत वाड्यासमोर येऊन पुनः पुनः आवृत्ति करून गाणें गाऊं लागली.

# अभिप्राय



( नक्कल )

श्री　　　　　　　　　　पुणें शहर,

१०८ सदाशिव पेठ.

९।३।२६

कु. सा. न. वि. वि. डॉ. टागोर यांच्या गोष्टींचीं आपण केलेली हस्त-लिखित रूपांत असलेलीं मराठी रूपांतरें वाचिलीं. थोडक्यांत लिहावयाचें ह्मणजे सगळ्याच गोष्टींचीं रूपांतरें उत्तम साधलीं आहेत.

त्यांतल्या त्यांत ‘ काबुली,’ ‘ हुंडा, ’ पोष्ट मास्तर ’ वगैरे तर सर्वांगसुंदर अशींच आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं. डॉ. टागोर यांच्या गोष्टींतील मूळचा सुटसुटीतपणा, कथानकाचा आवर व मितभाषा या सर्व गोष्टी रस-विच्छेद होऊं न देतां आपण मराठी भाषेंत सुंदर रीतीनें आणिल्या आहेत. हिंदी, बंगाली, कानडी वगैरे स्वदेशीय, त्याचप्रमाणें फ्रेंच, जर्मन वगैरे विदेशीय भाषेंतील उत्तम वाङ्मयाच्या वाढीच्या दृष्टीनें व लोकशिक्षणाच्या दृष्टीनेंहि अवश्य आहे. डॉ. टागोर यांच्यासारख्या जगविख्यांत ग्रंथकाराच्या कृतींचा वरील उत्कृष्ट वाङ्मयांत समावेश निःसंशय होईलच. अर्थात् मराठींत तें वाङ्मय येणें ही अत्यवश्य गोष्ट आहे, व आपण तें काम उत्तम रितीनें पार पाडीत आहां यांत संशय नाहीं. कळावें.

( सही )—शं. वा. दांडेकर,

Professor of Philosophy,
New Poona College.

Dear Sir,

I have gone through your Marathi translation of Dr. Togare's short stories and have great pleasure in recording my opininon regarding the scholarship that you have attained in the Bengali language. I don't think I am fully qualified to say anything about the excellence of the Marathi language that has been employed by you, but I am sure, the force of the original has been completely brought out and if you undertake to translate more works you shall have obliged not only the Maharashtra public but the Bengalees also will have a cause to be thankful to you.

Dated
Sitamu, C. I.
25-2-26.

Yours faithfully,
(Sd.) S. Chakravarti, B. A.,
(B. H. U.)

( True copy. )

---

**Maharashtra Jnankosha Mandala, Ltd.,**
**Marathi Encyclopædia Office,**

*841 Sadashiv, Poona City.*

*Manager, Director & Editor-in-Chief :—*

Dr. Shridhar V. Ketkar, M. A. Phd.,

Dated February 2nd 1929.

Dear Mr. Marathe,

I thank you for sending to me your mss. of translation of some stories of Dr. Ravindranath Tagore. I am glad to see that you have used very simple language. If you undertake to bring out a large number of stories of this nature into Marathi language I feel sure that the Marathi reading public will thank you for the work.

Sincerely yours,
(Sd.) Shridhar V. Ketkar.

# श्रीशिवः शरणम् ।

महाशयाः—श्रीमद्विहितं डॉक्टर रवीन्द्रनाथविरचितकाव्यस्य महाराष्ट्रभारतीरूपान्तरं साकल्येनाऽऽलोचनकर्मतां नीतम् ! समग्राः कथाः प्रमोदावहास्तत्रापि काश्चन समीचीनतमा विद्यन्ते । तत्र तत्र संदृश्यमाना भवदीयरूपान्तरचातुरी निसर्गरुचिरायाः प्रतिभाशालिन्याः कविकृतेः सविशेषं रसपरिपोषं पोषयति । किं पल्लवितेन ? श्रीटागोरमहानुभावसदृशः काव्यचुञ्चुः कविः सुविचाराधायकाभिनवंकथासंविधानकं, भवादृशाश्च स्वकीयां ' मराठे ' इत्युपाख्यामन्वर्थयन्तः ' मराठी ' परिवर्तनविधायका एतत्त्रयं कस्य नाम चेतःप्रसादनाय न प्रभवेत् ? । ईदृशान्येव वाङ्मयोपोद्बलकानि कार्याणि भूयोभूयः संपादयन्तु श्रीमन्तस्तेषां मधुरिमाणं समनुभवन्तु च सहृदया महाराष्ट्रीया इत्याशासे संग्राह्योऽयं ग्रन्थ इति शम् ।

पुण्यपत्तनीयानन्दाश्रमवास्तव्यः—
रानडे इत्युपाभिधः पुरुषोत्तमशर्मा.
१८५१ शाकीया का. शु. प्रतिपत्.

श्रीयुतेभ्यो मराठेकुलोत्पन्नेभ्यः श्रीधरमहाशयेभ्यः प्रणतिततिपुरस्सरमिदमावेद्यते.

**श्री**

यत् श्रीमद्भिः सुगृहतिनामधेय ' टागोर ' कुलावतंसायमान श्रीरवीन्द्र नाथस्य लघुकथा समुच्चयाभिध काव्यस्य महाराष्ट्र भाषायां परिवर्तनमकारि तत्सर्वमपि साक्षात्कृतं. तदंतर्वर्तीनि ' हुंडा ' ' पोष्टमास्तरं ' ' क्षुधितपाषाण ' ' जिवंत कीं मेली , ' समस्यापूरण ' ' दालिया ' एवमादीनि प्रकरणानि विलोक्य आनंदातिशयपरिप्लुतांतःकरणः समभूवम् ।

मन्ये टागोरमहाशयस्य वंगीकाव्यस्य महाराष्ट्रभाषायां रूपांतरं विधाय रवींद्रनाथविषये महाराष्ट्रीयचेतःकुहरे संवर्धितोनामादरातिशय इति ।

पुण्यपत्तनं
मि. कार्तिक शु. २
शके ( १८५१ )

भवदीयः
भीलवडीकरेत्युपाव्हः रामचंद्र
सूनुः शंकरशर्मा
४६२ रास्ता पेठ, पुणें.
१५–९–१९३४

सा. न. वि. वि. कथाकदंबाची ' प्रेसकॉपी ' मजकडे अभिप्रायार्थ पाठविली याबद्दल मी आपली आभारी आहें.

डॉ. टागोर यांचे उत्कृष्ट ग्रंथ इंग्रजींतून वाचतांना मराठी वाचकांकरितां त्यांची कोणी रूपांतरें करील तर किती बरें होईल असें आजपर्यंत पुष्कळांच्या मनांत आलें असेल. पण या कार्याकरितां जरूर तो व्यासंग ठेवून शुद्ध व सुबोध मराठींत मूळचा रसभंग न करितां ग्रंथकर्त्याचें हृद्गत उतरविणें ही अत्यंत कठीण गोष्ट होय. आपण ती इतक्या यशस्वी तऱ्हेनें पार पाडली याबद्दल मराठी वाचकवर्गातर्फे आपलें अभिनंदन करणें जरूर आहे.

आपल्या या प्रयत्नांचा वाङ्मयाखेरीज इतर जीवनप्रांतांतही उपयोग होण्यासारखा आहे. विशेषतः आपल्या समाजांतील बहुसंख्य स्त्रियांच्या परिस्थितीचें व तद्विषयक अनेक कठीण प्रश्न यांचें सत्य व हृदयस्पर्शी असें टागोरांसारख्या प्रतिभावान् लेखकानें केलेलें वर्णन—त्या विषयासंबंधीं उत्कट जागृति घडवून आणण्यास एक प्रभावी साधन होईल असें मला खात्रीपूर्वक वाटतें.

मराठी वाचकवर्ग व महाराष्ट्रांतील सुधारणाप्रिय जनता आपल्या व्यासंगाचें व परिश्रमाचें चीज करील अशी मला पूर्ण आशा आहे. कळावें.

कमलिनी दामले,
४६२ रास्ता पेठ, पुणें.
१५–९–३४.

रा. मराठे यांची भाषांतरित परिणीता कादंबरी.

सा. न. वि. वि.

श्री शरच्चंद्र चट्टोपाध्याय यांच्या 'परिणीता' या कादंबरीचें आपण केलेलें रूपांतर वाचलें. त्यांत बंगालमधील व साधारणतः एकंदर हिंदु समाजांतील मुलींच्या विवाहविषयक अडचणी उत्तम कारें चित्रित केलेल्या आहेत. आपल्या समाजांत दृढमूल होऊन लेल्या हुंड्याच्या अनिष्ट रूढीनें किती अनर्थ उद्भवतात व त्यामुळें लीचा बाप होणें कसें दुर्भाग्य समजलें जातें वगैरे गोष्टींचें श्री. रच्चंद्र यांनीं यथातथ्य व हृदयंगम वर्णन केलें आहे. कथानक तकें मनोवेधक आहे कीं, वाचकांचें मन साहजिकच त्यांत वर्णिलेल्या ामाजिक प्रश्नांबद्दल विचारप्रवण होतें.

या प्रकारचें इतर भाषांतील वाङ्मय आपल्या भाषेंत आणून मराठी वाचकांची सोय करणें हें एक महत्त्वाचें कार्य आहे. एका भाषेंतील अभिजात ग्रंथकारांचें लेखन दुसऱ्या भाषेंत तंतोतंत उतरविणें किती दुर्घट आहे हें लक्ष्यांत घेतलें तर आपलें हें रूपांतर अतिशय यशस्वी आहे असेंच कोणीही म्हणेल. कळावें.

कमलिनी दामले.